भारत इतिहास संशोधक मंडळ पुरस्कृत ग्रंथमाला : क्रमांक २९.

'यशोदा-चिंतामणि स्मारक ग्रंथमाला'
पुष्प ३ रें

# पुरंदरे दफ्तर भाग ३ रा



श्री. मल्हारराव चिमणराव व मल्हारराव त्र्यंबकराव
पुरंदरे वगैरे यांच्या संग्रहांतील
( कारकीर्द माधवराव बल्लाळ पेशवे )

संपादक व प्रकाशक
कृष्णाजी वासुदेव पुरंदरे
संपादक पुरंदरे दफ्तर भाग १।२ व शिवचरित्र साहित्य भाग १,
पेन्शनर, 'रीडर हिस्टॉरिकल रिचर्स ऑफिस, पुणें. (पेशवे दफ्तर)'



शके १८५६ (इ. स. १९३४)



किंमत ३ रुपये ]           [ मंडळ-सभासदास २॥ रु.

'यशोदा-चिंतामणि स्मारक ग्रंथ-माला'

पुष्प ३ रें

यशोदा-चिंतामणि स्मारक संस्थेचे ट्रस्टी यांनीं तीनशें रुपयांची देणगी देऊन, या ग्रंथप्रकाशनास सहाय केलें, याबद्दल ग्रंथकर्ता ट्रस्टी यांचा फार आभारी आहे.

—कृ. वा. पुरंदरे

# ज्या सद्गृहस्थांकडून कागदपत्रांची मदत झाली त्यांचीं नांवें लेखांकासहित



अत्रे कोडितः—ले. ६१, १४६, १४८, १५६, १५९, १६०.

अत्रे-चांबळीकरः—ले. ८, १०-१३, २६, २४, ४७, ४९, ७३, १५७, १५८, १६१, १६२.

इतिहास सं. मंडळ, पुणें:—ले. ३२, ११८, १२१, १५४, १८२, २०५.

इनामदार, मोरगांवः—ले. १६४, १६५.

किरकोळे (केशव विष्णु इनामदार), भिवडीः—ले. १५, १७१, १७२.

डॉ. खाडिलकर, पंचवटीः—ले. ४०, ४१.

गंगाधरराव बाबासाहेब देशपांडे, पुणेः—देशपांडे करिणा.

चांबळी, सरनाईकः—ले. ३४.

तुकारामजी जगताप, पुणें—ले. १६३, १७५.

श्री. दादासाहेब पुरंदरे, मोढवेकरः—ले. ७, ९, १७-२२, २४, २७, ३३, ३५-३७, ४२, ४८, ५८, ६०, ८४, ८५, ९८, १०७-११०, ११६, १३७, १६६-१६९, १७३, १७४, १८४, २००.

पेठकर पुरंदरेः—ले. २१२.

श्री. मल्हारराव पुरंदरेः—ले. १-६, १४, १६, २३, २३ अ, २५, ३१, ३८, ३९, ४३, ४५, ५०-५२, ५४-५७, ५९, ६२-६६, ६८-७२, ७४-८३, ८६-९७, ९९-१०६, ११३-११५, ११७, ११९-१२०, १२२-१३६, १४७, १७६-१८१, १८३, १८५-१९९, २०१-२०४, २०६-२११, २१३, २१४.

शिरवळ देशपांडेः—ले. १७०.

हिवरे बोकीलः—ले. २८, ३०, ४६, ५३, ६७, १३८-१४५, १५४ अ, १५५.

# प्रस्तावना



या भागांत शिवकालापासून श्रीमंत माधवराव बल्लाळ पेशवे यांच्या कारकीर्दीच्या अखेरीच्या कालापर्यंत जो पत्रव्यवहार छापिलेला आहे त्या सर्वांत माधवरावाच्या कारकीर्दीतील मजकुरानें जास्त पृष्ठें व्यापिलेलीं असल्यानें या भागाचें ‘कारकीर्द माधवराव बल्लाळ’ हें नामाभिधान योग्यच ठरेल. अर्थात् पुस्तकाचा मुख्य विषय जो माधवरावाची कारकीर्द त्याला धरूनच प्रथम चर्चा झाली पाहिजे.

मराठी राज्याच्या स्थापनेपासून तिजवर जे अनेक आपत्काळाचे प्रसंग ओढवले त्यांपैकीं हा एक काळ होय. संभाजीमहाराजांच्या वधानंतरची जणूं कांहीं ही एक पुनरावृत्तीच होती. अशा ह्या महत्त्वाच्या कालखंडासंबंधीं जितकी चर्चा होईल तितकी थोडीच असते; पण आश्चर्याची गोष्ट ही कीं प्रत्यहीं नवीन नवीन साधनें उपलब्ध होत असूनहि, चाळीस वर्षांपूर्वीं या कारकीर्दीचा जो एकदां विचार झाला त्यांत किरकोळ दुरुस्त्या करण्यापलीकडे स्वतंत्र परीक्षण झाल्याचें दिसत नाहीं. या चाळीस वर्षांत या विषयावर अनेकांनीं अनेकदां लिहिलें; पण त्यांत शिळ्या कढीला ऊत आणण्यापेक्षां जास्त कांहीं केलें असेल तर शपथ. जबाबदार इतिहासकारांना जेथें स्वतंत्र विचार करण्याची बुद्धि सुचली नाहीं तेथें येरगबाळी नाटककादंबरीकारांनीं गुरुजींचा उदो उदो करावा यांत आश्चर्य कसचें ! तेव्हां या कारकीर्दीतील जे महत्त्वाचे प्रसंग, अभिनव ऐतिहासिक सामुग्रीनें दुरुस्त होतात, त्यांपैकीं कांहींचा प्रथम विचार करून मगच इतरांकडे वळलेलें बरें.

माधवरावाची कारकीर्द सुरू झाली त्या वेळीं पेशवाई नक्की कोणत्या पायरीवर अधिष्ठित होती याचा योग्य अंदाज करतां आल्यावांचून पुढील उद्योगाचें स्वरूप नीटसें ध्यानांत येणार नाहीं. म्हणून गताध्यायाचें ‘सिंहावलोकन’ करून मगच चालू अध्यायाचा ‘श्रीगणेशा’ केलेला योग्य होईल. भाऊसाहेबांनीं उदगीरवर निजामला लोळवून जो अपूर्व जय मिळविला, तेथेंच नानासाहेबांच्या व एकंदर पेशवाईच्या वैभवाची परिसमाप्ति होते. यानंतर ही गाडी पुढें अवघ्या दहा महिन्यांतच पानपतच्या जबरधक्क्यानें तोंड फिरवून अपकर्षाकडे धावत सुटते आणि पुढील चार महिन्यांत जवळ जवळ रसातळाचा ठाव घेते. शके १६८१ च्या फाल्गुनांत उद्‌गीर संपलें व शके १६८३ च्या ज्येष्ठांत नानासाहेब पेशव्यांनीं सर्व प्रकारची झालेली वाताहत पाहातां पाहतां देह विसर्जन केला. या तेरा चौदा महिन्यांत राज्याचीं सर्वच अंगें झडत जाऊन पेशवाई केवळ लुळीपांगळी

झाल्याचा देखावा दिसत होता. भूकंपानें उध्वस्त झालेल्या प्रदेशाचीच जणूं कांहीं ती पुनरावृत्ति होती. पैसा गेला, प्रदेश गेला, कर्ती माणसें क्षय पावलीं. एवच, सर्व कांहीं गेलें आणि राज्यनाशाच्या पिशाचांना मात्र ऊत येऊन त्यांचे नंगे नाच जोराने सुरू झाले. पानपतावर पेशव्यांचा खजिना रिता होऊन त्यावर कित्येक लाखांचा कर्जाचा बोजा चढल्यामुळें या अंगाकडे पाहण्याची तर सोयच राहिली नव्हती. बरें, हा रिता जामदारखाना पुन्हा प्रफुल्लित करणारीं साधनें जरी विद्यमान असतीं तरीहि हे अंग उशिरानें कां होईना पुन्हा कार्यक्षम करतां आलें असतें पण त्याहि झऱ्यावर पानपतच्या दणक्यानें स्थानभ्रष्ट होण्याचा प्रसंग आणला. पानपत व तत्पूर्वींचे उद्योग, यांना लागणारा पैसा, मामलेदाराचीं 'फाजिलें' व सावकारी ऋण यांनीं उभारला असल्यानें भावी उत्पन्न जवळ जवळ संपलें. पेशव्यांच्या या वेळच्या पतीचें स्थान पाहावयाचें झाल्यास त्यांना सावकारांना कोणत्या दरानें व्याज भरावें लागत होतें याकडे लक्ष दिल्यानें सहज दिसून येतें. पानपतनंतर तर जबर व्याज देऊनहि कर्ज मिळण्याची आशा उरली नव्हती. ही झाली कोशाची स्थिति. दुसरें अंग जें मनुष्यबल, तेथें तर याहूनहि हृदयद्रावक देखावा दिसत होता. राव आपानंतर त्यानें आपल्या कर्तृत्वाचें जोरावर पांचसहा वर्षें पेशवाईचा गाडा चकोरी न सोडतां व्यवस्थित चालवून वाहवा मिळविली होती त्या महादोबा पुरंदऱ्याच्या मृत्यूपासून ( शके १६८२ कार्तिक ) मनुष्यहानीला जी एकदां सुरवात झाली तिनें नानासाहेबांचा बळी घेऊन दुर्दैवाची कमालच करून टाकली! भाऊसाहेब, विश्वासराव, जनकोजी सिंदे, वगैरे मोहरे व कमावलेले सैनिक, यांचा पानपतावर झालेला संहार यासारख्या न भूतो न भविष्यति मृत्यूच्या अजब तडाख्याला इतिहासांत तोडच मिळावयाची नाहीं. पानपतावर मराठ्यांची जवळ जवळ एक पिढीच्या पिढीच कापली गेल्यामुळें महाराष्ट्रभर जो हाहाःकार उडाला त्याचें वर्णन करण्याची सोय नव्हती! अशा या आपत्कालीं अंतःस्थ व बहिःस्थ शत्रूंनीं उचल न खाल्ली तर तें राजकारण कसलें? पानपतांत पेशव्यांच्या विरुद्ध पक्षास सामील झालेल्या व तरत्या-बुडत्याची वाट पहात बसल्या-मुळें सुरक्षित राहिलेल्या शत्रूंनीं या नाजूक प्रसंगाचा पुरेपूर फायदा घेऊन उत्तरेंत मराठ्यांची सत्ता केवळ नाममात्र ठेवून अराजकास ऊत आणला. उत्तरेंतील मराठ्यांची सत्ता तद्देशीय राजेरजवाडे व जमिनदार या सर्वांच्यान डोळ्यांत सदयासारखी सलत असल्यानें निकटील हिंदुमुसलमानांनीं भेदातीत होऊन, मराठशाहीचे लचके तोडण्यांत अहमहमिकेनें भाग घेतला होता. हाच देखावा दक्षिणेंतहि दिसत होता. निजाम हा मराठ्यांचा पिढ्यान् पिढ्यांचा हाडवैरी असून त्याच्या जोडीला आतां श्रीरंगपट्टणचें हिंदु राज्य पचनी टाकून शेर बनलेला हैदर नाईक येऊन मिळाला होता. उदगीरवर भाऊसाहेबांनीं निजाम-

अलीला चारी मुंडी चित केलें तरी तो तेथें पुन्हा सावर न धरण्याइतपत पुरा झालेला नव्हता. उलट स्वसामर्थ्याला धक्का लागूं न देतां, झालेली अंतःस्थ अव्यवस्था दूर करण्यास अवसर मिळावा म्हणूनच निजामनें पेशवे म्हणतील त्या अटीवर उद्‌गीरवर तह करून वेळ मारून नेली होती. पेशवे पानपतावर गुंतले असतां, इकडे निजाम भावी युद्धाची तरतूद करण्यांत चूर झालेला दिसत असे; आणि पानपतावरून पेशवे शिरसलामत बाहेर पडत नाहींत अशी खात्री होतांच त्याच्या बाहूंना जणूं कांहीं स्फुरण चढलें आणि त्याच्या छाताडावर राघोबा व हैदराच्या तोंडावर विसाजीपंत बिनी नसता तर निजाम व हैदर या जोडीनें संगनमत करून पेशव्यांच्या वैभवाचें ज्यांना कधींच सुख नव्हतें त्या मराठे सरदारांस बगलेला मारून दक्षिणेंतहि सोनपत-पानपतचा देखावा दाखविण्यास कमी केलें नसतें. अशा या पेशवाईच्या अस्तित्वाचा जणूं कांहीं निवाडाच होण्याच्या काळीं कारभारी आबा पुरंदरे व सखाराम बापू आणि सर्वाधिकारी चुलता राघोबा यांच्या हातांत हात घालून अल्पवयी माधवराव पेशवाईच्या गादीवर आरोहण करीत आहे असा देखावा दिसूं लागला.

## योग्य कर्णधाराची निवड

वर जीं चार जबाबदार माणसें दिलीं आहेत त्यांपैकीं तिघे नैसर्गिक हक्कानें स्थानापन्न झाले व एकाचीं मात्र मुद्दाम निवड केल्याचें दिसून येतें. नानासाहेब वंशपरंपरेनें पेशवे पदधारी समजला जात असल्यामुळें त्याच्या पश्चात् ती गादी त्याच्या वडील मुलाकडे जावयाची आणि तो मान हल्लीं माधवरावाकडे येत असल्यानें तोच पेशवाईचा मालक ठरला. हीच दृष्टि 'पेशवे-प्रतिनिधी'च्या निवडींत दिसून येते. माधवराव अल्पवयी असल्यानें तो अधिकारक्षम होईपर्यंत त्याला मदत करणारा कोणी प्रतिपेशवा ऊर्फ पेशवेप्रतिनिधि पाहिजे होता आणि तो हक्क या वेळीं घरांतील वडील व कर्तापुरुष या नात्यानें, पेशव्याच्या चुलत्याकडे– राघोबाकडे–येत होता, तेव्हां या जागेवर राघोबाच येणें अपरिहार्य होतें. महादोबा पुरंदऱ्याचे उपकार स्मरून त्याची दिवाणगिरी त्याच्या कर्त्या मुलाकडे देण्यांत मोठीशी चूक झाली नाहीं; पण या हक्कदारांच्या मालिकेंत जो एक बीचमें मेरा चांदभाई घुसला त्याकडे तत्कालिन लोकांचेंहि जेथें लक्ष वेधलें तेथें तो आमचाहि चर्चेचा विषय होऊन बसल्यास आश्चर्य नाहीं. खवळलेल्या अफाट दर्यात आतां पेशवाईचें जहाज जाऊन पडत आहे व तें योग्य कर्णधारा-अभावीं सुरक्षित पल्ला गांठणें शक्य नाहीं अशी खात्री झाल्यामुळेंच नानासाहेबांनीं असलेल्या शहाण्या लोकांतून नेमकी निवड करून सखारामपंताकडे दुय्यम दिवाणगिरीचें पद दिलें. या जागेवर कुलीन, शहाण्या, कर्त्या मुत्सद्द्याची निवड व्हावयाची असतां नानासाहेबांनीं आपल्या मर्जी-

तल्या 'शागिर्दा'कडे हें काम देऊन, कारभार मात्र नासवला असा या नेमणुकी बद्दल त्या वेळीं एकच गवगवा झाला, म्हणूनच त्याचा प्रतिध्वनि आजहि उठत आहे. आपल्या प्रतिपक्षाविरुद्ध खरेखोटे आक्षेप घेऊन त्याला चोहोंकडून पेंचात आणावयाचें ही राजनीति पुरातन असून ती जाणणारे– नव्हे त्यातले पोटकिडे –पेशवाईंतहि कांहीं कमी नव्हते. या लोकांनीं माधवरावाची कारकीर्द सुरू होतांच निजामाच्या संकटाची परिसमाप्ति झाल्यावर हा विषय हातीं घेतला व इष्ट ती कार्यसिद्धि करून दाखविली. सखारामपंताच्या नालायकीचें रणशिंग फुंकताना त्याच्या तत्कालीन प्रतिस्पर्ध्यांनीं त्याच्या सामाजिक दर्जापासूनच सुरुवात केली असल्यानें या नेमणुकीचें मंडन करीत असतां आम्हालाहि या पुरुषाच्या कुलापासूनच सुरुवात करावी लागत आहे. सखारामपंत हा शिवकालीन पंताजी पंत व महादाजी यमाजी यांचा वंशज असून तो जेव्हा पोटापाण्याच्या उद्योगांत शिरला तेव्हा त्याचें घराणें सासवडीं चांगल्या घरंदाजांत मोडत होतें. अर्थात् त्यावर 'शागिर्दा'चा केलेला आरोप खोडसाळपणाचा ठरतो. पेशवाईंत नावा-रूपास चढलेल्या याच्या समकालीन पुरुषांत आनुवंशिक 'राजकार्यधुरंधर' हें उपपद लावून घेण्याची पात्रता फारच थोड्याच्या वाट्याला येईल. सखाराम पंताचें मूळचें कार्यक्षेत्र पुरंदऱ्याकडे असून या पुरुषाच्या अंगच्या सव्यसाचित्वा मुळेंच त्याचा पेशवे दरबारीं प्रवेश झाला. हा थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दी-तील उत्तरेच्या मोहिमांत हजर असून नानासाहेबास पेशवेपदप्राप्ति झाल्यानंतर हा पेशव्याच्या कर्त्या कारभाऱ्यांत गणला जाऊं लागला. नानासाहेब मोहीमशीर असतां अल्पवयी भाऊसाहेब पुण्याला कारभार हाकीत असे. त्याच्या सल्लागारांत त्र्यंबकराव मामाच्या मांडीला मांडी लावून सखाराम कारभार करतांना आढळतो, आणि पुढें तर हा पेशवे घराण्यांतील मुलांच्या सप्रयोग राजकारणाचें ज्ञानदान करणाऱ्या शाळेचा मुख्य अध्यापकच झाला. भाऊसाहेबाची शके १६६८ सालची पहिली यशस्वी कर्नाटकची मोहीम सखारामपंताच्या देखरेखी झाली व राघोबाच्या गुजराथ हिंदुस्थानांतील मोहिमांतील पक्षिगिरीवर यांचीच नेमणूक झाली होती. एवंच, बापूच्या राजकारणचतुरत्वाचा डंका नानासाहेबाच्या कारकीर्दींत चढत्या आवाजांत गाजत असून नानासाहेबावर या पुरुषाच्या बहाद्दरपणाची अशी कांहीं विलक्षण छाप पडली होती कीं, यापुढें या पुरुषावाचून ही 'गोष्टी पाजी' सावरण्यास कोणीच समर्थ नाहीं, अशी पक्की खात्री झाल्यामुळेंच समजावयास दुय्यम पण वस्तुत मुख्य कारभारी म्हणून सखारामपंतांची नेमणूक झाली. ही निवड लायक माणसाची असून तिला वशिल्याचा अगर दबावा यत्किंचितहि वास येत नव्हता असें वरील प्रतिपादनावरून कोणालाहि खात्री होईल.

## निजामची चढाई

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोगली साम्राज्यास उतरती कळा लागली व त्याची जिकडे तिकडे फुतरओढ सुरू झाली. औरंगजेबाच्या तालमींत तयार झालेला निजाममुल्मुल्क हा मोगलांच्या पडत्या काळांतील कर्ता पुरुष असून त्यानें हें साम्राज्य वांचविण्याची पराकाष्ठा करून पाहिली. जेव्हां कोठेंच कांहीं जम बसे-नासा झाला तेव्हां त्यानें आपला वडील मुलगा गाजुद्दीनखान यास दिल्लीच्या कारभारावर ठेवून आपण दक्षिणेच्या सहा सुभ्यांची सुभेदारी पतकरून दक्षिणेंत प्रयाण केलें. निजाम दक्षिणेंत आल्यावर 'जळत्या घराचा पळता वासा' या न्यायानें तो जवळ जवळ स्वतंत्र झाला. बाजीरावानेंहि मराठी राज्याचा विस्तार करण्यास आलेली सुसंधि दवडली नाहीं. त्यानें एक हात दिल्लीच्या कारभारांत तर दुसरा हात मुलुख सोडविण्यांत गुंतवून आपले उद्योग एकसारखे सुरू ठेविले. त्यामुळें निजाममुल्मुल्क हा त्याचा प्रतिस्पर्धी झाला. एकच वस्तु दोघांना पाहिजे होती व आपलें इष्ट साध्य सोडण्यास कोणीच राजी नव्हता, यामुळें बाजीरावाचा निजामशीं जो एकदां झगडा सुरु झाला तो या दोन्ही सत्ताधाऱ्यांना पुरून उरला. निजामला पेशव्यांनीं अनेक वेळां रणांगणांत लोळवून दक्षिणच्या सहा सुभ्यांचें हें ग्रहण सोडविण्याची पराकाष्ठा केली पण निजाम म्हणून मागें सरला नाहीं; कीं त्यानें एकदां जो भाग मिळला त्याचें विसर्जन करण्यास सुखासुखी तयार झाला नाहीं. पेशवे-निजाम झगड्यांत बहुतेक वेळां निजामच लोळला जावयाचा पण तो पुरा होण्या-इतपत कधींच हलका झाला नाहीं. इतिहासांत नांव घेण्याजोगे जे निजाम-पेशव्यांचे अनेक संग्राम झाले त्यांत उदगीरच्या संग्रामाची गणना होते. खरोखर ही मोहीम भाऊसाहेबांनीं अभिमान वाटण्यासारखी यशस्वी करून दाखविली होती व यामागें कोणालाहि मिळवितां आला नव्हता एवढा मुलूख त्यांनीं त्यापासून हाबकूलं होता. असें असतांहि निजाम दावा सोडण्यास कबूल झाला नाहीं. उदगीरचा वचपा केव्हां काढीन याची विवंचना तहनाम्याची शाई वाळली नाहीं तोंच त्याला लागली होती. पानपताकडे त्याचे डोळे सारखे लागून गेले होते. शेवटची लढाई पौषांत झाली पण त्याआधींच भाऊसाहेबाची पानपतावर धडगत नाहीं याचा पेशव्यांच्या शत्रु-मित्रांनीं अंदाज बांधून ठेविला होता; आणि निजाम तर वर उत्तरेला होमकुंड पेटलें आहे तोंच दक्षिणेंत डोंब उठविण्याच्या बेतांत होता. पण नानासाहेबांच्या आगाऊ तरतुदीनें हा प्रसंग लांबणीवर पडला. लौकरच नाना साहेबाच्या मृत्यूनें नवीनच उद्भवलेलें 'सोनपत-पानपत' निस्तरण्याकरितां निजाम-च्या तोंडावरील सैन्य पुण्यास आलें व त्याला आयतें रान मोकळें झालें. नाना-स्वामीच्या मृत्यूची बातमी बाहेर पडते न पडते तोंच निजाम डेरेदाखल होऊन सरहद्दीवरील पेशव्याचा मुलूख मारूं लागला; पण लवकरच पावसाळा सुरू

झाल्यामुळें त्याला चार महिने स्वस्थ बसण्यावाचून गत्यंतरच नव्हतें. पेशवाईचीं वस्त्रें धारण करताना पुढें काय वाढून ठेविलें आहे याची अधिकारारूढ चौकडीला योग्य कल्पना होतीच. दिनचर्येकरिता घरातील सोनें नाणें मोडून स्नेह्यासोयऱ्या-कडे याचना करण्याची जेथें पाळी आली तेथल्या स्थितीचें काय वर्णन करावें (ले. १). उत्तरेंतील सर्व सरदाराच्या फौजा मोडलेल्या. राहता राहिले दक्षिणें-तील सरदार, पण त्याचा भरवसाहि तितपतच. येऊन जाऊन पटवर्धनावर सारी मदार, परंतु तेहि अनेक दृष्टींनीं नाखूष, अशा स्थितींत भरवशाच्या म्हशीला टोणगा होतो कीं काय अशी कर्णधारास चिंता येऊन पडली. सरदाराचें अगर पेशव्याचें कारभारीपण ही काय चीज असतें हें त्या त्या कारभाऱ्याच्या इतिहासात नमूद आहे. श्राद्ध करण्यास बसलेल्या बड्या यजमानाच्या उपाध्यायाची अवस्था व तत्कालीन कारभाऱ्याची अवस्था जवळ जवळ सारखी असे. पिंडाच्या नाव-गावापासून यजमानाच्या हातातलें उदक सोडीपर्यंत सर्व कृति उपाध्येबुवानाच करावी लागते, तोच प्रसंग कारभाऱ्याच्या नशिबीं असे. यजमानाचा खजिना रिता, त्यात तोंडे मिळवण्याचें काम कारभाऱ्याचें. रुसले फुगले सरदार कारभाऱ्यानेंच समजवावयाचे. यजमानाच्या आचरटपणावर पांघरूण घालावयाचें कारभाऱ्यानींच. इतकेंच काय पण बाहेरील राजकारणाबरोबरच घरातील धुसफुसी याचीहि, आलाई-बलाई कारभाऱ्याकडे, आणि इतकेंहि करून यजमानाची व त्याच्या गोतवळ्याची बेमर्जी होताच पेकाटात केव्हा लाथ बसेल याचा नेम नाहीं. या सर्व कसोट्या या वेळच्या पेशव्याच्या कारभाऱ्यास घासण्यास रुजू होता. रिता खजिना, रुसके सरदार, नाखूष यजमान, प्राणान्त करणारा शत्रु दारात उभा अशा स्थितींत साडे-तीन शहाण्यातला शहाणा म्हणूनच निभावला! इतरानीं वर्षींच बारामती तेरामती गाठली असती. असो, राघोबानीं झाकली मूठ सवालाखाची ठेवून निजामचें आव्हान स्वीकारलें व दसऱ्याच्या आधींच उभय दळात रणदुंदुभी झडूं लागल्या. त्यानें नमविता आलें तेवढें सैन्य जमवून पुढें प्रयाण केलें व तरुण पेशव्यानीं जादा सैन्यभरती करून मागोमाग यावें असें ठरविलें. निजामला जय्यत तोफखाना व बसोशीनें केलेली सैन्यभरती यापुढें पेशव्याची फौज म्हणजे सूर्या पुढें खद्योतवत् भासावी. उदगीरवर गेलेला मुलूख परत घेऊन शिवाय पेशव्याना प्रदेश घशात टाकल्यावाचून परत फिरावयाचें नाहीं अशी निजामनें प्रथमपासून घोषणा सुरू केली होती. उलट काहींएक न देता दोस्तीचा तह करून निजामनें आलें तसें परतावें हें राघोबानें म्हणणें. पण सलामीबरोबर जेथें सामान्य कुस्ती सुटत नाहीं, तेथें हा कुस्तीचा सामना निकाल झाल्यावाचून कसा सुटावा. निजामच्या फौजेंत हिंदूंना विशेष भरणा असताहि निजामअली पेशव्याना प्रदेश लाटून पोळून फस्त करण्याबरोबरच क्षेत्राना विध्वंस व देवस्थानाना उपद्रव आणे

हिंदुमात्रांना चीड आणणारे प्रकार करण्यास भ्याला नाहीं. नगरापासून उभय दळांत झटापटी सुरू झाल्या. त्यांत निजामला अपेक्षेप्रमाणें यश न येतां उलट मराठ्यांचीच त्यावर सलाबत होत गेली; परंतु त्याची गति कांहीं पेशवे थांबवूं शकले नाहींत. निजाम मार देत घेत मार्गशीर्षांत पुण्यानजीक अवघ्या पांच कोसांवर येऊन थडकला. मराठ्यांचा वाढता जोर आणि रामचंद्र जाधव व मिर मोंगल यांचें पेशव्यांकडेसच झालेलें आगमन पाहून निजाम पूर्वीचें म्हणणें सोडून राघोबाच्या इच्छेप्रमाणें कांहींएक न देतां घेतां दोस्तीचा तह करून जाण्यास राजी झाला. राघोबा व सखाराम बापू यांनीं आब कायम राहून गोडी होत आहे असें पाहून पुढील अनेक जिकीरीचे प्रश्न सोडविण्याकरितां निजामच्या स्नेहाची जरूरी विचारांत घेऊन मोठ्या शहाणपणानें निजामचें म्हणणें मान्य करून मिटतें घेतलें.

या वेळीं निजामाशीं विनामोबदला मिटतें घेतल्याबद्दल तत्कालीन लोकांनीं राघोबा व त्याचा सल्लागार सखाराम बापू यास खूप दोष दिलेला आहे. पण जबाबदार माणसाचे विचार व कडेच्या पोहणाराचे विचार यांत अंतःस्थितीच्या अज्ञानानें जो महत्त्वाचा फरक पडतो तोच येथेंहि दिसून येतो. निजामचा पराभव करणें जरी या वेळीं शक्य झालें तरी त्याला रसातळास पोंहोचविण्या-इतपत पेशवे समर्थ होते ही कल्पनाच साफ चुकीची होती. जी गोष्ट सामर्थ्यसंपन्न नाना-भाऊंना करणें शक्य झाली नाहीं ती असल्या विस्कळित स्थितींत राघोबानें केली नाहीं म्हणून दोष देणारे शहाणे कीं, उदगीरचा घास आबादींत पचवला, तूर्त इतकेंच पुरें, समजून पुढील उद्योगास मोकळे होण्याचा ज्यांनीं सल्ला दिला ते शहाणे याचा वाचकांनींच विचार करावा. तीस वर्षांपूर्वीपेक्षां हल्लीं तत्कालीन वस्तुस्थिति जास्त स्पष्ट होत आहे तेव्हां इतउत्तर राघोबाच्या विरुद्धपक्षाचे म्हणणें प्रभावी नसून त्याची कृतीच अधिक सयुक्तिक होती असें म्हणण्याचा खरा काळ आला आहे. सत्तावीस लाखांचा प्रदेश या वेळीं निजामला राघोबानें बहाल केला या म्हणण्याला रा. दत्तोपंत आपटे यांनीं या पूर्वीच खो दिला आहे (चं. क. १ पृ.) खुद्द माधवरावानेंच हा उरलीचा तह शके १६८३ पौष शु॥ १० सदाशिव दीक्षितास कळविला; तो असा 'मोगलअल्ली व रामचंद्र जाधव फुटून आले त्यांची जागीर चाळीस लक्षाची निजामअल्ली याजपासून घेऊन सल्ला केला' (दा. ख. १० ले. २) वास्तविक भारतवर्षांतील ज्या पत्राधारें मागें या तहाच्या बाबतींत सत्तावीस लाखांचा मुद्दा प्रस्थापित केला गेला त्या पत्राचा खरा अर्थ न समजल्यामुळें हा विपरीत ग्रह रूढ झाला होता. तेव्हां सत्तावीस लाखांच्या मोबदल्याचा मुद्दा डोक्यांतून अजिबात काढून टाकून विनामोबदला केवळ दोस्तीचा तह होऊन हें निजामचें महत्संकट संपविलें गेलें असेंच मानलें पाहिजे.

## अधिकारारूढ पक्षाचा पराभव

कार्याच्या वाढीबरोबर त्यांत भाग घेणाऱ्या लोकांचीहि वाढ होत असते व मग त्यांत पक्षोपपक्ष निर्माण होऊं लागतात. तोच प्रकार पेशवाईतहि झाला. बाजीरावानें सर्व हिंदुस्थानभर आपल्या कार्याचा व्याप जो एकदां वाढविला, तो एकसारखा वाढीला लागून, नानासाहेबाच्या कारकीर्दीच्या शेवटीं तर हिंदुस्थानच्या सत्ताधाऱ्यांत पेशव्यांकडेच अग्रपूजेचा मान आला. या सर्व घडामोडींमुळें पेशव्यांच्या पदरीं अनेक धर्मांच्या व अनेक जातींच्या लोकांचे जथेच्या जथेच वावरूं लागले. परदेशीय व परप्रांतातील लोकांनीं महत्त्वाच्या जागेवर आरोहण केलें. इब्राहिमखान गारदी, मुजफरखान पठाण, सुमेरसिंग गारदी, हीं माणसें नाजूक जागीं काम करीत असून ते पेशव्यांच्या विश्वासपात्रांत गणले जात असत. मग पेशव्यांच्या प्रांतांतील त्यांच्या आप्तवर्गीयांनीं महत्त्वाच्या जागा अडविल्यास वावगें काय झालें ? या सर्व लोकांचे जसे जातिनिविष्ट गट असत तसेच या अनेक गटांतून स्वभावविशिष्ट, समदुःखी लोकांचेहि पुन्हा पोटगट निर्माण झाले. अशा रीतीनें पेशव्यांच्या आश्रितांत नाना मतांचे अनेक पक्षोपपक्ष निर्माण होऊन त्याच्यांत पद्धतशीर संघटनाहि दिसूं लागली. पण ज्याप्रमाणें, शरीरातील जीवनरस जोंपर्यंत कार्यक्षम असतो तोंपर्यंत तो स्थायिक व आगंतुक रोगजंतूंना पचवून आपला प्रभाव गाजवूं शकतो, त्याप्रमाणेंच कर्ता मालक, नोकरांतील पक्षोपपक्ष जागच्या जागीं दाबून टाकून त्यांकरवीं इष्ट ती कार्यसिद्धि चोपून करून घेतो. नाना-भाऊंच्या तेजस्वी वातावरणांत पेशवेदरबारांतील पक्षोपपक्ष, विद्यमान असतांहि ते आपला प्रभाव गाजवूं शकले नाहींत; पण पुढील अल्पवयी यजमान व मोळसर प्रतिनिधि या दुकलीचा मतलबी लोकांनीं फायदा घेऊन कार्यकर्त्या लोकांत दुहीचें वातावरण निर्माण केलें. सुप्तावस्थेंत असलेल्या रोगाला निमित्तमात्र कारण पुरें होऊन तो कमकुवत शरिरांत यथेच्छ विहार करितो तोच प्रकार आताहि झाला. उदळीच्या तहाचें निमित्त पुढें करून अधिकारारूढ पक्षाविरुद्ध त्र्यंबकराव मामा, बापुराव फडणिस, गोपाळराव पटवर्धन वगैरेंनीं एकच गिल्ला करून पेशव्यांची आई गोपिकाबाई व पेशवा माधवराव यांस आपा पुरंदरे व सखारामपंत यांचे राजीनामे घेण्यास भाग पाडलें व नवीन मंत्रिमंडळ बनवून कारभार चालीस लाविला. अशा रीतीनें एक वर्षाच्या आत नानासाहेबाची व्यवस्था मोडून 'अवघा राम मवघा मालोराजा' इतपत मजल येऊन पोंहोचली. या वेळच्या अधिकारभ्रांतींत. या प्रतिस्पर्धीयांचा खरा राग सखारामपंतावर असून त्याला उगांतूनच नाहींसा करावा अशी या कटांतील सूत्रचालकांची सूचना होती; पण तें घडून आलें नाहीं (ऐ. ले. भाग १ ). सखारामपंतांचें या वेळचें घरीं बसणें त्र्यंबकराव मामादिकांना जसें रुचलें तसें राघोबाच्या पक्षपातीयांच्याहि पथ्यावर पडलें (पे.द. भाग १९ ले. ५)

यांवरून स्वतः सखारामपंत तरी या वेळीं पक्षातीत होता असें वाटतें. मग त्यानें घरीं कां बसावें याचें उत्तर शिल्लक उरतेंच. खुद्द माधवरावानें, सखारामपंतानें कारभारांतून अंग कां काढून घेतलें, हें आपल्या मातोश्रीस कळविलें आहे तें असें–' सखारामपंतानेंहि अंग काढून घेतलें आहे. कारभार करीत नाहींत म्हणतात. सारे कोंकणस्थ एकीकडे होऊन फशीं पाडतील यास्तव अंगानिराळें टाकितात.' ( ऐ. लें. सं. न. ५४ एल्. ) तेव्हां या वेळीं सारे कोंकणस्थ एक होऊन आपणांस फशीं पाडतील असें जें सखारामपंतांनीं कारभारनिवृत्तीचें कारण सांगितलें त्याचा नीटसा अर्थ ध्यानांत यावयास या चळवळीचा गताध्याय अवलोकिला पाहिजे.

## ' देशस्थ व कोंकणस्थ यांमध्यें चुरस '

या काळचीं पटवर्धनी दफ्तरांतील पत्रें पाहिलीं असतां या काळाला कै. वासुदेवशास्त्री खरे यांनीं दिलेला वरील मथळा अयथार्थ कोण म्हणेल ? गोविंद हरीचीं या चुरशीसंबंधींचीं जळजळीत पत्रें पाहिल्यावर शास्त्रीबुवांनींहि हा विषय हातीं घेऊन तो भक्कम ऐतिहासिक आधार निर्माण केल्यामुळें आम्हांलाहि बगल देऊन पुढें जाणें शक्य नाहीं. सखारामपंताला विरोध करितांना त्यांचें व्यक्तिमाहात्म्य व त्यांची जात वारंवार पुढें आलेली आहे तेव्हां हे दोन्ही मुद्दे थोडक्यांत सांगणें जरूर आहे. पटवर्धन मंडळी, बाबूजी नाईक, त्र्यंबकराव मामा व बाबुराव हे बापूंचे या वेळचे प्रतिस्पर्धी असून त्यांचा यांशीं केव्हांपासून संबंध आहे याचें उत्तर पाहिजे असल्यास जरा मागें गेलें पाहिजे. पटवर्धन वगळून बाकी तिघे पेशव्यांचे आप्त होते ही गोष्ट प्रथम ध्यानांत घेतली पाहिजे. बाबूजी नाईक व पेशवे यांचे जुने हितसंबंध पाहिले असतां या दोघांनीं एकाच क्षेत्रांत काम करणें म्हणजे सरकशींतील सिंहशेळीच्या मारूनमुटकून केलेल्या प्रदर्शनीय मैत्रीचाच नमुना होता. बाबूजी नाइकाचा पेशवे पदावर कसा डोळा होता व त्याप्रीत्यर्थ त्यानें स्वीकारलेला अडवणुकीचा मार्ग कसा बेमालूम होता याची ऐतिहासिक क्षेत्रांत वावरणारास योग्य कल्पना आहेच. तसेंच कर्नाटकांतून बाबूजी नाइकाला हुसकून देण्याचे नानासाहेबाचे प्रयत्नहि ' शठं प्रति शाठ्यं ' या स्वरूपाचे कसे होते हेंहि आतां स्पष्ट झालें आहे. या सर्व गोष्टी सखारामपंतानें पाहिल्या होत्या, किंबहुना त्यांत त्यांचाहि हात होता इतकें सांगितल्यावर नाइकांनीं सखारामपंतास ओढून काढण्याची सुवर्णसंधि कां दवडावी ? तीच गोष्ट मामांची. सखारामपंताची व मामांची पेशवाई-कारभारासंबंधीं दहा पंधरा वर्षें चुरस असून ती एकसारखी वाढतच होती; पण दोघेहि शहाणेच असल्यानें परिस्थिति ओळखून त्यांनीं ती चवाठ्यावर आणिली नाहीं. आतां परिस्थिति पालटतांच शहाणपणानें रजा घेऊन खरें स्वरूप प्रगट केलें. बाबुराव फडणिसाचे संबंध अद्याप प्रकट झाले नसल्यानें

त्या बाबतींत उगीच तर्कटें रचण्यात काय अर्थ आहे ? हीं सर्व जवळचीं कर्ती माणसें बाजूला सारून सखारामपंतास पुढें करण्यात नानासाहेबानीं एक साधा पण महत्त्वाचा व्यवहार साधला असें आम्हास वाटते. नानासाहेब व्यवहारदक्ष पुरुष असून त्यांचीं राजकारणे अगदीं खोल असत हें त्यांच्या अनेक कारस्थानात दिसून आलें आहे. गुणावगुण लक्षात ठेवून योग्य संधीवाचून ते बाहेर दाखवावयाचे नाहींत हा त्यांचा स्वभावविशेष इतर पेशव्यात क्वचित उतरला नाहीं आपल्या दौलतीच्या कारभारात आप्तेष्टाचा हात शिरू न देण्याची दक्षता जेथें सामान्य माणसेहि घेताना आढळतात तेथें ही साधी गोष्ट नानासाहेबासारख्या चतुरस्र पुरुषाच्या लक्षांत आली नसेल असें वाटत नाहीं. मामा यद्यपि शहाणे होते तरी त्याचा नाजुक संबध ध्यानात घेतल्यावर त्यानीं दिवाणगिरीचें पद सुशोभित करावें असें पेशवे घराण्यातील नानासाहेब व राघोबा याना वाटणें शक्य नव्हतें. खुद्द निंबकरावालाहि दिवाणगिरी पतकरल्यावर अवघ्या महिन्यातच आप्तेष्टाची कारभारातील लुडबुड नडली व या फंदात आपण कशाला पडलों असे त्याला होऊन गेले आणि पुढें बारा वर्षांनी यानींच सखारामपंताच्या शहाणपणाची वाहवा करून या पुरुषाच्या शहाणपणाचा खरा उपयोग पेशवे दौलत आप्ताच्या जाळ्यात अडकल्यामुळे झाला नाहीं अशी स्पष्ट कबुली दिली. (पे. द भा ५ ले. ३३) पण विशेष अभिनिवेषाला बळी पडून तरुण पेशव्यास व त्याच्या मातोश्रीस सखारामपंतास दूर सारण्याची भलतीच सल्ला त्यानीं या वेळीं दिली. पटवर्धन मडळीला सखारामपंताचा उत्कर्ष आधीं पासूनच सहन होत नव्हता व पेशव्याची दिवाणगिरी करण्याची आपली महत्त्वा- । पुरंदरे सखारामपंतामुळें पुरी होत नाहीं अशी त्याचीं समजूत झाली स न कळे. ही झाली वैयक्तिक विरोधाची पूर्वपीठिका. आता जो दुसरा सामाजिक विरोध त्याकडे वळू

## सामाजिक चुरशीची सुरुवात व स्वरूप

महाराष्ट्राचा पूर्वेतिहास पाहता कोंकणपट्टींतील निरनिराळ्या ब्राह्मण जातींनीं स्वकर्माध्ययन व शेती यावर गुजारणा करून आपला निर्वाह कित्येक शतकें चालविलेला आढळतो. साधी राहणी व पोटाला मिळण्याची खात्री यामुळें या वर्गांनीं स्थलांतराचा व राजकारणाचा विषय कधीं डोक्यात बागविलाच नाहीं. पण ही स्थिति स्वराज्य स्थापनेनंतर पालटली व ही मंडळी आस्ते आस्ते अंग झाडू लागली. शिवाजीमहाराजाना अंगीकृत राजकारणात स्वकीयाचा विशेष हात असण्याची विशेष जरूरी भासत असल्यानें त्यानीं सर्वच महाराष्ट्रीय हिंदु जाती घुसळून त्यातील नवनीत काढण्याचा सपाटा चालविला, तेव्हा कोंकणातील

ब्राह्मणांनाहि याचा थोडा-फार धक्का लागल्यावांचून राहिला नाहीं. शिवाजी-महाराजांच्या झेंड्याभोंवतीं इतरांप्रमाणें कोंकणांतील ब्राह्मणहि थोडेसे जमा झाले असतील. कोणत्याहि कामाची गोडी लावणें हेंच काम कठीण असतें; पण एकदां का गोडी लागली, कीं मग त्यांत न सांगतां, हजारों उड्या घेतात. तोच प्रकार कोंकणांतील राजकारणी ब्राह्मणी वातावरणासंबंधीं दिसतो. ही मंडळी राजकारणांत शिरण्यास प्रथम प्रथम बिचकली; पण लौकरच या बागुलबुवाची भीति नाहींशी होऊन वाढत्या प्रमाणांत मराठशाहींत कोंकणांतील ब्राह्मण दिसूं लागले. पुढें तर त्यांच्या जातभाईनीं पेशवाईसारख्या महत्त्वाच्या जागेवर आरोहण केल्यामुळें त्यांस खास आश्रयस्थान होऊन बसलें व कोंकणांतील ब्राह्मण स्थानभ्रष्ट होऊन घाटावर चमकूं लागून राजकारणी बनले. मराठ्यांना स्वतःचा राजाश्रय होता म्हणूनच एके काळीं सर्व हिंदुस्थानभर त्यांना आपली सत्ता गाजविता आली ना? व तसलाच जिव्हाळ्याचा राजाश्रय कोंकणांतील ब्राह्मणांना मिळाल्यावर त्यांनीं दर्भपंचांग फेंकून देऊन समशेर-लेखणीचा आश्रय केल्यास नवल कसलें? पहिल्या दोन पेशव्यांच्या कारकीर्दींत या मंडळीचा पुणें दरबारांत जोंपर्यंत भरणा बेताचाच होता तोंपर्यंत त्यांपासून राजकारणांत मुळींच अपाय होऊं शकला नाहीं; पण नानासाहेबाची कारकीर्द सुरू होतांच मूळची स्थिति पार पालटून प्रत्येक लहान-मोठ्या खात्यांतून कोंकणांतील ब्राह्मणांची संख्या डोळ्यांत भरण्यासारखी दिसूं लागली व नव्याजुन्याचा मामुली झगडा सुरू झाला. पण खंबीर दादल्यापुढें 'गरत' वा 'बटीक' सवतींना नुसती 'उठाव बोजा'ची सेवा करीत असतां न कळत कोपरखळ्या देऊनच जसें आपल्या द्वेषाचें अस्तित्व टिकवावें लागतें; तोच नमुना नाना-भाऊ असेपर्यंत पेशव्यांच्या पदरच्या देशस्थ, कोंकणस्थ ब्राह्मण नोकरांना करावा लागला. कार्याचा व्याप व अपरिहार्य जुने हितसंबंध विचारांत घेतल्यावर पेशव्यांना तरी आपल्या कारभारांत एकजात ब्राह्मण वावरूं देणें शक्यच नव्हतें व म्हणूनच परिस्थित्यनुसार सामदामादिकाचा आश्रय करून नेहमींच त्यांना वेळ मारून न्यावी लागत असे. हीं भांडणें होतीं व तीं आतां रंगांत आलीं होतीं हें आतां नव्या जुन्या पुराव्यानें मान्य केल्यावांचून गत्यंतरच नाहीं. तेव्हां आपापसांतील भांडणाचे परिणाम म्हणजे जो कार्यनाश, तोहि कबूल करावयासच हवा. असा हा बापूच्या अधिकारभ्रष्टतेच्या दोन प्रमुख कारणांचा इतिहास असून तो पुढील प्रगतिपर राजकारणांत अनेक जागीं नडल्यामुळेंच येथें त्याचा उल्लेख करावा लागला.

## चुलत्या-पुतण्यांचा बेबनाव

आबा पुरंदरे व सखाराम बापू स्थानभ्रष्ट होऊन घरीं बसले [ शके १६८३ पौष ] व त्यांच्या जागीं थोड्याच दिवसांत बाबूराव फडणीस व त्र्यंबकराव मामा आले. राघोबाचें काय झालें हें नक्की सांगतां येत नाहीं. तो बहुधा कांहीं दिवस

स्नानसंध्या करून तडजोडीनंतर पुन्हा कारभारात शिरला असावा, पण आता त्याला पहिलें स्थान मिळालें असेलसें दिसत नाहीं. राघोबानें उत्तरेस व रावानीं कर्नाटकांत जाऊन बंदोबस्त करावा असें प्रथम ठरलें, पण कारभाऱ्याकडून पैशाची तरतूद न झाल्यामुळें एकटा पेशवाच माघ शुद्धांत कर्नाटकांत रवाना झाला. जुने कारभारी घरीं बसले तरी जुन्या परिस्थितीनें काहीं आपलें स्थान ढळूं दिलें नसल्यानें नवे कारभारी स्थानपन्न होण्याची टाळाटाळ करूं लागले. तशांत राघोबा कायम असून स्वत ज्या पदाची अस्थिरता यामुळें तर त्यांना जास्त विचार पडला, पण राघोबानें जरूर तो खुलासा केल्यानंतर आणि मातोश्री गोपिकाबाई व पेशवा यांजकडून करारमदार करून घेतल्यावर प्रथम मामा आणि नंतर बाबूराव शिक्केमोर्तब यानिशीं दिवाणगिरीचा दरक चालवूं लागले. पेशवा माघ ते चैत्रअखेर कर्नाटकांत राहून ज्येष्ठ वा ५ स [ श. १६८४ ] पुण्यास आला. ही 'मुलूखगिरी थोडक्यांत बरीच झाली.' ज्या दिवशीं पेशवा पुण्यास आला त्याच दिवशीं मल्हारराव होळकरहि हिंदुस्थानांतून पुण्यास आला होता. पुढील तीन चार महिने होळकराचा मुक्काम पुण्यासच झाला असावा. या अवधींत चुलत्या पुतण्यांत मतभेदाचे कोणते प्रश्न उद्भवले याचा विद्यमान ऐतिहासिक साधनाधारें मुळींच थाक लागत नाहीं. अखेर भाद्रपद शुा ५ [ श. १६८४ ] ला राघोबा रुसून पुण्याजवळच्या वडगांवास गेला. गोपाळराव पटवर्धन वगैरेंनीं त्याला कैद करण्याची मसलत केली होती ही बातमी पार्वतीबाई–भाऊसाहेबांची स्त्री–कडून कळल्यामुळें तो उपलाण्या घोड्यावर बसून शनिवारवाड्यांतून मागच्या मार्गें पसार होऊन वडगांवास गेला [ पृ. १०६ ] असें या प्रसंगाबाबत बखरकाराचें म्हणणें आहे. पटवर्धनी दफ्तरांतील या काळचीं पत्रें पाहिलीं असतां या बखरकाराच्या म्हणण्यांत काहींच अर्थ नसेल असें वाटत नाहीं. राघोबा वडगांवाला गेल्यावर त्याची समजूत घालण्याचा गोपिकाबाईप्रभृतींनीं खूपच प्रयत्न केला, पण त्यांत यश आलें नाहीं. सखाराम बापू व मल्हारराव होळकर यांची मध्यस्थी वाया गेली. अखेर चार दिवसांनीं येतों म्हणून अनुष्ठानाच्या ब्राह्मणाला दक्षिणा देण्याचें निमित्त करून तो वडगांवहून जो निसटला *तो त्याच दिवशीं त्यानें कोरेगांव गांठलें. वडगांवीं पेशव्याचा बाग व वाडा* होता. येथेंच राघोबाच्या मुलाचें भास्कररावाचें चैत्र शुा २ ला बारसें झालें होतें. बहुधा असें वाटतें कीं, वडगांव येथें राघोबाची खासगत पागा असावी. त्यानें वडगांव सोडल्यानंतर भाद्रपद वा ८ शनिवारीं त्याचा मुक्काम नगरला झाला. या वेळीं त्याजजवळ अवघे शंभर राऊत होते. या वेळचा पेशव्याच्या घरांतील हा अनिष्ट प्रकार अनेक तऱ्हांनीं राज्यास अपायकारक असाच झाला. याची जबाबदारी राघोबा ज्या अर्थीं स्थानभ्रष्ट झाला त्या अर्थीं त्यावरच पडत आहे. पण विरुद्ध पक्ष अगदींच साळसूदपणें वर्तन होता असें मात्र नाहीं. कारभाऱ्यांना घरीं बसविणें व राघोबाला शह देणें एवढेंच नव्हे, तशांत अशा नाजुक प्रसंगीं 'मोगलाई'

मसलतीचा अंगिकार करण्याचा घाट घालणें सर्वथैव अनुचितच होय. सामर्थ्यसंपन्न होऊन नंतरच्च असले कडक वा सौम्य 'बादशाही' मार्ग कधीं कधीं तात्पुरते हितप्रद होऊं शकतात; पण एकंदर परिस्थितीचा विचार करतां पेशवाईच्या चालकांनीं घरांतच 'मोगलाई' मसलती चालविण्याची जरा घाईच केलेली दिसते. राघोबा हा बोलून चालून घरचाच; पण सखाराम बापूहि कांहीं अगदीं दूरचा नव्हता. हा इष्ट तर तो मित्र, पेशव्यांच्या दौलतीच्या वाढीकरितां त्यानें अनेक तऱ्हेनें कष्ट केले होते. इतकेंच नव्हे तर राघोबा अगर बापू जें कांहीं करीत तें सर्व अहितकारीच होतें ही कल्पनाच मूळ आग्रही होती. नानासाहेबादि मंडळी त्यास घरचाच समजत असतां त्यावर* मोगलाई मसलत करण्याचो जेथें जबाबदार माणसें सल्ला देतांना आढळतात तेथल्या वातावरणाची वास्तविक कल्पना करण्यास अन्य पुराव्याची काय जरूर? पेशवाईतील या वेळच्या मोगलाई प्रयोगाच्या अनिष्ट कल्पना पुढें सत्यसृष्टींत कशा उतरल्या हें जगजाहीरच आहे; पण एकंदरींत कोणाच्या का चुकीनें होईना या वेळचा गृह-कलह पुढील उद्योगाला जबरा शह होऊन बसला व निजमाची तर केवळ पंढरीच पिकली! राघोबाबरोबर आबा पुरंदरे, सखाराम बापू व कृष्णराव पारसनिस होते. पुरंदऱ्याची समजूत पटून तो लवकर परत फिरला; पण सखारामपंत मात्र पुढें चालूं लागला. मंडळीच्या या शहावर पेशव्यांनीं फौज रवाना केली होती पण तिच्या मुख्याला प्रथम त्यांचे मागें मागें जाण्याचाच हुकूम होता. नगरच्या सुमारास विठ्ठल शिवदेव, नारो शंकर व अंताजी माणकेश्वराचे मुलगे त्यास ससैन्य येऊन मिळाले व एकसारखा जमाव वाढत चालला. ही सर्व मंडळी निजामचें सहाय घेणार असें दिसून येतांच पेशव्यानें राघोबाला ताब्यांत घेण्याचा हुकूम केला, पण त्याचा कांहीं एक उपयोग न होऊन राघोबा व निजामचा सरदार आश्विनांत औरंगाबादेस एकत्र झाले व पुढील मसलती घाटूं लागल्या (पे.दप्तर भा.१९ले.१३). या वेळीं राघोबाजवळ पांच हजार फौज जतली होती. पुढें काय होणार याची योग्य कल्पना आल्यामुळें पेशव्यानें राघोबाच्या पाठलागास पाठविलेल्या सरदारास परत बोलावून घेतले व फौजेचा गाहा करण्याची तजवीज. चालविली. राघोबानें या वेळीं मदतीदाखल निजामास काय देऊं केलें होतें याचा नीटसा उलगडा होत नाहीं. निजामचे मुरादखान व व्यंकटराव निंबाळकर हे सरदार राघोबाच्या मदतीकरितां आले. त्याच्या फौजेंत विशेष भरणा मोगलांचाच होता. पेशव्यांच्या घरचें भाऊ भाऊ, चुलते पुतणे, एकजीव होऊन शत्रूवर तुटून पडण्याचा जुना काळ जाऊन घरांतल्याच कर्त्या पुरुषांनीं एकमेकांच्या नरडीचा

---

*'सखाराम सर्व नाश करावया निर्माण जाहाला आहे! त्यास ठिकाणी ठेवावयाची बुद्धि कोणासच जाहली नाहीं. एक तेवढी गोष्ट केली असती तर इतके खेळ कशास होते? आताहि हर इलाज करून तेवढे कार्य केलेंच तरी बरे आहे.' [ ऐ. ले. नं. ७१ ]

घोट घेण्याचा प्राप्त झालेला नूतन काळ पाहिल्यावर ' कालाय तस्मै नमः ' म्हणूनच समाधान करून घ्यावें लागतें. असो. कजेलीवर येण्यापूर्वी सामाचा शेवटला प्रयत्न झाला. माधवराव विजयादशमीस डेरे दाखल होऊन वानवडीवर मुकाम झाला; पण तेथें त्यास ज्वराची पीडा झाल्यामुळें चार दिवसांनीं कारभाऱ्यांसह तो पुन्हा पुण्यास परत आला. या वेळीं राघोबाकडून रामचंद्र गणेश व कृष्णराव काळे मध्यस्थीस आले होते. 'उभयतां श्रीमंत समजतील व माधवरावाचे कार्यभागी तोंडघशी पडतील. दादाची तयारी विशेष असून त्यापुढें याचा निभाव लागणें कठीण' असा लोकांनीं या तडजोडीचा निष्कर्ष तेव्हांच काढला होता. अखेर ही शिष्टाई व्यास गेली व दोन्हीहि पक्ष वर्दळीवर आले. तत्पक्षीयांचा पुन्हा उत्कर्ष होतो असें पाहूनच पेशवेपक्षीयांनीं यापुढें हें प्रकरण धसास लाविलें; नाहीतर पुढील प्रसंग टळला असता असें विद्यमान पुरावा सांगत आहे. तेव्हां पुढील प्रांतीचा अर्धा वाटा त्यांच्याहि पदरांत पडतो.

## दोन हात तर होऊं द्या !!

'एक वेळ लढाई व्हावी उपर सल्ला होणे तर व्हावा' (ऐ.ले.स.न ९) अशी खुद्द गोपिकाबाईचीच इच्छा असल्यानें समेटाचे वगैरे प्रयत्न निष्फळ होऊन प्रकरण हातघाईवर आले व यादवीला तोंड लागलें. इकडून पेशवा व तिकडून दादा आपापल्या लवाजम्यानिशीं मोठ्या स्फुरणें चालले असतां उभय दळाची घोडनदीवर कार्तिक वा ६ स रविवारी गांठ पडली व लगेच लढाईला तोंड लागलें. दोघांच्या दरम्यान नदी असल्यानें प्रथम बाण, जेजाला यासारख्या दुरून मारा करणाऱ्या शस्त्रास्त्रांनींच सुरुवात झाली. दादाची पंचवीस-तीस हजार फौज असून पेशव्याकडे दहा-पंधरा हजारापेक्षा जास्त सैनिक नव्हते. लढाई ऐन रंगात येऊन तरवारीशीं गांठ घालावयाची, पण नदीला डोक्याइतकें पाणी असल्यानें नाइलाज झाला व संध्याकाळ झाल्यामुळें लढाई अनिर्णित राहिली. एकंदरींत 'नदीनें अब्रू राखिली हेंच खरें.' कार्तिकाच्या महिन्यात घोडनदीसारख्या क्षुल्लक नदीला इतकें पाणी असणें शक्य नाहीं तेव्हा मेघराजाच्या अकल्पित आगमनाचेच हें फळ दिसतें. कांहीं झालें तरी एका झटक्यात सर्व ग्रंथ पुरा करण्याची दादाची इच्छा अतृप्त राहिली. त्याच दिवशीं मल्हारराव होळकर, बाबूजी नाईक, पिराजी निंबाळकर, पेशव्याकडून सल्ल्याचें बोलणें करण्याकरिता आले. दुसरे दिवशीं खुद्द माधवरावच चुलत्याच्या भेटीस येणार होते, पण कुयोगामुळें त्याचें येणें लांबणीवर पडलें. चार दिवस घरीच वाटाघाट झाली, पण जम बसला नाहीं. 'आम्ही बहुत प्रकारें तूट खाली परतु तितरीहि त्यानी एकीकडे ठेऊन दगाच करावा हाच मानस केला. आमचे विचारें करणें तें करावें चौघाचें चालवावें कारभार यानीच करावा हे प्रकार कबूल केले ते सारे कृत्रिमसे नजरेस पडले'

( ऐ. ले. नं. ९० ) असें खुद्द पेशव्यानेंच या वाटाघाटीचें स्वरूप वर्णिलें आहे. अर्थात् 'फिरून यत्न करून पाहा'वर प्रकरण येऊन पुनरपि हालचाली सुरू झाल्या. पेशवा घोडनदी सोडून मागें हटत चालला तों दादासाहेब सडे होऊन पाठलागास लागले. उभयांची कार्तिक वा ।। १२ रोजीं आलेगांव येथें गांठ पडून लढाई सुरू झाली. तरुण पेशव्यानें स्वतःच फौजेचें आधिपत्य स्वीकारलें होतें. पेशव्याच्या तर्फेचे होळकर वगैरे सरदारांनीं मेहनत करण्यास कमी केलें नाहीं; पण फितुरी सरदारांनीं पळ काढल्यामुळें लढाईचा रंग पालटून पेशव्याच्या फौजेचा धीर सुटला व चुलत्यास विजयश्रीनें माळ घातली. उरली फौज कशीबशी सावरून पेशवा भीमेपार झाला. आतां सल्ल्याविना मार्गच नाहीं असें पाहून सरदारांच्या व कारभाऱ्यांच्या अनुमतानें पेशवा दुसरे दिवशीं चुलत्याच्या स्वाधीन झाला. पेशव्यांच्या संमतीनें गोपाळराव पटवर्धनानें मिरजेचा रस्ता सुधारला व कारभारी बापूराव आणि मामा गोपिकाबाईकडे जातो म्हणून जे निरोप घेऊन निघाले तो त्यांनीं बारामती गांठली. अशा रीतीनें पेशव्याच्या फौजेची वाताहत होऊन चुलत्याची सरशी झाली. या आलेगांवच्या लढाईंत पेशव्याची फारच खराबी झाली. तीन-चारशें माणूस कामास आले. गोपाळराव पटवर्धनांचे पथकांतील खाशी दोन तीन पटवर्धन मंडळी जखमी झाली. वाटाघाटीनंतर जुनी, नानासाहेबाची व्यवस्था कायम झाली व पुन्हा कारभार सुरळीत चालण्याचा रंग दिसूं लागला. इतकें जरी झालें तरी गेलेले अधिकार परत मिळविण्यापेक्षां राघोबा व तत्पक्षीय हे सूडाच्या वगैरे वाममार्गाचा आश्रय करण्याच्या विचारांत नव्हते. पेशव्याच्या बाजूचे लोक तेव्हां किंवा पुढेंमागें परत येते तरी त्यांच्या अब्रूला वगैरे धक्का लागला नसता अशी खुद्द पेशव्यानेंच कबूली दिली आहे. पण चुलत्या-पुतण्याच्या समजुतींतून काय निष्पन्न झालें व माधवराव-पक्षीयांचें करणें बरोबर कीं चूक याचा विचार करण्याच्या आधीं या आख्यानांतून जें अकल्पित उपाख्यान जन्माला आलें त्याचा विचार केला पाहिजे. आपापसांतील भांडणामुळें या मोठ्या दौलतीचें अकल्याण होत आहे व तिचा घांस घेण्याकरितां टपून बसलेल्या बकांना मात्र यामुळें सुसंधि आपण होऊन देत आहों याची माधवरावालाच काय ती कल्पना होती व राघोबा या शब्दज्ञानाला पारखा होता असें थोडकेंच होतें ? लहानांपासून थोरांपर्यंत सर्वच ब्रह्मज्ञानी; पण त्याप्रीत्यर्थ स्वार्थत्याग करण्यास मात्र कोणीच राजी नव्हता. वैराग्याच्या बाता मारणारे शब्दज्ञानी कृतीच्या विद्युत्स्पर्शानें जसें कोठल्या कोठें फेंकले जातात तोंच प्रकार या वेळच्या गोष्टीपंडितांच्या बाबतींत दिसून येतो. हिंदु-हिंदूंची एकी, स्वकीय-परकीयांमधील फरक, आपापसांतील यादवी, परकीयांच्या आक्रमणाचें स्वरूप असल्या राष्ट्रोपयोगी जिव्हाळ्याच्या विषयाचें तत्कालीन लोकांचें ज्ञान पाहिलें असतां आजच्या देशभक्तालाहि ते

लोक कांहीं कांहीं बाबतींत हरवितील; पण त्याच लोकाची कृति पाहिली असतां हसावें कीं रडावें हेंच कळत नाहीं. एवंच, पेशवाईच्या काळच्या मराठ्यांना कळत होतें पण वळण्याचा प्रश्न निघाला, कीं त्या लोकांकडे पाहण्याची सोयच नव्हती. पण सदोष ऐहिक व्यवहारांतील राजकारण हा अत्युच्च बिंदु. तेव्हां सर्वकाळीं सर्वत्र दिसून येणारे तेथले चमत्कार पेशवाईतहि दिसत होते असें समाधान मानून घ्यावें म्हणजे झालें.

## निजामनें 'अखेरी' मारली

*भिन्न प्रकृतीचे, नाना मताचे लोक एकाच गाड्याला जुंपून त्याजकडून* चोपून काम घेण्यांत दिसून येणारें नानासाहेबाचें कौशल्य दादा-भाऊंना वागविण्याच्याहि बाबतींतहि चांगलें कसाला लागलें. भाऊसारखा तल्लख बुद्धीचा मनुष्य हातचा जातो असें पाहतांच नानासाहेबानीं त्यावर जो एकदां विश्वास टाकला त्यात शेटपर्यंत काडीइतकाहि फरक केला नाहीं (ले. ११८). तसेंच दादाची भोळसरवृत्ति ध्यानात घेऊन कधीं धाकदपटशा दाखवून, तर कधीं *अंजारून गोंजारून त्याकरवीं* केवढीं मोठालीं कामें पार पाडलीं! हें सर्व करताना नानासाहेबीं बनियावृत्तीचा त्याग करून खऱ्या खुऱ्या स्वार्थत्यागाचाच अवलंब केला होता हें विसरतां कामा नये. पदराला खार लावून न घेतां नुसत्या शाब्दिक मोठेपणानें पोरसुद्धां फसत नाहीं असें व्यवहारशास्त्र सांगतें. राघोबा भोळा होता, दुसऱ्यानें बनवावा तसा बनणारा होता, सर्व कांहीं होता; पण त्याला महत्त्वाकांक्षा असून *त्याचा दौलतींत भाग* होता याची वाट काय! त्याच्या वृत्तींतील दोष आतां एकदम प्रकट झाला असें थोडेंचं होतें! ती जशी मागें होती तशीच आताहि पण होती. फरक झाला असेल तर तो त्याला वागविणारांत झाला होता. स्वभावविशेष ध्यानांत घेऊन आपुलकीच्या नात्यानें त्याला वागविणारे नाना-भाऊ जाताच शत्रूचा फर्दनकाळ असलेला दादा, घरच्या म्हातारीचा काळ होऊन त्याची गणना पेशवाईच्या किर्दींत झाली. गोपिकाबाई राधाबाई नव्हती व माधवराव भाऊसाहेब नव्हते हेंच खरें. आजच्या *काळांत अठरा वर्षें उमरीचा मनुष्य पोरांत गणला जातो; पण त्या वेळीं त्याला* कर्ताच समजत. असें न मानल्यास तत्कालीन कित्येक तरुणाच्या कर्तृत्वाला तरी बट्टा लागेल;' नाहींतर त्यांचीं वयें तरी वाढवावीं लागतील. वास्तविक पाहतां माधवराव या वेळीं सुद्धां स्वतःची बुद्धि चालविण्यास समर्थच होता. पण वडीलधाऱ्यांची भीड व स्वार्थत्यागाची कमनरता यांमुळें त्याचें राजकारण व्यावहारिक ज्ञानाच्या कसोटीवर शंभर नंबरी ठरलें नाहीं. असें नसतें तर दादाची न्याय्य आकांक्षा, वाढता जोर व निर्मळ मनोवृत्ति लक्षांत घेऊन त्या मोठ्या दौलतीच्या कल्याणाकरितां तो कायावाचामनेंकरून झटत होता; तिचा आव त्यानें जाऊ दिला नसता. आपल्या घरचीं कुलंगडीं चवाट्यावर येऊन आव जाईपर्यंत, घोण-

ताहि विषय ताणणारास कोणीहि व्यवहारज्ञ म्हणत नाहींत. आधीं राघोबा निजामपर्यंत जाऊंच कां दिला? यद्यपि तो गेला आणि पुन्हा घरांत येण्याची भाषा बोलूं लागल्यावर, आपपर सामर्थ्याची कल्पना झाल्यावरहि, भलत्याच फंदांत पडून झांकली मूठ उघडण्यापर्यंत पाळीच कां येऊं दिली? सर्वच कांहीं बायकी व पोरकट! अर्थ पाहिला तर कशांतच नाहीं. घोडनदीवर पेशव्याचा नुसता पराभव झाला नसून तेथें पेशवाईच्या भ्रमाचाच भोपळा फुटला व निजामनें अविलंबें त्याचा पुरेपूर फायदा घेतला. गेले सालीं गर्वारूढ होऊन आलेला हा राऊत, कोसळून कसा पडला हें मागें येऊन गेलेंच आहे. पण आतां शिंक्याचें तुटतांच या बोकोबाचें चांगलेंच फावलें. चुलत्या-पुतण्यांनीं कसें तरी साळ्याची गाय नि माळ्याचें वांसरू करून जमविलेलें सामर्थ्याचें खास प्रदर्शन उघडतांच, दबा धरून बसलेल्या निजामनें ताडकन उडी घेऊन सर्वांच्या तोंडचें पाणी पळविलें. तीस हजार फौज व १५० तोफा अशा जय्यत तयारीनें चुलत्या-पुतण्याचा कलमा कलमांचा कीस पडत आहे तोंच हा प्रगट झाला (मार्ग. शु. ६, ले. ९). यजमान येतांच राघोबाकडे असलेलें मोंगल सैन्यहि त्याला जाऊन मिळालें. आतां राघोबाजवळ काय राहिलें; तर ज्यांना नालबंदी मिळाली नाहीं म्हणून जी 'असून अडचण व नसून खोळंबा' अशी फौज. रावाची फौज तर पळी. अशा एकत्र झालेल्या चुलत्या-पुतण्याला व सामर्थ्यसंपन्न (!) पेशवाईला निजामअल्लीनें काय सवाल टाकला असेल बरें? या मानी पुरुषाला जें डाचत होतें तेंच तो ओकला व कांहीं एक हालचाल न करितां जरूर तें पदरांत पाडून घेऊन चालता झाला. ही झाली निजामची समजूत.

## पुनश्च घरचे पेच

[ श. १६८४ पौष-माघ ]

निजामची समजूत कशी केली व घरची व्यवस्था कोण्या प्रकारें लाविली हें खुद्द माधवरावाच्याच शब्दांत देतों म्हणजे स्वतंत्र विवरण करण्याचें कारण राहणार नाहीं.

ऐ. ले. सं. नं. ९४ मार्गशीर्ष शु॥ ५ श. १६८४

### पेशव्यांचें गोपिकाबाईस पत्र

छ १ जमादिलावलीं [1]तीर्थरूप डेऱ्यास आहे. बहुता प्रकारें समाधान केलें कीं, " दौलत सारी तुमची आहे. मजला दौलतीची आशा नाहीं. परंतु कारभारीयामुळें इतका प्रकार परस्पर झाला. दौलत मोठी. दौलतीमध्यें द्वेष फार झाला; यामुळें दौलतीस पेच भारी पडत चालिले, म्हणून इतका अर्थ करणे आला. त्यामुळें मन माने तैसा सरंजाम सरदारांस व मोंगलास

---

१ राघोबा

कबूल करणें प्राप्त झाला. परंतु याउपर सभाळून देणें तो देतो निजामअलीचा निकाल प्रस्तुत स्नेहाच्या रीतीनें काढून माघारा लावितों. उपरांत फौजेचा बंदोबस्त करून हिंदुस्थानात जाऊ. कांहीं फौज कर्नाटकांत रवाना करू. निजामअलीच्या स्नेहामुळें देशी पेंच राहणार नाहीं. यामुळें हिंदुस्थानचा व कर्नाटकाचा बंदोबस्त होऊन येईल. वर्षा दोन वर्षांनीं दौलतीचा बंदोबस्त झाल्यानंतर सर्व गोष्टी फिरून अनुकूल होतील. मोगलावर पेंच पडला तेव्हां त्यानें साठ लक्षाची जहागीर व किल्ले जे मागितले ते सरकारांत देऊन [ तह करून घेतला ] मसलत काबूस आली त्यास आम्हास देणें प्राप्त झालें. या गोष्टीस चिंता नाहीं. राजनीति अशीच आहे. तुम्हांखेरीज व तीर्थरूप मातुश्रीखेरीज मला दुसरा अर्थ किमपि नाहीं." याप्रमाणें डोळ्यांत पाणी आणून बहुत ममतेनें भाषण करून संतोषविलें. तीर्थरूपाचे मनांत विकल्प किमपि नाहीं. राजश्री आबा पुरंदरे व सखाराम बापू उभयतांचे चित्त चार दिवस (आम्हांसी) ठीक नव्हतें. उपरांत राजश्री अंतोबा रास्ते यांचे मार्फतीनें साफ चौकशी करून बोलले कीं, सारी दौलत तुमची आहे. द्वेषामुळें इतका प्रकार झाला. याउपर स्वामींनीं व बाईसाहेबांनीं कृपा करून दौलतीचे कारभाराचा भार आम्हांवर द्यावा म्हणजे सर्व बंदोबस्त होऊन मर्जीप्रमाणें वर्तणूक होईल यांत अंतर होणार नाहीं. अशा कित्येक गोष्टी निखालसपणें बोलले. त्यांचें बोलणें चालणें पहातां निखालसता फार चांगली आहे. दिवसें दिवस पुढें निखालसता होत जाईल. रा. त्र्यंबकराव मामा व बाबुराव या उभयतांस भेटीसमयीं तीर्थरूपास भेटावयासी धीर न पुरवे तेव्हां उभयतांस सांगितलें कीं, सिंहगडास मातुश्री बाईसाहेबांकडे जाणें. तेथें राहणें. ते गोष्ट त्यांनी न करतां बारामतीस राजश्री बापूजी नाईक यांजकडे गेले. त्यांनीं आपले जिमेस करून तीर्थरूपास विदित केलें. तीर्थरूपाचे मनांत त्याची अब्रू घ्यावी ऐसें नाहीं. दौलतींत पैशाची ओढ फार आहे. उभयतांनीं कारभार पुण्यांत केला परंतु आपला पदरचा पैसा दौलतीस लाविला नाहीं. शिलकी चाकर बहुतां दिवसांचे. यामुळें कांहीं पैसा घ्यावा लागेल ऐसें मानस आहे. निजामअलीच्या भेटी होत तोंपर्यंत बारामतीस राहतील. उपरांत लष्करांत आणितील. अब्रूस धक्का वगैरे नाहीं. अस्थिरभाव आहे. आम्हांकडील लोकांचा द्वेष तीर्थरूप करीत नाहींत. सर्व मंडळीचें समाधान करितात. आमचे भेटीचे समयीं उभयतां भेटते तर इतका प्रकार होता ना. राजश्री गोपाळराव मिरज प्रांतीं गेले, उत्तम केलें. या उपर त्यांणीं राजश्री गोविंद हरी व चिंतो हरी यांचीं पत्रें तीर्थरूपास पाठवावीं कीं, 'राजश्री गोपाळराव

चुकलें. याउपर क्षमा करावी. अभयपत्र सादर झाल्यानंतर गोपाळरावास घेऊन सेवेशीं येतों.' हा प्रकार झाल्यास तीर्थरूप कबूल करतील. तीर्थरूपांचीं पत्रें गोविंद हरी व त्र्यंबक हरी या उभयतांस सदर्हू मजकुराचीं गेलींच आहेत. नानाप्रकारचें वर्तमान मनस्वी लोक सांगतात व लिहितात. तो प्रकार येथें किमपि नाहीं. वडिलीं चित्तांत दुसरा अर्थ आणूं नये. तीर्थरूपांचें चित्त बहूत कोमल आहे. समाचार बरवेवर घेतात. दिवसेंदिवस अधिकोत्तर चित्त कोमल होईल व कारभारी यांचे चित्ताची साफी होत जाईल. येणेंकरून दौलतीची वृद्धी होत जाईल. वडिलीं तीर्थरूपांस समाधान पत्रें वारंवार पाठवीत जावीं. सल्लख करते समयीं कारभारी उभयतां व गोपाळराव यांचे विचारें केला. तेव्हां त्र्यवर्गानी आपण होऊन सांगितलें कीं, याउपर ओढून धरूं नये. आमचा प्रयत्न राहिला नाहीं. सल्लख करून भेटावें. ऐसें सांगितल्यावर राजश्री रास्ते यांस तीर्थरूपाकडे पाठवून भेट घेतली. रवाना छ ३ जमादिलावल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

मोगलाची समजूत, स्वकीयांचा बंदोबस्त, चुलत्याची व कारभाऱ्याची मनःस्थिति व पुढील उद्योगाचा आराखडा यांचा या पत्रांत एकत्र निकाल येऊन गेल्यानें त्याविषयीं पुन्हा लिहिण्याचें कारणच उरत नाहीं. पेशव्यांच्या अपेक्षेप्रमाणें एकशिवाय बाकी सर्व प्रश्न सुटले, म्हणजे हत्ती गेला व शेपूट राहिलें; या थराला सर्व येऊन पोंहोचलें होतें. हें शेपूट म्हणजे पेशवेपक्षीयांची व्यवस्था हें होय. सुंभ जळलें तरी पीळ जसा कायम राहतो तोच प्रकार स्वकीयांची व्यवस्था करितांना पेशव्याच्या प्रत्ययास आला. 'प्रसंगावर नजर देऊन मजप्रमाणें आपणहि पड खावी' ही पेशव्याची काकुळत पटवर्धनादिकांना पटली नाहीं. पुनश्च 'सखारामा'ची झालेली चलती त्यांस आवडली नाहीं व हा मार्गांतून कसा नाहींसा करावा याचाच त्यांस ध्यास लागून राहिला. पेशवा व गोपिकाबाई यांनीं आपल्यास तोंडघशीं पाडलें असेंहि त्यांना अधूनमधून वाटत असे. एतावता पटवर्धनाची समजूत पटली नाहीं, आणि अखेर या शिरजोरावर दंडप्रयोग करण्यापर्यंत मजल येऊन ठेपली. पंधरा-तीन वारांत पुणें, सातारा येथील व्यवस्था लावून चुलतेपुतणे पटवर्धनांच्या व हैदराच्या बंदोबस्तास पौष वद्यपक्षीं साताऱ्याहून निघून दक्षिणेस चालूं लागले. गोपाळराव आपल्या जमावानिशीं मिरजेच्या आसपास असून इतर पटवर्धन मंडळी खुद्द मिरजेच्या बंदोबस्तास गुंतली होती. घोडनदीवर वाताहत होतांच पटवर्धन पुढील तजविजीस लागले. भोंवतालच्या सत्ताधाऱ्यांकडे त्यांचीं राजकारणें सुरू होतीं. कोल्हापूरकर, निजाम, निंबाळकर यांकडे बोलणें सुरू असून पेशवे जो कांहीं बरा-वाईट मार्ग स्वीकारतील त्यावर

त्याचे सारे उद्योग अवलंबून होते. 'सखारामा'ला दूर सारून पूर्ववत् पेशवे-दरबारात आपली बडीजाव असावी ही त्याची मनीषा आता तृप्त होण्याची वेळ नव्हती. पेशव्याला आपले दौलतीचें भवितव्य दिसत असून यापुढें नसत्या अभिमानाला पेटून भलत्याच गोष्टी करण्याला तो राजी नव्हता. सखारामपंताच्या गैरहजेरींत राज्यरक्षणाच्या कामीं नूतन कार्यमार्गीनीं दाखविलेली ढिलाई त्याच्या डोळ्यासमोर असून त्याची कुवत त्याच्या ध्यानात येऊन चुकली होती असें जरी होते तरी त्या मंडळींविषयींचा त्याचा आत्मीयत्वाचा जिव्हाळा यत्किंचितहि नष्ट झाला नसल्यामुळें तूर्त व्यवस्था लागेपर्यंत पड खाण्याची सूचना तो करी, पण या मंडळींना–विशेषत पटवर्धनांना त्याचें म्हणणें पटेना. अखेर पटवर्धनी खेळ दडाई होउन बसले व त्या दिशेनें पेशव्याच्या हालचाली सुरू झाल्या. आबा पुरंदऱ्यानें साताऱ्याहून दौड मारून गोपाळरावास जमखिंडीजवळ गाठलें व पौष शु॥ ११ स त्याला लुटून फस्त केलें. गोपाळराव पन्नास पाऊणशें राउतानिशीं मोगलाईंत निघून गेला. इकडे इतर पटवर्धनमंडळींनीं मिरज झुजविण्याची जय्यत तयारी केली पेशव्यानीं पौष शु. १५ च्या सुमारास मिरजेस वेढा दिला. त्या वेळीं पेशव्या जवळ २५।३० फौज जमा झाली असून वेळ पडल्यास जवळच असलेल्या निजामास मदतीला बोलावण्याचें ठरलें होतें. प्रथम पेशव्यानें आपल्या फौजेचे दोन भाग करून आबा पुरंदऱ्यानें कर्नाटकात जावें व त्रुलते पुतण्यानीं मिरज घ्यावी असें ठरलें होते पण असे केल्यानें मिरजेचे काम तडकाफडकीं न होता रेंगाळत राहील व पुढील उद्योगाला खो बसेल असें ध्यानात आल्यानंतर पहिला बेत फिरून सर्व फौज मिरजेच्या शहाला गुतली व कर्नाटकचें काम मागें पडलें. पटवर्धनानीं मिरज झुजविण्याची फडेकोट तयारी केली असल्यानें मिरजेनें पेशव्याचा एक महिना घोटाळा केला. गोपाळराव प्रथम निजामाकडे जो गेला तो त्यानें आपणास मिरजेच्या वेळ्याच्या कामीं मदत करावी म्हणून गेला होता, पण निजामला या वेळीं पेशव्याशीं बिघाड करणें उचित न वाटल्यामुळें तो पटवर्धनास मदत करू शकला नाहीं.

तेव्हा पटवर्धनाना मिरज पेशव्याच्या स्वाधीन केल्यावाचून दुसरा मार्गच उरला नाहीं अखेर पटवर्धन व पेशवे यात तडजोड होऊन माघ वा॥ २ स मिरजेवर पेशव्याचे निशाण फडकू लागलें. इतकें जरी झाले तरी पटवर्धनाशीं पेशव्याची वागणूक सहानुभूतीचीच होता. मिरजेशिवाय बाकी सर्व ठाणीं त्याजकडे राहिलीं तरी पटवर्धनाची असंतुष्टता कायम राहून 'सखारामा'बरोबर पेशवाईच्याहि नाशाला ते आता लागले कितीहि विचार केला तरी यापुढील पटवर्धनी उद्योग दोषार्हच ठरतात. मिरज लढविण्याकरिता निजामची पटवर्धनानीं मदत मागितली एथपर्यंतचा भाग तत्कालीन राजकारणात उपेक्षणीयच ठरला होता अशी त्या काळची मुळीं विचारसरणीच होती. "याचेंच (पेशव्याचें)

हित केल्यानें हेच मोक्षास नेतात आणि मोगलाचें हित केल्यास मोक्ष नाहीं ऐसा पदार्थ नाहीं. ईश्वराचे घरीं ब्राह्मण, हिंदु, मुसलमान, म्हार सर्व ब्रह्मीं एकच आहेत. हें आपणास ठाऊकच आहे. परंतु जी [बाजू] धरली ती तडीस न्यावी" (ऐ. ले. नं १९३). पण मिरज हातची गेल्यानंतर पेशवाई-वरच उठण्याची गोपाळरावानें निजामला दिलेली भर मात्र कोणत्या कोटींत ढकलतां येईल, याचें उत्तर चाणाक्ष वाचक योग्य तेंच देतील. खुद्द गोविंद हरीनेंच चिरंजिवास या वेळीं दिलेला इषाराच पुढें देतों, म्हणजे या बाबतींत स्वतंत्र टीका करण्याचें कारण उरणार नाहीं. "कारभारी यानी जहागीर देऊन शत्रु बलवंत केला तोच पुन्हा राज्यांत शिरल्यावर राज्याची गत काय? ज्याचे अन्न भक्षिले तोच आपला देव त्याची दौलत रक्षावयाचा विचार समजोन कसकसा केला तो प्रकार तुम्ही तर लिहीत नाही." (ऐ. ले. सं. नं. १८६ फाल्गुन शुद्ध पक्ष) गोपाळरावाच्या आगें मागें पेशवाईला राम राम ठोकून निघालेला दुसरा एक, निजामचे उंबरठे झिजवणारा प्राणी त्याला आतां भेटला व एकाला दोघे होऊन अंगीकृत कार्य उत्साहानें पार पडेलसें वाटूं लागलें! पटवर्धनाला कार-भाऱ्याच्या नाशाकरितां निजामची उठावणी पाहिजे होती; तर प्रतिनिधीचा मुतालीक गमाजीपंत पेशवाईचाच घांस घेऊं पाहात होता. मराठशाहींत दीर्घकाल रापत राहिलेले जे कांहीं वाद आहेत, त्यांतील पेशवे-प्रतिनिधि वाद हा प्रमुख होय. शाहूच्या दरबारांत श्रीपतराव प्रतिनिधि व बाजीराव पेशवा, यांच्यांत जी एकदां तेढ पडली ती पिढ्यान् पिढ्या चालतच राहिली. या वेळचे राज्यनाशाचे जे अविचारी खेळ आपण आतां पाहात आहों, ते सर्व जणूं कांहीं मागील दाखला पाहून पुढें चालल्याचा भास होतो. प्रतिनिधीनें निजामला आपलें घर दाखविलें, तर पेशव्यानें जंजिऱ्याच्या सिद्धीला जवळ केले. वास्तविक हे दोघे पुरुष कर्तृत्ववान असून त्यांवर छाप ठेवून त्यांना राबवणारा खंदा यजमान, असता तर त्यांकरवीं त्यानें मराठी राज्याचें अतोनात कल्याण करून घेतलें असतें; परंतु तें अवसान शाहूमहाराजांत नसल्यानें पेशवे-प्रतिनिधि घरांतच भांडत राहिले व त्याचा अनिष्ट परिणाम मराठी राज्यावर अनेकदां झालेला दिसला. या वीरांच्या लढतींत पेशव्याला विजयश्रीनें माळ घातली, तरी प्रतिनिधि कांहीं अजिबात खलास होऊं शकला नाहीं, कीं दूर फेकला गेला नाहीं. हे दोघेहि एकाच क्षेत्रांत अशा असंतुष्ट स्थितींत राहिल्यामुळें परिस्थित्यनुसार उभय पक्षांत परस्परांच्या नाशाचें उद्योग चालूच असत. शाहूमहाराजांच्या मृत्यूनंतरच्या महत्त्वाच्या उलाढालींत, बाजीरावाचें प्रतिनिधि संपविण्याचें अर्धवट राहिलेलें कार्य, नानासाहेबानें बहुतेक उरकून टाकिलें व प्रतिनिधि केवळ कुंकवाचे धनी होऊन, त्यांचा मराठी राज्य-कारभारांतील हात जवळ जवळ नाहींसा झाला; आणि परवां साताऱ्यास चुलत्या-पुतण्यांच्या संमतीनें पेशव्यांच्या खास कारभारांतील व नामधारी राजमंडळांतील

त्याचे सारे उद्योग अवलंबून होते. 'सखारामा'ला दूर सारून पूर्ववत् पेशवे-दरबारात आपली चढीजाव असावी ही त्याची मनीषा आता तृप्त होण्याची वेळ नव्हती पेशव्याला आपले दौलतीचें भवितव्य दिसत असून यापुढें नसत्या अभिमानाला पेटून भलत्याच गोष्टी करण्याला तो राजी नव्हता. सखारामपंताच्या गैरहजेरींत राज्यरक्षणाच्या कामीं नूतन कार्यमार्गीनीं दाखविलेली ढिलाई त्याच्या डोळ्यासमोर असून त्याची कुवत त्याच्या ध्यानात येऊन चुकली होती. असें जरी होते तरी त्या मंडळींविषयींचा त्याचा आत्मीयत्वाचा जिव्हाळा यत्किंचितहि नष्ट झाला नसल्यामुळें तूर्त व्यवस्था लागेपर्यंत पड खाण्याची सूचना तो करी, पण या मंडळींना–विशेषत' पटवर्धनांना त्याचें म्हणणें पटेना. अखेर पटवर्धनी खेळ दडाई होउन बसले व त्या दिशेनें पेशव्याच्या हालचाली सुरू झाल्या. आबा पुरंदऱ्यानें साताऱ्याहून दौड मारून गोपाळरावास जमखिंडीजवळ गाठलें व पौष शु॥ ११ स त्याला लुटून फस्त केलें. गोपाळराव पन्नास पाऊणशें रावतानिशीं मोगलाईत निघून गेला इकडे इतर पटवर्धनमंडळींनीं मिरज झुजविण्याची जय्यत तयारी केली पेशव्यानीं पौष शु. १५ च्या सुमारास मिरजेस वेढा दिला. त्या वेळीं पेशव्या जवळ २५।३० फौज जमा झाली असून वेळ पडल्यास जवळच असलेल्या निजामास मदतीला बोलावण्याचें ठरलें होतें. प्रथम पेशव्यानें आपल्या फौजेचे दोन भाग करून आबा पुरंदऱ्यानें कर्नाटकात जावें व चुलते पुतण्यानीं मिरज घ्यावी असें ठरलें होते. पण असें केल्यानें मिरजेचें काम तडकाफडकीं न होता रेंगाळत राहील व पुढील उद्योगाला खो बसेल असें ध्यानात आल्यानंतर पहिला बेत फिरून सर्व फौज मिरजेच्या शहाला गुतली व कर्नाटकचें काम मागें पडलें. पटवर्धनानीं मिरज झुजविण्याची कडेकोट तयारी केली असल्यानें मिरजेनें पेशव्याचा एक महिना घोटाळा केला गोपाळराव प्रथम निजामाकडे जो गेला तो त्यानें आपणास मिरजे च्या वेढ्याच्या कामीं मदत करावी म्हणून गेला होता, पण निजामला या वेळीं पेशव्याशीं बिघाड करणे उचित न वाटल्यामुळें तो पटवर्धनास मदत करू शकला नाहीं.

तेव्हा पटवर्धनाना मिरज पेशव्याच्या स्वाधीन केल्यावाचून दुसरा मार्गच उरला नाहीं अखेर पटवर्धन व पेशवे यात तडजोड होऊन माघ वा॥ २ स मिरजेवर पेशव्याचे निशाण फडकू लागलें. इतकें जरी झालें तरी पटवर्धनाशीं पेशव्याची वागणूक सहानुभूतीचीच होती. मिरजेशिवाय बाकी सर्व ठाणीं त्याजकडे राहिलीं तरी पटवर्धनाची असंतुष्टता कायम राहून 'सखारामा'बरोबर पेशवाईच्याहि नाशाला ते आता लागले. कितीहि विचार केला तरी यापुढील पटवर्धनी उद्योग दोषार्हच ठरतात. मिरज लढविण्याकरिता निजामची पटवर्धनानीं मदत मागितली एथपर्यंतचा भाग तत्कालीन राजकारणात उपेक्षणीयच ठरला होता अशी त्या काळची मुळीं विचारसरणीच होती. "याचेंच (पेशव्याचें)

हित केल्यानें हेच मोक्षास नेतात आणि मोगलाचें हित केल्यास मोक्ष नाहीं ऐसा पदार्थ नाहीं. ईश्वराचे घरीं ब्राह्मण, हिंदु, मुसलमान, म्हार सर्व ब्रह्मीं एकच आहेत. हें आपणास ठाऊकच आहे. परंतु जी [बाजू] धरली ती तडीस न्यावी" (ऐ. ले. नं १९३). पण मिरज हातची गेल्यानंतर पेशवाई-वरच उठण्याची गोपाळरावानें निजामला दिलेली भर मात्र कोणत्या कोटींत ढकलतां येईल, याचें उत्तर चाणाक्ष वाचक योग्य तेंच देतील. खुद्द गोविंद हरीनेंच चिरंजिवास या वेळीं दिलेला इषाराच पुढें देतों, म्हणजे या बाबतींत स्वतंत्र टीका करण्याचें कारण उरणार नाहीं. "कारभारी यानी जहागीर देऊन शत्रु बलवंत केला तोच पुन्हा राज्यांत शिरल्यावर राज्याची गत काय? ज्याचे अन्न भक्षिले तोच आपला देव त्याची दौलत रक्षावयाचा विचार समजोन कसकसा केला तो प्रकार तुम्ही तर लिहीत नाही." (ऐ. ले. सं. नं. १८६ फाल्गुन शुद्ध पक्ष) गोपाळरावाच्या आगें मागें पेशवाईला राम राम ठोकून निघालेला दुसरा एक, निजामचे उंबरठे झिजवणारा प्राणी त्याला आतां भेटला व एकाला दोघे होऊन अंगीकृत कार्य उत्साहानें पार पडेलसें वाटूं लागलें! पटवर्धनाला कार-भाऱ्याच्या नाशाकरितां निजामची उठावणी पाहिजे होती; तर प्रतिनिधीचा मुतालीक गमाजीपंत पेशवाईचाच घांस घेऊं पाहात होता. मराठशाहींत दीर्घकाल रापत राहिलेले जे कांहीं वाद आहेत, त्यांतील पेशवे-प्रतिनिधि वाद हा प्रमुख होय. शाहूच्या दरबारांत श्रीपतराव प्रतिनिधि व बाजीराव पेशवा, यांच्यांत जी एकदां तेढ पडली ती पिढ्यान् पिढ्या चालतच राहिली. या वेळचे राज्यनाशाचे जे अविचारी खेळ आपण आतां पाहात आहों, ते सर्व जणूं कांहीं मागील दाखला पाहून पुढें चालल्याचा भास होतो. प्रतिनिधीनें निजामला आपलें घर दाखविलें, तर पेशव्यानें जंजिऱ्याच्या सिद्दीला जवळ केले. वास्तविक हे दोघे पुरुष कर्तृत्ववान असून त्यांवर छाप ठेवून त्यांना राबवणारा खंदा यजमान, असता तर त्यांकरवीं त्यानें मराठी राज्याचें अतोनात कल्याण करून घेतलें असतें; परंतु तें अवसान शाहूमहाराजांत नसल्यानें पेशवे-प्रतिनिधि घरांतच भांडत राहिले व त्याचा अनिष्ट परिणाम मराठी राज्यावर अनेकदां झालेला दिसला. या वीरांच्या लढतींत पेशव्याला विजयश्रीनें माळ घातली, तरी प्रतिनिधि कांहीं अजिबात खलास होऊं शकला नाहीं, कीं दूर फेकला गेला नाहीं. हे दोघेहि एकाच क्षेत्रांत अशा असंतुष्ट स्थितींत राहिल्यामुळें परिस्थित्यनुसार उभय पक्षांत परस्परांच्या नाशाचें उद्योग चालूच असत. शाहूमहाराजांच्या मृत्यूनंतरच्या महत्त्वाच्या उलाढालींत, बाजीरावाचें प्रतिनिधि संपविण्याचें अर्धवट राहिलेलें कार्य, नानासाहेबानें बहुतेक उरकून टाकिलें व प्रतिनिधि केवळ कुंकवाचे धनी होऊन, त्यांचा मराठी राज्य-कारभारांतील हात जवळ जवळ नाहींसा झाला; आणि परवां साताऱ्यास चुलत्या-पुतण्यांच्या संमतीनें पेशव्यांच्या खास कारभारांतील व नामधारी राजमंडळांतील

दरकदारांच्या ज्या अनेक महत्त्वाच्या घालमेली झाल्या, त्यांत तर जुन्या प्रतिनिधि घराण्याचा समूळ नाश झाला; आणि प्रतिनिधि व त्यांचे आश्रित देशोधडीस लागले. बाबूराव व मोरोबा फडणीस, गोपाळराव पटवर्धन यांच्याप्रमाणें प्रतिनिधि व त्यांचा मुतालिक गमाजी यमाजी, निजामकडे आश्रयास गेले व त्यांच्यांत पुढील राजकारणें घाटूं लागलीं. प्रतिनिधींस निजामच्या दरबारांत या वेळीं खास आश्रयस्थान होतें. निजामअल्लीचा दिवाण राजाबहादूर विठ्ठल सुंदर हा प्रतिनिधीचा जातभाई असून तो गमाजीबावाचा आप्तहि होता; त्यामुळें प्रतिनिधीचा झालेला उच्छेद राजाबहादूरलाहि जाणवला व तो आतप्रेमानुसार त्यांचा पाठीराखा बनला. उलटें पेशव्यांस उत्सुक झालेला घरभेद्या गोपाळराव, गमाजीपंत व जात्याभिमानी राजाबहादूर हे त्रिकूट एकत्र होऊन बारीक सारीक प्रश्न काढून सारून एकदम पेशवाईच्या उलाढालीस भाग देऊं लागले. विठ्ठल सुंदरनें निजाम-अल्लीला पेशव्याविरुद्ध उठण्याची सल्ला दिली; व बहुतां दिवसांचे जुने समूळ उखडून काढण्याची ही खास सुवर्णसंधि असल्याची खात्री पटविली. तसेंच गमाजीनें मोठ्या शिताफीनें जानोजी भोसल्याचें मन वळवून त्यास फोडून निजामाकडे आणिलें. आतां मात्र साशंक असलेला निजाम निःशंक होऊन कारभाऱ्यांच्या सल्ल्याप्रमाणें पेशव्यांशीं बिघाड करण्यास तयार झाला. या वेळीं भोसले व निजाम यांत 'साठ-चाळिसाचा' जो तह झाला तो असा- "यापुढें जी जी मिळकत होईल, मग तो मुलूख असो या लूट असो, त्याची वांटणी उभयतांत ६० व ४० या प्रमाणांत व्हावी." नवीन काढलेल्या कर्यांनाहि हेंच प्रमाण राहावयाचें होतें. नागपूरकर भोसले छत्रपतींचे भाऊबंद असून शाहूच्या पश्चात् जानोजीच साताऱ्याच्या गादीवर येणार होता; पण तत्कारभाऱ्यांचा विरोध व बनरायाचें प्रकट होणें यामुळें तो सर्व बूड टाळला; तरी नागपूरकरांची साताऱ्याच्या गादीची आशा कधींच समूळ नाहींशी झाली नाहीं. अधूनमधून त्याला उकळी फुटत असे. आणि हीच त्याची इच्छा आतां गमाजीनें फुंकर घालून प्रज्वलित केली व जानोजीला आपल्या कह्यांत सामील करून घेतलें. आपण निजामच्या मदतीनें मराठी राज्याचें सर्वच रूप पालटूं म्हणजे आपण अनायासेंच साताऱ्याचे राजे व्हाल, असें गमाजीनें जानोजीच्या डोक्यांत पक्कें भरवून दिलें होतें. एवंच, निजामचा पेशव्यांशीं बिघाड करण्याचा बेत कायम झाला, व निरखेच्या वेळांतून पेशव्यांची फौज मोकळी होते न होते तोंच त्यामुळें सांगों घेऊन युक्ति योजलेला निजामचा मसलत पुनश्च नाचूं लागला.

## राक्षसभुवनची मोहीम

(शके १६८४ फाल्गुन ते श. १६८५ श्रावण)

यानंतर पेशवे व निजाम यांच्यांत जो एकलगता रहा महिने 'अटून'

संग्राम झाला तो इतिहासांत 'राक्षसभुवनची मोहीम' या नांवानें ओळखला जातो. पेशवाईच्या इतिहासांत पेशवे-निजामचे अनेक सामने झाले; पण या सामन्यासारखा मराठ्यांच्या अंगच्या कित्येक बहुमोल कमाविलेल्या गुणांचें एकत्र प्रदर्शन करणारा सामना क्वचितच झाला असेल. पेशव्यांचें सैन्य मिरजेच्या वेढ्यांतून मोकळें होतांच पुढील योजना आंखल्या जाऊन त्या लगोलग अमलांतहि आल्या. निजामला खूष करून वाटेस लाविलें आहे आणि मध्यस्थ मुरादखानासारखा वजनदार गृहस्थ, तेव्हां गोपाळराव अगर गमाजी यांनीं कितीहि चिथविलें तरी निजाम इतक्या लवकर बिघाड करील हें पेशव्याला मुळींच शक्य वाटेना; म्हणून त्यानें दिवाण आबा पुरंदरे यानें कर्नाटकांत जाऊन हैदराला जरब पोंहोचवावी व नारो शंकरानें उत्तरेस जाऊन हिंदुस्थानचा बंदोबस्त करावा असें ठरवून लगेच तो बेत अमलांतहि आणिला. पुरंदरे न नारोशंकर मार्गे चालूं लागले; परंतु साधक-बाधक गोष्टी विचारांत घेऊन पेशव्यानें केलेला अंदाज खोटा ठरून निजामनें बिघाड केल्याची नक्की बातमी आली व आतां हें संकट कसें निरसावें याची विवंचना सुरू झाली. दोनमहिन्यांपूर्वीं निजामनें आपल्या सामर्थ्याची दाखविलेली चुणूक ताजीच होती आणि आतां तर तो त्याहून कितीतरी पटींनीं वाढला होता. पूर्वींचे माधवरावपक्षीचे बाबूजी नाईक व त्र्यंबकराव मामा यांशिवाय बाकीचे सारे लोक आतां निजामला जाऊन मिळाले होते आणि तशांतच जानोजी भोसल्याची भर पडली; तेव्हां निजामच्या फौजेचा आंकडा बेसुमार वाढला व हें दुसरें पानपतच उद्भवलें कीं काय असा भास झाला. या दोन महिन्यांत पेशव्याची पहिली उठवण यद्यपि मोडली असली तरी तो निजामशीं तोंड देण्याइतपत सावरला होता असें म्हणतां येत नाहीं. 'त्याणीं व आपूण एक होऊन हैदरला बरा नतिजा द्यावा व त्याकडे येणे असलेले पाऊण करोड रुपये उगवावे' याकरितां तो म्हणेल त्या अटीवर पेशव्यानें निजामशीं तह केला होता; म्हणजे एकट्या हैदराची खोड मोडण्याची ताकद पेशवाईत राहिली नव्हती. तेव्हां खुद्द निजामच नव्या जोमानें दंड थोपटून उभा राहिल्यावर पेशवाईतील जबाबदार व्यक्तींच्या डोळ्यांसमोर क्षणभर काजवे चमकल्यास आश्चर्य कसलें? सखारामबापूची तर ही परीक्षेचीच वेळ येऊन ठेपली. शहाणा यजमान, डोईजड नौकर अवघड कार्यावर घालून जसा काडी न मोडतां डोळा शाबूत ठेवून संपवितो तोच प्रसंग हल्लीं बापूवर आला. राघोबा, माधवराव व गोपिकाबाई हे भिन्न प्रकृतीचे तीन यजमान मोरे आळ आळवून, लगामीं लावून घेऊन, आपल्या मृत यजमानांनीं अंतकाळीं 'राज्य राखण्या'ची केलेल्या आज्ञाप्रतिपालनाची जबाबदारी अंशतः पार पाडूं असें कोठें वाटूं लागलें होतें तोंच हा वज्राघात झालेला पाहून हा शहाणाहि खास भांबावला असला पाहिजे. पण शहाण्याचा शहाणपणा व मर्दांचें शौर्य हें महत्-

संकटकाळीं खरेखुरे कसोटीस लागत असतें याचा अनुभव सखारामपंताच्याहि बाबतींत आतां आला व क्षणार्धांत त्याच्या वृत्तीनें पालट खाल्ली. या दोन महिन्यांच्या अखंड सहवासानें तल्लख बुद्धीचा तरुण पेशवा आपल्या कारभाऱ्यांची वास्तविक योग्यता जाणण्यास समर्थ झाला होता. हल्लींचा त्याचा हा कारभाऱ्यांच्या ठिकाणचा 'भाव' 'भिणेभाव' असो अगर 'भक्तिभाव' असो पण तो भाव होता खास. एवंच, वृद्ध-तरुणानीं एकविचारें काम करण्याची कपिलाषष्ठीची पर्वणी आता आली व पेशवाईच्या सुदैवाने ती थेटपर्यंत कायम राहिली. पेशव्यानें पुरंदरे यास परत बोलाविलें व राजेबहादरास असेल त्या जागींच थांबण्यास सांगितलें आणि मिरजेच्या तळावर आपलें सर्व सामर्थ्य एकवटलें. पेशवे-निजामचा बिघाड होतांच दोघांनीं आपापल्या फौजा एकगटानें चालू कराव्या व जेथें गांठ पडेल तेथें स्वसामर्थ्यानुसार अक्कलहुशारीनें काम करावें हा बरेच दिवसांचा सांप्रदाय होता व या पद्धतीनें पेशव्याला बरेच वेळां यशहि आलें होतें. पण ही लढण्याची पद्धत आमची मराठ्यांची नसून ती आम्हीं नुकतीच दुसऱ्याकडून उसनी घेतली होती व अनुभवातीं ती बरी वाटली म्हणून तिलाच आम्हीं आपलीशी करून टाकली; परंतु या दिल्या शिंदोरीनें 'पानपता'वर दगा दिल्यापासून ही नवी पद्धत अनुभविक वृद्ध सेनानींच्या रोषास पात्र झाली व ते तिच्या विरुद्ध वेळींअवेळीं बोललेहि पण असतील. मल्हारराव होळकर व सखारामबापू हे वृद्ध सेनानी थोरल्या बाजीरावाच्या तालमींत तयार झाले असून, ते बाजीरावाच्या अनेक संग्रामांत सामीलहि होते. बाजीरावानें विजेसारखें चमकून उत्तरेच्या रथी-महारथींना मराठी भाल्याचें तीक्ष्ण पाणी अनेकदा पाजून त्याना कसें जेरीस आणिलें हें यानीं प्रत्यक्ष पाहिलें होतें. आपल्या फौजेच्या अनेक टोळ्या करून त्यांकरवीं शत्रु हलका करावयाचा व मुलूख उध्वस्त करून तो सर्व बाजूंनीं हलका झाल्यावर, 'आता हें सावज आपण खास गट्ट करूंच करू' अशी खात्री होताच त्यावर एकदम झडप घालावयाची व इष्ट सिद्धि उरकावयाची ही बाजीरावाची लढण्याची तऱ्हा म्हणजेच मराठ्यांचा 'गनिमी कावा' व याचा विसर तरुण मराठे सेनापतींना पडल्यामुळें वृद्ध-तरुण सेनानींचें पेशवाईंत आतांशा बनत नसे. खुद्द पानपतच्या मोहिमेच्या आधीं होळकर व भाऊसाहेब यात याच लढण्याच्या पद्धतीच्या मुद्द्यावर मतभेद झाला होता; पण तेथें भाऊसाहेबापुढें मल्हाररावाला हार खावी लागली व मराठ्याच्या लाडक्या गनिमी काव्याचा या मोहिमेंत कोठेंच फारसा उपयोग झाला नाहीं. बाजीरावाला गनिमी काव्याचें शिक्षण वडिलार्जित असून तें त्याच्या अंगीं पक्कें भिनलें होतें. त्याचा बाप बाळाजी विश्वनाथ हा तर गनिमी काव्याचा प्रभाव साक्षात् पाहिलेला सेनापति होता. संभाजीमहाराजाच्या नंतरचें मराठी राज्यावरचें महत्संकट मराठ्यानीं कोणत्या लढण्याच्या विशिष्ट

पद्धतीनें वारापाणी करून सोडिलें हें थोरले नाना चांगलेंच जाणत होते. सतत तीस वर्षे ठराविक कार्यक्रम डोळयांपुढें ठेवून वाटेल त्या परिस्थितींत नुकसानीची पर्वा न करितां, इराण-तुराणवर जय मिळवून सर्व हिंदुस्थानांत अजिंक्य ठरलेला औरंगजेब एकटया मूठभर मराठयांनीं जर्जर केलेला, बाळाजी विश्वनाथानें पाहिलेला होता—नव्हे त्यांत त्यांचें अंगहि होतें. तशांत बाळाजी हा रामचंद्रपंत अमात्याचा शिष्य व अमात्य म्हणजे शिवरायाच्या राज्यपद्धतीचा व त्यांच्या आवडत्या 'गनिमी काव्या'चा मूर्तिमंत पुतळा. एवंच, मराठ्यांच्या गमिनी काव्याचें शिक्षण सांप्रदायिक पद्धतीनें घेतलेले मुरब्बी सेनानी आतां पेशव्याजवळ होते व त्याची त्यांवर छापही होती. त्यामुळें सखारामपंतानें निजामशीं आतां कसें लढावयाचें हें एकदम ठरवून टाकिलें व त्याप्रमाणें कामाला सुरुवातहि केली. सखारामबापूचें पुढील पत्र विद्यमान संकटाचें स्वरूप व त्यानें त्यावर योजिलेली उपाय-योजना स्पष्ट करीत आहे तें पत्र असें:—

ऐ. ले. सं. नं. १७५ फाल्गुन शु० ४ श. १६८४

**सखारामबापूचें गोपिकाबाईस**

१ येथील वर्तमान छ ३ साबान मुा मिरज यथास्थित असे विशेष इकडील वर्तमान श्रीमंत वरचेवर लिहितात. विदित होत असेल. सांप्रतचे हि वर्तमान—भोसल्याचे [आम्ही] काही वाईट न करिता गोपाळराव व गमाजीबावा याणी उत्पाद करून नेले व तेहि गेले! असो, चिंता काय आहे! आपले पुण्य आहे तरी सर्व उतमच होईल. सारांश बाकी मोगलाने बिघडले तेव्हां मुद्दे नानाप्रकारचे घालितो. "भिवरेपासून मुलूख द्यावा, किले द्यावे, भोसल्यास मुलूख द्यावा, कारभार करणे तो आमच्या विद्यमाने करावा" असे म्हणतो! तेव्हां सर्वस्व घेतो असे यांत आहे. यास्तव सर्वांचे विचारे हेच की आपली गनिमीची रीत आहे ते करावी. जो पावेतो होईल तो करावे. नच होईल तर शेवटी किले-कोट आहेतच! जसे बनेल तसे करावे. पुढें ईश्वरानें नेमिले असेल तसे होऊ. परंतु पन्नास हजार फौज असता उगीच त्याचे हवाली [दौलत] करावी हे न करावे. असे केल्याने कांहींच रहात नाहीं. इतके [मोगलाने] करावयास कारण यंदा मराठी फौज त्याजकडे फार आहे. केवळ जवळ राहून झुजू म्हटल्यास रातबिरात दगा करितील. यास्तव हा प्रकार योजिला आहे. सांप्रत खडे होऊन मल्हारबाकडे जावे. त्यास मेळवून घेऊन मग जे करणे ते करावे. मलारबास आणावयास राजश्री विठ्ठल शिवदेव गेले. औरंगाबादेचे सुमारे त्यास घेऊन येतील पुढे होईल ते लिहून पाठवूं. आपण सावध असावे.

मल्हारराव होळकर या वेळीं चांदवडास होता व त्याला सामील करून घेतल्यावांचून पुढील व्यवस्था लागणारी नव्हती. आतां बापूनें चालविलेला गनिमी काव्याचा प्रयोग धाडसाचा असून त्यापासून प्रथम आपलेंच नुकसान होणार होतें. तेव्हां त्या नुकसानीच्या वेळेस यजमान घाबरतील तेव्हां त्यांना धीर देणारा वजनदार पुरुष सतत जवळ असल्यावांचून योजिलेला व्यूह शेवटास जाणें शक्य नव्हतें. यद्यपि बापूवर हल्लीं पेशवा व राघोबा यांचा भरवसा होता तरी त्यापेक्षां त्यावर मल्हाररावाची छाप कांकणभर जास्तच होती. तशांत होळकर फौजबंद असून त्यावर मोगलाचा एक चसणें हजार हिरशांनीं शक्य नव्हतें; तरी न जाणो मोसल्यानें दगा दिला तसा त्यांजकडून कशावरून बसणार नाहीं! तेव्हां बुद्धीला वैर नको अशा सावधतेनें पेशवा होळकराला सामील करून घेण्यास उत्सुक झाला असण्याचा यत्न संभवहि आहे. कारण विवाद होतांच होळकराकडे निजामकडील राजकारणें टोकावूं लागलीं होतीं. सिंदखेडच्या मोहिमेपासून निजामच्या तोफखान्याची भीति पेशव्यांना वाटूं लागली व यानंतर त्यांनीं आपला तोफखाना सजविण्याची जारी चालविली. फ्रेंच सेनापति बुशी याच्या हाताखालीं तयार झालेला इब्राहिमखान गारदी, जो निजामकडे नोकर होता, त्यास आपल्या पदरीं ठेवून पेशव्यानें निजामच्या तोफखान्याला तोफखान्यानेंच जाबास जाब देऊन उदगीरवर गप्प बसविलें होतें; पण दुर्दैवानें पानपतावर पेशव्यांचा प्रभावी तोफखाना खलास झाला व निजामचें हें अंग उत्तरोत्तर भरभराटीस येत चाललें. चालू सामन्यांत निजाम पंच्याहत्तर हजार फौज, तीन हजार गारदी व उत्तम तोफखाना पुढें करून लढणार होता; त्याला पेशव्याची केवळ पन्नास हजार फौज किनीशी पुरी पडणार? पेशव्याप्रमाणें निजामकडे पुढील लढाईची योजना आंखली गेली होती. 'आपण नीट चालोन त्यांजवर जात असतां मग आम्हास टाकोन डावे उजवे कांहीं जात नाहींत. जें होणें तें सन्मुख होईल. वर्गास आपले सामान थोडें असतें, तेव्हां कोणता पराक्रम करितात! आतां तो आपला जमाव भारी. त्याच्यानें काय होणें! आतां 'विवाड' असें सर्वतो मुखें झालें असतां आतां मार्गें पुढें न घेतां मजलदर मजल जेथें असतील तेथें गाठ घालून दहानिशा करावी हा ठराव [निजामाकडे] झाला' (ऐ. ले. स. नं. १८७) पेशव्याशीं गांठ पडल्यास आपली खास फत्ते होणार याची निजामला बालंबाल खात्री होती. अशा स्थितींत यत्न तिनक्या उचित त्याच्या हातची प्रभावी मारक शस्त्रें गळून पडल्यानंतरच निजामशीं सामना देणें जरूर होतें. हल्लीं पेशवे ज्या ठिकाणीं उभे होते तेथपासून अवघ्या तीन चार मजलींवर निजाम लवाजम्यानिशीं सज्ज असल्यानें यांची त्यांची दृष्टादृष्ट होण्यास फारसा अवधि नव्हता. तेव्हां लढाईस लवकरच तोंड लागेल व तेंहि आपल्याच मुलखांत लागेल, करितां लढाईचा

काळ लांबविणें व उभय फौजांच्या हालचाली शत्रूच्या मुलखांत पाडणें हें करण्या-वांचून पेशव्यास गत्यंतरच नव्हतें. निजामच्या बादशाही सुस्तीच्या कारभाराशीं मराठ्यांचा दीर्घकाल परिचय असल्यानें हे राजश्री जाग्यावरून किती जलद हलतील याची त्यांना खात्री होती. तेव्हां पेशव्यांनीं आपल्या हालचालीच्या पुढील धोरणाची परिस्फुटता होऊं न देतां एकदम उत्तरेचा रस्ता सुधारला व बाजीरावी विद्युद्वेग अमलांत आणिला. शत्रूवर चालून जावयाचें टाकून हे असे पळत कां सुटले याचा अर्थच मुळीं लोकांच्या लक्षांत येईना. पेशव्याचें हें असलें विचित्र वर्तन पाहून निजाम जरा गोंधळला व त्याचा छापील आराखडा ठिक-ठिकाणीं दुरुस्त होऊं लागला. मराठे उत्तरेस चाललेले पाहतांच निजामलाहि त्यांच्या रोखानें जाणें भाग पडलें; म्हणजे पुढील हालचाली निजामच्या धोरणानें न चालतां पेशव्याच्या धोरणानें सुरू झाल्या. गनिमी काव्याचा हा पहिला जय होय.

## युद्धक्षेत्र मोगलाईंत

मल्हाररावाला आणण्यास विठ्ठल शिवदेवला पुढें पाठवून पेशव्यानें अवघ्या चौदा मजलींत औरंगाबाद गांठलें व निजामच्या केवळ गळ्यासच हात घातला. शत्रु पाठीवर असतां आपला मुलूख मोकळा टाकून पळत सुटणें या युद्धपद्धतीचा विद्यमान पिढीला गंधहि नसल्यानें कारभाऱ्यांनीं यजमान बुडविण्याची सूड उगाविण्याच्या बुद्धीनें चालविलेली ही घातकी मसलत आहे असा सर्वत्र समज होऊन सखारामपंतांच्या शत्रूंना आपली टकळी चालविण्यास अनायासें संधि मिळाली व तिचा त्यांनीं यथामति उपयोगहि करून घेतला. पण तरुण पेशव्यानें हा गनिमी-कावा इतका उत्तम समजावून घेतला होता कीं, त्याच्या मनावर या कोल्हेकुईचा बिलकुल परिणाम झाला नाहीं व त्याचा कारभाऱ्यांवरील विश्वास अढळ राहिला. घोडनदीच्या प्रसंगानंतर माधवराव राजकारणी व्यवहारांत मातोश्रीच्या सल्ल्यावर विशेष भिस्त ठेविनासा झाला होता. आतां गोपिकाबाईच्या वडीलपणाला उचित जो शाब्दिक आदरमान, त्यापेक्षां राजकीय व्यवहारांचावर्तांत तिचा हात नव्हता म्हटलें तरी चालेल व ही स्थिति तीहि कांहीं अंशीं जाणत असे. त्यामुळें खरोखर 'सखाराम दौलत क्षयाला नेऊं पाहतो' असे पटवर्धनी विचार तिला अधून-मधून पटत तरी त्याचा राजकीय वातावरणावर विशेष परिणाम झाला नाहीं. पेशवे पुण्याच्या पुढें सरकल्यावर आतां हे काय करणार याची निजामला अंधुक कल्पना आली व त्यानें मोकळा असलेला पेशव्याचा प्रदेश व पुणें राजधानीला धक्का न लावितां पेशव्याचे मागोमाग धांवण्याचें ठरविलें. पेशव्याच्या पदरच्या मराठी सैनिकांनीं आपल्या बायकामुलांची सुरक्षित स्थळीं रवानगी चालविली होती; कारण यापुढला प्रकार काय होणार याचें अनुभविक लोकांनीं आगाऊच भविष्य वर्तवून

ठेविलें होतें, पण अशी सावधानता निजामहद्दींतील रयतेला करण्याचें सुचलें नाहीं व कोणीं सुचविलेंहि पण नाहीं. कारण ते पेशव्याच्या सनिध इतके दिवस होते तरी त्यावर गनिमी काव्याचा प्रयोग एक दोन पिढ्या झाला नव्हता. अर्थात् पुढील जाळपोळीची व लुटालुटीची योग्य कल्पना पेशवाईला जशी होती तशी मोगलाईला नव्हती व म्हणूनच पेशव्याच्या गनिमी काव्याच्या प्रभावाचें निजामला वास्तविक ज्ञान होण्यास उशीर लागला. पेशव्याला मोगलाईत नुसता धुडगूसच घालावयाचा होता. ठाणींठुणीं घेऊन प्रदेश जप्त करणें हें मुळीं त्याचें या काळचें ध्येयच नव्हतें. आपलें पोट मोगलाई मुलुखात भरावें व मोगलानेंहि स्वत चे प्रदेशात आक्रमणा करावी एवढाच त्याचा उद्देश होता. त्यामुळें पेशव्याची फौज शहराला-औरंगाबादेला पोंहोचल्यावर चालत्या मुकामात जेवढा हात मारता येईल तेवढाच मारून त्यानीं पुढला रस्ता सुधारला. फाल्गुन व. ७ रोजीं शहरावर हल्ला करून बाहेरचे पुरे जाळले व दोन लक्ष रुपये खंड घेऊन ते सुरक्षित राखले. यानतर वऱ्हाडात शिरून भोसल्यास घाबरा करण्याच्या उद्देशानें पेशव्याची फौज पुढें चालली तों एक अनिष्ट प्रकार आढळला, त्याची व्यवस्था करणें भाग पडलें. मोगलाकडील रामचद्र जाधवराव हल्लीं पेशव्याच्या पदरीं असून तो या मोहिमेंत सामील होता. त्याचें निजामशीं सूत केव्हा जमलें हें काहीं कोणाच्या लक्षात आलें नाहीं. अखेर या फितुऱ्याचीं एक एक कृत्यें उजेडात येऊ लागलीं तेव्हा त्याकडे दुर्लक्ष करणें अपरिहार्य झालें. शेवटीं फाल्गुन वा ५ च्या सुमारास आबा पुरंदरे व बाबूजी नाईक यानीं जाधवास कैद करून त्याचा गोट लुटून फस्त केला व त्याची रवानगी दौलताबादेस केली. त्याच्या दिमतीस असलेला नरसिंगराव धायगुडे औरंगाबादेस पळून जाऊन मोगलास सामील झाला. याच सुमारास रामचद्रबावाचा मुलगा सदाशिव रामचद्र हाहि निजामाकडे गेला. तो काय कारणानें गेला याचा नीटसा बोध होत नाहीं. काऱ्याने काटा काढून जसें दोन्हीहि फेंकून द्यावयाचे असतात तीच दृष्टि फितुऱ्याच्या बाबतींत सर्व काळ लागू करावयाची असते. राजकारणी पुरुष फितुऱ्याच्या बाबतींत नेहमींच साव धानतेने वागत असतात तें उगीच नाहीं. मतलबापुरती ते त्याची वाटेल ती खुशामत करतील, पण त्याकडे नेहमींच साशकतेनेंच पाहतील. राजकारण म्हटलें कीं, तेथें असले प्रसग नेहमींच येतात. अगदीं आरंभीं होळकराकडे दूत रवाना झाला असून त्याची अद्यापहि सामील होण्याची लहर लागली नाहीं, तेव्हा खुद्द पेशवा व सखारामबापू लष्करची रवानगी वऱ्हाडात करून मल्हारबास आणावयास गेले उभयतानीं त्याची समजूत घालून त्यास बरोबर घेतलें व मलकापुराजवळ लष्कर गाठलें. चैत्र शुा ७स पेशव्याचा मुक्काम मलकापुरास होता.

## निजामच्या हालचाली

फाल्गुन शु॥ ८ च्या सुमारास निजाम सिनेच्या संगमाजवळ असून तेथून पुढें पेशव्याच्या मुलखांत कसें घुसावयाचें याचा बेत तो करूं लागला. भीमेच्या पाण्यानें जावें किंवा माणेच्या कांठानें यावें असे दोन मार्ग त्यास दिसूं लागले. इकडील मंडळींनीं सुचवावें व त्यानें तसें आचरण करावें असा या वेळचा थाट होता. गमाजीनें निजामला प्रतिज्ञापूर्वक आश्वासन दिलें होतें कीं, 'एका प्रहरांत तुम्हांस साताराचा किल्ला व राजा हस्तगत करून देतों. याखेरीज वीस लाख रुपये मिळवून देतों. याउपर राजगृहींचीं पदें आपले चित्तास येतील त्यास वांटून द्यावींत.' तेव्हां मोगलानें भिमेच्या पाण्यानें पुणें-सातारा गांठण्याचें ठरविलें. जानोजी भोसल्यानें वीस हजार फौजेनिशीं आघाडीस चालावें. त्यामागें तितक्याच फौजेनें चोहों कोसांचे अंतरानें विनायकदासानें चालावें व त्यामागें बाकीच्या लवाजम्यानिशीं खासा निजाम असावा, अशा थाटानें ही स्वारी चालली होती. फाल्गुन शु॥ १५ स त्यांचा मुक्काम पंढरपुरानजीक आला व तेथें त्यांनीं आपल्या फौजेच्या दोन तुकड्या केल्या. गमाजी सांगोल्यावरून सातारा प्रांतीं गेला व बाकीची फौज निरेच्या पाण्यानें पुण्याच्या रोखें चालली. पुण्यास आपण गेल्यानंतर पेशव्याला आपल्या अंगावर चालून आल्यावांचून दुसरा मार्गच राहणार नाहीं असा त्याचा कयास होता. यदाकदाचित् त्यानें पुण्याची आशा सोडून लढाई टाळलीच, तर पुणें घेऊन कारभाऱ्यांचीं गांवें सासवड व हिवरे यांचा यज्ञ करून सातारला जावयाचें असा त्याचा पुढील कार्यक्रम होता. 'साल मजकुरी नच बनेल तर नगरापर्यंत जागां जागां छावणी करून राहावे, त्याजबरोबर लोक आहेत त्यांचीं त्यांचीं मुलें माणसें जप्त करावीं, येतील त्यांस सरंजाम द्यावा' (ऐ. ले. सं. नं. १८५). पेशव्याला आपल्यासमोर उभे राहण्याची ताकद नाहीं म्हणून तो भटकतो एवढाच निजामचा समज. यामुळें पेशव्याचे हद्दींत शिरल्यावरहि पुढील सुखस्वप्नांत गर्क होऊन त्यानें आपल्या हालचाली बादशाही थाटानेंच चालविल्या. फाल्गुन वा ७ स पेशव्यांनीं औरंगाबादेवर हल्ला केला त्या वेळीं निजाम पंढरपूरच्या आसपासच रेंगाळत होता. बिचाऱ्याला 'कशाचा पन्हाळा रिधे खानदेशीं' ही मराठ्यांची चमक काय ठाऊक? 'आपल्याला प्रतिबंध करावयास येथें कोणी नाहीं, प्रदेश तर जप्त झालाच आहे. आतां त्याची व्यवस्था कशी लावावयाची' अशा शेखमहंमदी मनोराज्यांत स्वारी गर्क आहे, तोंच 'पेशव्यांनीं आपल्या राजधानीवर हल्ला केला व खरोखर मुलखाची जप्ती चालविली' अशी बातमी आली तेव्हां पूर्वींचे सर्व बेत त्याला सोडून द्यावे लागले. एवंच, पेशव्यांनीं निजामला गांठून तोंड देण्याऐवजीं निजामला पेशव्यांच्या मागें धावावें लागलें व गनिमी काव्यानें यशाची आणखी एक पायरी ओलांडली.

या अवधींत गमार्जीनें सातारा प्रांतांतील प्रतिनिधीच्या ताब्यांतील टाणीं मोडून तेथें आपला अम्मल कायम केला होता; परंतु निजामच्या हालचालींची दिशा पालटतांच हें जप्तीचें काम अर्धवट सोडून सर्व मोगली फौजेनें विलायतेची तिकिटें काढलीं व पेशव्यांचें मागें धाव मारली आणि पेशवाई मुलुखाचें विध्वंसनेचें संकट तात्पुरतें दूर झालें. वरवर पाहणारांनीं मोठी 'माणसाई' करून पुणें वांचविलें असें निजामला शिफारसवर सादर केलें. पण ही अंदरकी बात त्यांना काय माहीत!

## आट्यापाट्यांचा खेळ

मलकापुरापासून पंचवीस हजार खंडणी घेतल्यानंतर पुढें एक-दोन मजली पेशव्यांचें लष्कर जातें न जातें तोंच निजाम धावा टाकीत टाकीत पैठणवरून शहरास येऊन दाखल झाला. धावपळीचा पेशव्यांच्या सैनिकांस नेहमींचाच प्रसंग; त्यामुळें गेल्या दोन-तीन महिन्यांतील कष्ट त्यांच्या खिजगणतीसहि नव्हते; पण ऐषआरामी मोगलांस नित्यउठूनचा तोच दिवस चांगला जाणवला आणि सतत प्रवासानें त्याचे शिपाई रडकुंडीस आले व घोड्यांत कांहींच त्राण उरला नाहीं. औरंगाबादेस आल्यावर तरी स्वास्थ्य मिळेल म्हटल्यास तीहि आशा राहिली नाहीं. कारण ही पेशव्यांची वऱ्हाडांत गेलेली टोळधाड तेथेंहि असाच सत्यनाश चालवील तर मोगलांस आपल्या मुलखाच्या संरक्षणास जावें लागेल व सर्वच मसलत बिघडेल असें पाहून निजामनें राजधानीचें नुसतें दर्शन घेऊनच वऱ्हाडचा मार्ग सुधारला. ही बातमी पेशव्यांस कळतांच त्यांनीं पुनश्च झुकांडी देऊन शहराचाच रोंख धरला; पण मोगल सटा होऊन चालून येईल तेव्हांच त्याशीं दोन हात व तेहि त्याच्याच मुलखांत करावयाचे या धोरणाकडे त्यांचें अद्यापहि लक्ष कायम होतें. निजामाची फौज झडत झडत चाळीस हजारांवर आली होती, तरी यापेक्षां तो जास्त हलका झाल्याशिवाय त्याशीं आपली गांठ पडूं द्यावयाची नाहीं या धोरणानें पेशव्यानें त्याच्यांतील व आपल्यांतील तीस चाळीस कोसांचा अंतरा कांहीं झालें तरी कमी होऊं दिला नाहीं. आता पेशव्याचीहि फौज बरीच कमी होऊन, तीस हजार फौज व दोन-तीन हजार पेंढार एवढेंच काय तें त्याचें सामर्थ्य उरलें. त्यामुळें वैशाखापर्यंत हाताला हात लागूं न देता असाच झुकांड्या दे देऊन त्यांना कालहरण करावयाचें होतें; पण यदाकदाचित मोगल सडा होऊन आल्यास अशा स्थितीतहि त्यांस आपण लोळवूंच लोळवूं हा त्याचा आत्मविश्वासहि कायम होता. वऱ्हाडांतून पेशवे पुन्हा राजधानीकडे येतात तेव्हां आतां त्यांची उपेक्षा करणें ठीक नव्हे असें पाहून निजामअली व दिवाण विठ्ठल सुंदर सडेहि पण झाले; पण पेशव्यानें त्यांस मुकाबल्याची संधीच येऊं दिली नाहीं. हा आट्यापाट्यांचा सामना चैत्रअखेर कसाबसा चालला. पेशव्यांना काय, परभाच्या शत्रूच्या मुलखांत

चेरायाला सांपडून, पायमल्लीखालींहि त्याचाच मुलूख येत होता, तेव्हां त्यांना तूर्त तरी विचार करण्याचें कारण नव्हतें. पण निजामला इतउत्तर हा खेळ असाच चालू ठेवणें इष्ट नसल्यानें त्यानें तो संपविण्याची आपल्याकडून पराकाष्ठा करून पाहिली; पण त्याला येथेंहि निराश व्हावें लागलें. तहाचें बोलणें मराठ्यांकडून सुरू होईल अशी त्याची कल्पना होती; पण ते आतां तहाचें नांवहि न काढतां आपल्याच उद्योगांत गर्क असलेले दिसत; तेव्हां निजामला नाइलाजानें माणसाई सोडून 'मोगलाई'चा स्वीकार करावा लागला. अशानें जो डाव पेशव्यांनीं आपणांवर केला तोच आपण त्यांजवर उलटवूं म्हणजे युद्धक्षेत्रहि बदलेल व गांठ पडण्यास उशीर लागणार नाहीं अशी ही नवीन योजना हातांत घेतांना त्याचा कयास होता तो कितपत सिद्धीस गेला हें आतां लवकरच दिसेल.

## देवाण-घेवाणाचा अपूर्व समारंभ !

प्रथम निजामनें आपल्या फौजेच्या दोन टोळ्या करून एकीनें पेशव्यांच्या मुलखांत शिरून त्यांचा सत्यनाश करावा; व दुसरीनें पेशव्यांच्या फौजेच्या पिच्छावर रहावें असें ठरविलेंसें वाटतें; पण शेवटीं सर्वांनींच पेशवाई मुलखांत जाण्याचें मुक्रर होऊन मोगलानें पैठण सोडिलें व तो पुण्याचा रोख धरून चालिला. चैत्र वा। एकादशी-द्वादशीच्या सुमारास मोगलानें पुन्हा पेशवाईंत पाय टाकिला व नवीन प्रयोगाचा अमल सुरू झाला. त्यानें आपल्या फौजेच्या तीन तुकड्या केल्या व एकदम चोहोंकडून एकच हाहाःकार उडविला. या व्यवस्थेनें पेशवे, आपण जसें प्रथम त्याच्या मुलखांतून आपल्या मुलखांत धांवत आलों, तसे तेहि आतां येतील ही त्याची कल्पना अनुभवांतीं फोल ठरली; व पेशव्यांनींच उलट त्याला सर्वच रान मोकळें करून देण्याची व्यवस्था केली. पेशवा व राघोबा यांनीं गोपिकाबाईस व पुण्याच्या अधिकाऱ्यांस पुणें मोकळें करून सिंहगडीं जाण्याचें लिहिलें व यापुढें मोगलाकडील कोणाहि स्वकीयांवर कसलाहि विश्वास न ठेवण्याचें बजाविलें. पण गोपिकाबाईला येथेंहि आपल्या हेकटस्वभावाचें प्रदर्शन करण्याची हुक्की आली व तिनें येणाऱ्या सर्व सूचना धाब्यावर बसवून वरतें चिरंजिवाचा लग्नसोहळाच पार पाडण्याचें ठरविलें. याला म्हणतात स्त्रीबुद्धि ! इकडे पेशव्यानें मोगलाचाच मार्ग अनुसरून त्यास झगझगीत उत्तर देण्याची तजवीज केली. त्यांनींहि आपल्या फौजेच्या तीन टोळ्या करून मोगलाईंत खूपच दंगा चालविला व तेथील रयतेला त्राहि भगवन् म्हणण्यास लाविलें. दोनतीन महिने वऱ्हाड-मोगलाईसारख्या समृद्ध प्रदेशावर यथेच्छ ताव मारण्यास सांपडल्यामुळें आतां मराठ्यांची फौज ताजीतवानी झाली होती. त्याच्या उलट सुखलोलुप मोगलांना अंदाजाबाहेरील श्रमानें जीव नकोसा होऊन गेला होता. दरिद्री महाराष्ट्रांत दुर्लौकिकावांचून दुसरें कांहींच त्यांच्या पदरांत पडूं शकलें नाहीं. महाराष्ट्रीय

संस्थानिकांना परंपरागत रीतीनें असलेल्या ताबेदारीत सुरक्षित कसें राहावें याचे मार्ग अवगत होते त्यामुळें ते कांहीं त्यांना फारसे विरोधी लागत नाहींत. राहतां राहिली गोरगरिबें; या त्यांचे हे कोण घेणार! त्यांच्या जीविताची व अब्रूची विटंबना करून मोगलांना समाधान मानून घ्यावें लागलें. या प्रसंगीं खरें नुकसान झालें तें पुण्याचें व भोंवतालचें: या बाबी सर्व जबाबदारी गोपिकाबाईवरच येऊन पडते. या बाईनें आपली बुद्धि न चालवितां पूर्वसूचनेनुरूप आचरण ठेविलें असतें तर हेंहि नुकसान खास टळलें असतें, पण तिचा गोपाळरावावर पटवर्धनावरील खास विश्वास येथेंहि नडला. गोपाळरावाला आपल्या स्थानाचा विसर पडल्या-मुळेंच त्यानें भलतीच जोखीम शिरावर घेऊन, पुण्याचा व पेशव्यांना सत्यनाश करण्याचा अघोर रीती घेतला. शिंद्यांनीं सावधतेनें वागण्यांत येथेंच काम ते प्रवीण होते व निजामअली ती विना अगदीं जाणता नव्हता असें थोडेंच होतें! तो पेशव्यांकडून आलेल्या लोकांस मानानें ठेवून त्यांना त्यानें आपल्या सल्लामसलतीत कधींच शिरकाव होऊं दिला नाहीं. त्यामुळें प्रसंग आला तेव्हां पुण्याचें संरक्षणाची व पेशव्यांच्या दौलतीच्या सुरक्षितेची गोपाळरावानें दिलेली हमी तो फेटून घ्यावा व सासवड-हिवऱ्याकडूनच पुण्याचा दर करून पटवर्धनाची हद्दि त्यानें साफ केली. 'ससाराना'चे सासवड व हिवरे येथील होन पाहण्याची ईर्षा झालेला गोपाळरावास काय माहीत, कीं त्याच वरकुडांतील येथानर आपल्या आवडत्या पुण्याची राखरांगोळी करून भोंसल्यांना आपल्या डोळ्यादेखत फकीर करून सोडील. 'करावें तसें भरावें' या म्हणीची सत्यता या प्रसंगीं जशी स्पष्ट प्रत्ययास येते तशी इतरत्र क्वचितच निदर्शनास येईल! असो. घोडनदीच्या प्रसंगापासून गोपिकाबाईची राज्यकारभारांतील हुकूमत मागे पडत चालली होतीच, तिचा या हेकट कृत्यानें आतां पुरा शेवट झाला व यापुढें ही बाई माधवरावाच्या कारकीर्दीत तशी राज्यकारभारांत कधींच भाग घेऊं शकली नाहीं. निजामानें जवळजवळ एक महिना पेशव्यांच्या हद्दीत धुमाकूळ घातला: पण या अवधींत त्याच्या पदरीं असणाऱ्या जागीं अनायास मेनका घांबला गेला. आपल्या डोळ्यादेखत आपल्या मायभूमीची निजामानें केलेली राखरांगोळी पाहून त्याकडे आश्रयार्थ गेलेली पेशव्याकडील मंडळी पस्तावून किंकर्तव्यमूढ झाली. इकडे आपल्या पायका तुकड्यांच्या छाप्याच्या माराचें ऐकून मोगल युद्धविन्यासाची पेशव्यांच्या सैनिकांची ईर्षा चळावली; व पेशव्याला भावी यशाचा हा प्रभातकालच उजाडल्याचा भास झाला. पेशव्यानें या अवधींत मोगलाईवर उलट जोराचा हात मारून त्याला दरें म्हणविलें. या उलटपालटीमुळें नेमकें हल्का करण्याच्या इतरहि मार्गांकडे त्याची काकदृष्टि होतीच. निजामअलीचा भाऊ सलाबतजंग यांजकडे पेशव्याची राजकारणें सुरू असून त्याला त्यानें वश्य करूनहि आपलें होते. आपलेकडील रुष्ट झालेले सरदार

समजविण्याचा प्रयत्न त्यांनीं कधींच मागें टाकिला नव्हता. पेशवाई मुलखांत निजामअल्लीनें केलेल्या वेडेचारानें हे लोक हातीं लागण्याची जास्तच खात्री वाटूं लागली व या बदललेल्या परिस्थितीचा भरपूर फायदा घेण्यास पेशव्यांनीं मुळींच आळस केला नाहीं.

## फोडा व झोडा

निजामकडे गेलेल्या मंडळींची समजूत काढण्यानें काम आतां बरेंच सुखकर झालें. त्यांपैकीं जे आपखुषीनें येऊं पाहात होते, त्यांच्या मार्गांत कोणत्याहि प्रकारें अडथळे येऊं नयेत व त्यांच्या मनांत कसलेंच किल्मिष राहूं नये, याची पेशवा व कारभारी योग्य काळजी घेत असत. जसें कांहीं, कांहींच झालें नाहीं इतक्या मोकळ्या मनानें तें त्यांचें स्वागत करीत व पुन्हा त्यांना कार्यास जुंपीत. असला मोठेपणा खऱ्या राजकारणी पुरुषावांचून इतरांस कसा साधणार? राजकारणापुढें वैयक्तिक मानपान बाजूला ठेवून झाल्यागेल्यावर योग्य पांघरूण घालून लायक माणसें लगामीं लावण्याची हातोटी ज्याला साधली तोच खरा राजकारणी आणि अशाच्या हातूनच मोठमोठीं कार्ये पार पडतात. एवढ्या-तेवढ्याकरितां घासाघीस करणारा आणि आधीं स्वार्थ व नंतर राजकारण असा क्रम लावणारा राजकारणी कसला? अशा रीतीनें उदार धोरण या वेळीं पेशवाई दरबारांत चालू झाल्यामुळें निजामशाहीचा अनुभव घेतल्यामुळें शहाणे झालेले कित्येक लोक आतां भराभर येऊं लागले. रुसलेले लोक जसजसे समजूं लागले तसतशी पेशव्याला भावी यशस्वितेची खात्री पटूं लागली. सगळ्यांत भोसल्याला परत आणणें बरेंच अवघड होऊन बसलें होतें, कां कीं, तो आतां भलत्याच मनोराज्यांत गर्क झाला होता. मूळ त्याच्याच मनानें घेतलेलें असो अगर इतर विघ्नसंतोषी लोकांचे चिथावणीनें असो, त्याला पेशव्यानें एकट्यानेंच छत्रपतींची सत्ता हातांत घेतल्याचें बरेंच वैषम्य वाटत होतें व आतां तुम्ही इतके दिवस जें केलें तेंच आम्हीं कां करूं नये इतपत त्याच्या महत्त्वाकांक्षेचा पारा चढला होता. तेव्हां त्याची एवढी भरारी बंद पाडावयाचें असल्यास, ती पदरांत कांहीं भरीव टाकल्यावांचून बंद कशी पडावी? त्यामुळें भोसल्याची समजूत पटण्यास कालावधि लागला. ज्येष्ठ लागतां लागतां मोगल पेशवाई मुलूख सोडून पुन्हा आपल्या हद्दींत शिरला व केलेला प्रयोग अंगलट आल्याचीच केवळ पर्यायानें त्यानें कबुली दिली. पुण्याची केलेली दुर्दशा पेशव्यास अगदींच जाणवली नाहीं असें नाहीं, पण त्यानें धीर न सोडतां निश्चित कार्यक्रम रेसभरही ढळूं दिला नाहीं, कीं तो आपल्या मुलखांत परत जाण्याच्या भरीस पडला नाहीं. आपण म्हणूं तसें दान त्यास जसजसें पडूं लागलें तसतसा त्यास झालेल्या नुकसानीचा विसर पडत चालला व गनिमीकाव्यावरील श्रद्धेचें दृढीकरण

झालें. पण जेष्ठाच्या सुमारास अखूट मोहोरण्याचा काळ जवळ येत असलेला पाहून हलवार मनाच्या सेनापतीच्या– विशेषतः राघोबाच्या चित्तांत लढाई देऊन एकदांचा सोक्षमोक्ष करून घेण्याची उत्सुकता वाढत चालली. पण होळकरानें व सखारामबापूंनें 'जरा धीर धरा, इष्ट काल अद्याप आला नाहीं', अशी समजूत घालून कसेंतरी गप्प बसविलें. तरीपण अधूनमधून त्यास लढाईची हुक्की येई व त्याची ती उर्मी दाबतां दाबतां उभयतांना नाकीं नव येत. भोसल्याची ताटातूट केल्यावांचून निजामशीं गांठ घातल्यास यशाचें पारडें इष्ट तिकडे झुकेलच असें त्यांस वाटत नव्हतें. सहा महिन्यांच्या धांवपळींत निजामचा, मराठ्यांच्या अपेक्षेप्रमाणें, तोफखाना जरी जवळ जवळ निरुपयोगी झाला होता व उत्तरोत्तर मराठी फौजहि त्यास आस्ते कदम सोडून जात होती; पण भोसल्यानें गच्छ केल्यावांचून खरा हलकेपणा आला असें मानणें शक्य नव्हतें. मोगल आपल्या प्रदेशांत आला तरी त्याच्या मागची धांवपळ सुटली नाहीं. पावसाळा डोक्यावर येत चाललेला पाहून मोगलाची चिंता दुणावली व साक्षात् पावसाळा सुरू झाल्यावर तर त्याच्या काळजानें ठावच सोडला. मावळांत व कोंकणांत सतत चार महिने तिंबत राहणारे मराठे देशावरच्या पावसाळ्याला थोडीच दाद देणार! तशींच त्यांचीं तीं निरथडी व भिमथडी तट्टें, कीं ज्यांचे मावळांतील कुरणांत पावसाळेच्या पावसाळे जात.

सांगण्याचे तात्पर्य इतकेंच कीं, पावसाळ्याची पर्वा पेशव्यांच्या घोड्यांना व बारगिरांना मुळींच वाटली नाहीं. त्यांना खरी जर भीति वाटत असेल तर गंगेच्या पाण्याची. गंगा उतरून उत्तरेस जाऊन पडल्यावर छावणी करण्याचा प्रसंग आल्यास त्यांना कोठेंच सुरक्षित ठाव नव्हता. म्हणून पावसाळा सुरू झाल्यानंतर पेशव्यांनीं मुळीं ठरवूनच टाकिलें होतें कीं, गंगेच्या उत्तरेस पाऊलच टाकावयाचें नाहीं. जे कांहीं करावयाचें तें गंगेच्या दक्षिणभागीं उभें राहून करावयाचें. तें नच जमेल तर यंदा नाहीं तर पेस्तर, हा त्यांचा निर्धार कायम होता. निजाम गंगेच्या उत्तरेस गेल्यावरच मग मोगलाईतून पाय काढावयाचा व जवळच खानदेशात छावणी टाकावयाची असाहि त्यांचा बेत होता; पण निजामची परिस्थिति याच्या उलट होती. तो आता जेथें उभा होता तेथे त्याला छावणीला जागाच नव्हती. गंगा उतरून औरंगाबादेस जाईल तरच तो सुरक्षित राहणार होता. तेव्हां पावसाचा जोर जसजसा वाढत जाईल तसतसा निजाम गंगा उतरण्यास घाबरा होईल आणि मगच आपली बहुता दिवसांची इच्छा शेवटास जाईल असा पेशव्यांनीं कधींच कयास बांधिला होता. म्हणूनच या संधीच्या आधीं ज्या ज्या वेळीं राघोबा लढाईची भाषा बोलूं लागे त्या त्या वेळीं होळकराला व बापूला त्याची ती उर्मी दाबावी लागे. एकदा तर दादा अगदींच हट्टाला पेटला व उद्यां

लढाई देईनच अशा वर्दळीवर आला. तेव्हां सखारामपंतांनीं त्याच्या मर्जीतल्या शागिर्दाची दाढी धरून त्याकरवीं यजमानास जाग्यावर बसविलें. निजामाला गंगा उतरत असतां गांठावयाचें हें एकदां निश्चित झाल्यावर शिकारी जसे सावज हुसकून गोळ्यावर आणण्याची पराकाष्ठा करितात तोच मासला पेशव्यानें करून निजामला घुलवीत घुलवीत गंगेवर आणिलें व तेथेंच त्याचें कंदन करून बहुता दिसांचें पारणें फेडलें; पण या 'झोडण्याचा' कार्यक्रम पार पाडण्याशीं पेशव्यानें अंगीकारलेल्या फोडण्याच्या चळवळीचा निकट संबंध येऊन पोंहचत असल्यानें तिकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं.

गोपाळरावाच्या मागण्या बहुतेक कबूल झाल्यामुळें तो आषाढ वद्यपक्षीं परत येण्यास राजी झाला. सहा महिन्यांच्या अनुभवानें गोपाळरावादिकांची खात्री होऊन चुकली होती कीं, निजामाच्या दरबारांत आपली कांहीं डाळ शिजावयाची नाहीं व वाईटपणा पदरीं घेऊन केलेल्या मसलतीनें 'सखारामा'चेंहि स्थान ढळत नाहीं, तेव्हां पडत्या फळाची आज्ञा घेऊन आलेलें आमंत्रण यानें स्वीकारलें व पुढेंमागें करावी लागणारी आगंतुकीहि टाळली. होळकरांसारख्या वजनदाराच्या मध्यस्थीनें गोपाळराव, मोरोबा फडणीस व पिराजी नाईक आषाढ सरतां सरतां पावसाळ्यामुळें घरीं जाण्याचें निमित्त करून पेशव्याकडे आले. राहतां राहिले भोसले! पण तेहि आतां विशेष आग्रहास न पडतां समजुतीवर आले व निजामला सोडण्याचें त्यांनीं निश्चित केलें. कांहीं थोडे वादग्रस्त मुद्दे राहिले होते, त्यांची स्पष्टता करवून त्यांस आणण्यास सखारामबापू रवाना झाला. इतक्यांत मराठ्यांनीं पसरलेल्या जाळ्यांत निजाम अडकला जाऊन राक्षसभुवन येथें ह्या अभूतपूर्व मोहिमेचा शेवट झाला तो प्रकार असाः—

## राक्षसभुवनची लढाई

सबंध आषाढ महिनाभर पावसानें अगदीं कहर उडवून दिला. गंगेचें पाणी एकसारखें वाढूं लागलें. अशा स्थितींत फौजांना निरोप देणें जरूर झालें. निजामकडील बहुतेकांनीं निरोप घेऊन घरचे रस्ते सुधारले. आतां त्याजवळ अवघी पंधरा-सतरा हजार फौज राहिली. उरलेली फौज घेऊन एक पेशव्यांच्या अंगावर तरी चालून जावें अगर औरंगाबाद गांठावें, या दोन मार्गांशिवाय अन्य मार्ग त्याला उरला नाहीं. आषाढ वा ५ स मोगलाचा मुक्काम धारुराजवळ असून त्याच दिवशीं पेशव्याचा मुक्काम सोनारीस होता. आषाढ वा ११ स श्रीमंताचा मुक्काम बीडनजीक झाला व मोगल शहागडाजवळ गंगा उतरण्याचा विचार करूं लागला. मराठ्यांचा खंडणी वसूल करण्याचा क्रम चालूच होता. त्यांनीं बीड-जवळून एक लक्ष बारा हजार खंडणी वसूल केली. शहागडाजवळ मोगल गंगा उतरण्याचा विचार करीत असतां त्याची फौज अगदींच हलकी झाली. भोसले

अद्याप त्याला निकटून होता; पण त्याच्या फौजेला अन्नाचेंहि मानसिक पडूं लागल्यामुळें लोक भराभर उठून जाऊं लागले होते. अखेर आषाढ वा १४ सोमवारीं मोगल राक्षसभुवनावर गंगा उतरूं लागल्याची खबर आली. तोफखाना व कांहीं फौज पारहि झाली. सडी फौज मात्र ऐलतीरास राहिली तेव्हां ज्या दिवसाची पेशवे आज सहा महिने चातकाप्रमाणें वाट पाहात होते तो दिवस उजाडला. आषाढ वा ३० स पेशव्याचा मुक्काम राक्षसभुवनापासून आठ कोसांवर मांदवमोहीस होता. त्याच दिवशीं भोसले निजामापासून रुसकत होऊन बारा-चौदा कोस खालीं गेले. खरी वेळ हीच होती आणि ती पेशव्यानें साधून ईप्सित कार्य उरकलें. श्रावण शु। १ बुधवारीं आठ कोसांची मजल मारून गंगा उतरत असलेल्या मोगल फौजला दोन प्रहरीं गांठलें व तिजवर निकराचा हल्ला चढविला. खासा निजामअल्ली व बहुतेक तोफखाना आदल्या दिवशींच गंगापार झाला होता. दिवाण विठल सुंदर वगैरे उमराव व सडी फौज मात्र अलीकडे होती. आघाडीस आबा पुरंदरे, महिपतराव चिटणीस, महादजी शितोळे, माधवराव नरसिंह हुजूरपागा वगैरे होते. इतक्यांत नबाबाकडील दारूखान्यास आग लागून गोंधळ झाला, त्याचा फायदा घेऊन आबा पुरंदऱ्याकडील हरी गोपाळ व विठ्ठल शिवदेव याजकडील फौजेनें तोंड लाविलें तोंच श्रीमंतहि येऊन पोंहोचले.' नीलकंठ महादेव वगैरेनीं एकच हुल्लड केली व हातघाईस सुरवात झाली. लढाईच्या गर्दीत खासा दादासाहेबाचा हत्ती विठ्ठल सुंदरानें वळवून नेला. तेव्हां माधवरावानें स्वतः पुढें होऊन लोकांना उत्तेजनें देऊन दादाचा हत्ती परतविला. ऐन लढाईचे गर्दीत विठ्ठल सुंदर गोळी लागून ठार झाला व लढाई बिघडून मोगलाचा मोड झाला. या दिवशीं उभय दळांतील पांच-सात हजार माणूस रणास आले व श्रीमंतांची फत्ते झाली (रा. खं. १० ले. २१). मोगलाकडील दिवाण विठ्ठल सुंदर, विनायकदास खंदारचा राजा ठार होऊन मुरादखानादि तेरा उमराव पाडाव आले. हा सर्व संहार गंगेपलीकडून निजाम-अल्ली पहात होता; पण तो आपल्या लोकांची कुमक करूं शकला नाहीं. उलट तोफा व इतर युद्धोपयोगी साहित्य तेथेंच टाकून त्यानें रातोरात औरंगाबादेचा रस्ता सुधारला. 'पूर्वी दोन तीन लढाया झाल्या परंतु मोगलास या तऱ्हेची जरब कधींच बसली नव्हती.' (ऐ. ले. सं. नं. ३३९) असें खुद्द पेशवाच म्हणत आहे; पण विद्यमान माहितींत या मागल्या लढायांचा उल्लेख आढळांत येत नाहीं, यावरून त्यांचा मागील मोहिमांशीं संबंध जोडावासा वाटतो. या दिवशीं मोगलांकडील बावीस तोफा, पंधरा हत्ती, व घोडीं, उंट, बैल वगैरे बहुत लूट लष्करांत आली. सहा महिने मोहीम चालून एकाच लढाईत अपेक्षेप्रमाणें शत्रूचा संपूर्ण पाडाव केल्याचें उदाहरण पेशवाईच्या इतिहासांत येवढेंच असेल.

## तहाची वाटाघाट

राक्षसभुवनचे लढाईनें या मोहिमेचा शेवट झाला नाहीं. निजामअल्ली राक्षसभुवनावरून जो पळाला तो त्यानें शहर गांठलें व तेथें आपल्या फौजेची जमवाजमव चालविली. हल्लीं त्याजवळ पांच हजार फौज, चार हजार गाडदी व बावीस तोफा एवढा सरंजाम होता. गंगा उतरून पेशव्यानें त्याच्या पिच्छावर जावें तर मोगलानें आपला उतार झाल्यावर भोंवतालच्या सर्व नावा जमा करून त्या फोडून बुडवून टाकिल्या होत्या, त्यामुळें पेशव्यास गंगेस उतार होईपर्यंत स्वस्थ बसावें लागलें. लढाईनंतर पेशवा परत पैठणास आला व तेथेंच उताराची वाट पाहूं लागला. श्रावण शुा १२ च्या सुमारास उंट हत्तीचा उतार झाला व होळकर उतरूं लागला. पौर्णिमेला चांगलाच उतार झाल्यामुळें त्याच दिवशीं पेशव्यांची फौज पैलतीराला गेली. मध्यंतरींच्या काळांत सल्याचें बोलणें करण्याकरितां मुरादखानानें मोगलाकडे चक्कर मारून पेशव्याचा मतलब काढून नेला होता. वास्तविक ही वेळ मोगल साफ बुडविण्याची असतां लोकांना द्यावयास पेशव्याजवळ पैका नसल्यामुळें व 'लोक हुजुरातचे आणि पतक्याचे बहुत करून घरेंदारें लुटली व जाळली' यामुळें देशी गेले याकरितां सल्यावर येऊन पडलें. शिवाय यापुढें मोहीम तशीच चालू ठेवण्यास अवांतर पेचामुळें सवडच नव्हती. पेशवे गंगापार झाल्यावर महंमद मुरादखान पुन्हा आला '१ करोड दहा लक्षांची जहागीर, खंदार, अंतूर, आवशे हे तीन किल्ले व औरंगाबाद शहर देण्याची पेशव्याची मागणी त्याला मान्य न झाल्यामुळें तो परत गेला व दोन्ही पक्ष पुढच्या तजविजीस लागले. श्रावण वद्य ८ स पेशव्यानें पैठण सोडलें व मोगलहि शहराबाहेर पडणार असा सुमार दिसूं लागला. राक्षसभुवनच्या लढाईच्या आधीं सखारामबापू भोसल्याकडे गेला होता, तो लढाईनंतर भोसल्यास घेऊन आला. हल्लीं भोसले ससैन्य श्रीमंतांच्याच लष्करांत होते; पण इतरांप्रमाणें त्याचीहि खर्चावीण हलाखीच होती, त्यामुळें व पावसामुळें गंगापार झाल्यावरहि एक दिवस घोटाळा झाला. शेवटीं भोसल्याची खर्चाची व्यवस्था झाल्यावर श्रावण वा। १० स पेशवे शहराच्या रोखें चालूं लागले. निजामअल्लीहि लढाईच्या तयारीनें बाहेर पडला. त्यांच्यांत लढाईचा बिलकुल त्राण राहिला नसून हें केवळ नुसतें अवसान होतें. पेशवे शहरास पोंहोचले. तेथें त्यांचा मुक्काम दोन महिने होता. या अवधींत लढाई वगैरे कांहीं एक न होता केवळ तहाच्या वाटाघाटीच होत होत्या. शेवटीं अनेकदां तहांतील कलमांची फिरवाफिरव होऊन मोगलानें ब्यायशी लक्षांची जहागीर देण्याचा ठराव होऊन विजयी पेशव्याची स्वारी अकरा महिन्यानंतर आश्विन वद्य पक्षीं पुण्याचा रस्ता चालूं लागली.

## राक्षसभुवनची फलश्रुति

राक्षसभुवनच्या प्रसंगानें निजामअलीची खात्री होऊन चुकली कीं, पेशवे हे कांहीं झालें तरी आपणास अजिंक्य आहेत आणि ते आपल्या हातून कोणत्याहि स्थितींत बुडविले जाणें शक्य नाहीं. करितां ते व आपण गुण्यागोविंदानें चाललों तरच दोघांचा फायदा होईल. हें ज्ञान निजाम येथेंच मिळविता झाला आणि पुढें किंत्येक वर्षें पेशव्याना निजामाकडून कसलाच उपसर्ग पोहोंचला नाहीं व ते अनेकदां परस्परांचे साहाय्यक बनले, याचें सर्व श्रेय राक्षसभुवनच्याच वांट्यास येतें. तसेंच या प्रसंगानिमित्तानें पेशवाईतील पक्षोपपक्षाच्या सामर्थ्याचा व कर्तृत्वाचा अंदाज लागून पेशवा माधवरावाची पुढील कारकीर्द कोणत्या प्रकारें चालीस लागणार हेंहि प्रत्ययास आलें. हा पेशवा राजकारणकुशल असून रणांगणावरहि वडिलाची परंपरा चालविण्यास समर्थ असाच आहे ही गोष्ट उत्तम रीतीनें सिद्ध झाली. अर्थात् भावी कारकीर्द स्वतंत्र व तेजस्वी होणार ही भविष्यवाणी राक्षसभुवनानें वदवून पेशवाईची कुचंबणा थांबणार व गतवैभव पुनरपि प्रस्थापित होणार असें पाहून तिच्या हितचिंतकांस हायसें वाटल्यास नवल कसलें ! हैदरचा वाढता जोर व उत्तरेंतील मानगडी मिटविताना जे अनेक संग्राम करावे लागतील त्यात कोणती युद्धपद्धति अंगिकारणें हिताचें होईल हें तरुण पेशव्यानें चाणाक्षपणें याच वेळीं ठरवून टाकिलें. मराठे सेनापती व सैनिक याना गनिमी कावा जसा साधतो तशी इतर युद्धपद्धति जमत नाहीं अशी खात्री झाल्यामुळें मराठ्यानीं यापुढें आपलें जुनें ठेवणेंच अनेक प्रसंगीं पुढें केल्याचे दिसून येईल. सखारामबापू व त्याचा पक्ष यांची तर ही परीक्षेचीच वेळ होती आणि संतोषाची गोष्ट ही कीं, ते या दिव्यातून उत्कृष्ट रीतीनें पार पडले. घोडनदीच्या प्रसंगीं पेशव्यानें, आपल्या पदरच्या सरदाराच्या समजुती करीत असता, आबा पुरंदरे, सखारामपंत, विठ्ठल शिवदेव, नारो शंकर याचे सरंजाम वाढविले होते आणि याबद्दल अनेकाना अनेक कारणांनीं हेवा वाटून त्याजकडून सदर कृत्याची स्पष्ट नापसंतीहि दर्शविली गेली होती. पण या मडळींनीं या प्रसंगीं निरलसपणे सेवा करून दाखवून तोंडचे फवारे कृतीच्या माऱ्यानें बंद पाडिले व 'सेवक जो दौलतीचा खैरखवाई ( हितकर्ता ) तो आपला उपयोगी येैसे ध्यानात आणून सर्वावर कृपा योग्यायोग्य असावी' (पृ. १५–१६) हा नियम तरुण पेशव्याच्या प्रत्ययास आणून दिला. या सहा महिन्यात आबा पुरंदऱ्यानीं गोपाळराव पटवर्धनाचा पराभव, रामचंद्र जाधवाच्या बंदोबस्त व शेवटच्या राक्षसभुवनच्या लढाईतील पराक्रम पेशव्याच्या निदर्शनास आणून आपल्या पदाचें सार्थक केलें व पुरंदऱ्याचें नाव राखून त्याचें पेशवाईतील स्थान कायम राखिलें. सखारामबापूचें राजकारणपटुत्व व त्याचें पेशवाईतील वजन सिद्ध होऊन 'माझ्यावर भरवसा ठेवा व माझा पराक्रम पहा'

अशी त्याची यथार्थ गर्वोक्ति पुनश्च प्रस्थापित झाली. रुसलेल्या सरदारांचा बंदोबस्त करीत असतां राजकारणांत खासगत हितसंबंध आड येऊं न देण्याची त्यानें घेतलेली खबरदारी पाहिली असतां असले खंदे राजकारणी पुरुष पेशव्याच्या पदरीं होते म्हणून पेशवाईची धडगत लागली. नाहींपेक्षां निजामनें पटवर्धनादिकांच्या मदतीनें या वेळीं पेशवाईचा यज्ञ केलाच होता. होळकर, भोसले यांनीं आर्जवें करून त्यांचें सहाय सखारामपंतानें पेशव्यांना मिळवून दिलें यांत त्याचा शहाणपणा जरी सिद्ध होतो तरी त्यानें गोपाळराव पटवर्धनाच्या बाबतींत दाखविलेला मोठेपणा हाच खरा कौतुकास्पद होय. ऐ. ले. सं. तील नं. ३२० चें गोपाळराव पटवर्धनाचें कूटपत्र अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. या पत्राच्या स्पष्टीकरणार्थ कै. खरेशास्त्री यांनीं दिलेली विस्तृत टीपहि तितकीच महत्त्वाची आहे. परंतु ऐ. ले. सं. तील 'लेले संग्रहां'तील पत्रांचा परामर्श घेण्यांत दिसलेली परकीयत्वाची भावना याहि पत्राच्या बाबतींत दिसून यावी याचें आश्चर्य वाटतें. तेव्हां 'वास्तव तुम्ही आपला प्रकार सकारनामक व उभयता मध्यस्त यांचेखेरीज फुटू नये' (पृ. ५५३) या गोपाळरावाच्याच लेखर्णातील वाक्याचा खुलासा टीपेंत करून प्रस्तावनेंत त्यावर चार गोड शब्द लिहिण्याची शास्त्रीबुवांना जरी जरूर वाटली नाहीं तरी आम्हांस हें वाक्य अत्यंत महत्त्वाचें वाटतें व आम्ही आमच्या वाचकांचें तिकडे लक्ष वेधितों. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, गोपाळरावाशीं पेशवाईत परत येण्याचें बोलणें करण्यांत सखारामपंताचें महत्त्वाचें अंग होतें व तेथेंच त्याचा व्यक्तित्व विसरण्याचा गुण खरा कसास लागतो. या प्रसंगानें सखारामपंताच्या मुत्सद्दीगिरीवर जसा प्रकाश पडतो, तसें त्याचें सेनापतीत्वहि उत्तम रीतीनें कसोटीस उतरतें. या मोहिमेच्या आराखड्यापासून तों अखेरपर्यंत रंग भरण्यांची सर्व करामत सखारामपंताचीच आहे ही गोष्ट त्याच्या निंदकासहि विसरतां आली नाहीं हें ध्यानांत धरलें पाहिजे. आतां या निंदकांनीं निर्मळ स्तुतीच्या खिरींत मिठाचा खडा टाकून आपली हौस फेडून घेतली असल्यास तो त्यांचा धर्म त्यांनीं केला एवढेंच फार तर म्हणतां येईल; पण त्यामुळें या पुरुषानें बजाविलेल्या कामगिरीवर मात्र विरजण पडूं शकत नाहीं. आतां माधवराव पेशवे, मल्हारराव होळकर यांच्या मदतीच्या अभावी एकट्या सखारामपंताच्या हातून ही मसलत शेवटास गेली नसती हेंहि जरी खरें आहे तरी तो प्रश्न सखारामपंताच्या भूमिकेचा असून त्यानें त्याच्या कर्तृत्वाला बाध येत नाहीं. पेशवे हा मालक, होळकर करामती, वजनदार व मालकाच्या मर्जीतला—तेव्हां सखारामपंतासारख्या नौकराला कांहीं असलें तरी त्यांच्या पाठिंब्यावांचून कोणतीच गोष्ट शेवटास नेतां आली नसती. होळकर, पेशवा व राघोबा यांनीं दिलसफाईनें वागून आलेल्या संकटास मोठ्या चातुर्यानें तोंड दिलें याबद्दल ते केव्हांहि स्तुतीस पात्रच आहेत.

## पुरंदरे मंडळी.

धोंडो मल्हार ऊर्फ आपा, नीलकंठ महादेव ऊर्फ आबा, त्र्यंबक सदाशिव ऊर्फ नाना ही मंडळी या वेळीं हयात असून यांचा चालू कारकीर्दींत अनेक राजकारणांशीं संबंध येऊन गेलेला आहे. आपावर भाऊसाहेबांचा लोभ विशेष असून त्यांचा त्यावर अत्यंत भरवसाहि होता ही गोष्ट पुरंदरे दफ्तर भा. १ मधील अनेक पत्राधारें सिद्ध होत आहे. पण हा मूलतःच अशक्त प्रकृतीचा, त्यामुळें तो आपले दरक सांभाळण्यापलीकडे इतर राजकारणांत विशेष पडलेला दिसत नाहीं. माधवरावाची कारकीर्द सुरू झाली तेव्हा मल्हार धोंडदेव ऊर्फ दादा व सदाशिव धोंडदेव ऊर्फ पाटील हे याचे मुलगे चागले कर्ते असल्यानें तेच सरदारीचा सर्व कारभार पहात. पक्षभेदांत यानें उघड रीती नें माधवरावाचा पक्ष स्वीकारला होता, ही गोष्ट या भागातील बऱ्याच लेखांकांनीं स्पष्ट झाली आहे. खासगी कारणानें आबाशीं आपा व त्याचें चिरंजीव वाकूनच राहात, त्यामुळें तो कारभारांत असेपर्यंत या घराण्याची कुचंबणाच झाली. धोडनदीच्या प्रसंगीं हे माधवरावाकडूनच लढले. मागील विवेचनांत आबाच्या संबंधानें माहिती येऊन गेलीच आहे. नाना पुरंदरे हा महत्त्वाचा पुरुष असून तो माधवरावाच्या कारकीर्दींत अनेक कारणानीं मागें पडला. खासगी प्रसंगामुळें आबा व सखारामपंत यांशीं त्याचें बिल्कुल सख्य नव्हतें. हें एकमेकांकडे वैऱ्यासारखेच पहात असत. दरबारात पक्ष पडले तेव्हां याला 'इकडे आड व तिकडे विहीर' होऊन गेली. हा राघोबाचा लंगोटीयार, तेव्हां त्याशीं विरोध करणें याला शक्य नव्हतें; पण आबा व सखारामपंत यामुळें त्याच्या उघड पक्षांतहि सामील होता येईना. शिवाय नानासाहेबाची नानावर मुलापेक्षाहि माया अधिक होती असें असतां माधवरावाचा पक्ष न धरणें म्हणजे कृतघ्नतेचा दोष पदरीं पडतो. अशा स्थितींत यानें राक्षसभुवनचे प्रसंगापर्यंत जवळ जवळ अज्ञातवासांतच दिवस काढले. अर्थात् याच्या जुन्या माहितगारीचा व कर्तृत्वाचा विद्यमान राजकारणांत मुळींच उपयोग झाला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. आबानें तर हातीं सत्ता येतांच भाऊचंदकी गाजवून याचा सरंजामहि जप्त करण्यास कमी केलें नाहीं. राक्षसभुवनानंतरच्या काहीं काळच्या पक्षहीन वातावरणांत कर्नाटकचे मोहिमेंत यानें काम केलें; पण नानाभाऊंच्या अमदानींतलें स्थान हा मिळवूं शकला नाहीं. शेवटीं क्षयानें बरेच दिवस अंथरुणाला खिळून शेवटीं शके १६९० च्या मार्ग.शु.३स वारला. याचा मुलगा महिपतराव त्र्यंबक ऊर्फ बजाबा हा पानपतापासूनच राजकारणात हळू हळू प्रवेश करीत करीत हल्लीं बराच पुढें आला होता. पुढील कर्नाटकच्या वगैरे मोहिमात हा हजर होता. नानाची कुचंबणा याच्याहि वाट्यास आली व पहिली चारपांच वर्षें वडिलाप्रमाणें यालाहि अज्ञातवासांतच घालवावीं लागलीं. पुढें पुढें याचा जम बराच बसत चालला. बापाप्रमाणें हा सखाराम-

पंतांशीं फटकून वागला नाहीं. त्यामुळें याचा प्रगतीचा मार्ग बराच सुखकर झाला. ले. ११८ ही नाना पुरंदऱ्याची आत्मचरित्रवजा यादी, नानासाहेबांच्या कारकीर्दींतील बरेच महत्त्वाचे प्रसंग उलगडीत आहे; यामुळें महत्त्वाच्या ऐतिहासिक पुराव्यांत तिची गणना होईल.

## कारभाऱ्यास सेवेचा योग्य मोबदला !!

## पुरंदर कोळीदंगा

[ शके १६८६ वैशाख ते शके १६८७ अखेर ]

शके १६८३च्या आषाढांत माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें झाल्यापासून राक्षसभुवनाच्या प्रसंगाअखेर सखारामपंत व आबा पुरंदरे यांनीं कारभारी या नात्यानें पेशवाईची केलेली सेवा, आतांपर्यंतच्या विवरणांत येऊन गेलीच आहे. यापुढें कर्नाटकची मोहीम सुरू झाली, इतक्यांत ध्यानीं मनीं नसतां, अचानक शके १६८६ च्या वैशाखांत, पुरंदरच्या माजी कोळी गडकऱ्यांनीं दगा करून आबा पुरंदऱ्याचा अमल उठवून गडावर पेशव्याचे नांवानें कारभार चालविला. बाहेरून क्षुल्लक भासणारें, पण ज्याच्या आंत विशिष्ट कारस्थान खेळत राहिल्यानें जे परिणामाच्या दृष्टीनें महत्त्वाचें गणले जात, असे जे पेशवाईच्या इतिहासांत प्रसंग आहेत, त्यांतलाच हा प्रसंग होय. परचक्राचें निवारण झाल्यामुळें व घरांतील मतभेदाचीं कारणें संपल्यामुळें बाह्यतः जिकडे तिकडे आबादी आबाद असल्याचा भास होत होता. ही स्थिति कशीबशी चारदोन महिने टिकते न टिकते तोंच मारून मुटकून दाबून टाकिलेले घरचे पेंच पुन्हा उद्भवून, पुनरपि वेताळ पूर्वपदावर आला. पुरंदरचा कोळ्यांचा दंगा यदृच्छेनें घडला नसून, ती गोष्ट पूर्वसंकेतानुरूप, विवक्षित ध्येय पुढें ठेवूनच सिद्ध झाली असल्यानें, हा प्रसंग एक ऐतिहासिक चर्चेचा विषय होऊन बसला आहे. तशांत आम्हीं आपलें प्रतिपादन ज्या विशिष्ट मुद्द्याला धरून चालविलें आहे, त्याशीं तर या प्रसंगाचा अगदीं जिव्हाळ्याचा संबंध येऊन पोंचत असल्यानें, आम्हांला त्याकडे दुर्लक्ष करितां येत नाहीं. आतां प्रथम या प्रसंगाचा जो सरळ इतिहास घडला तो सांगून नंतरच यांतील राजकारणाकडे वळूं.

इतिहासांत पुरंदरे व पेशवे, हे जसे परस्परांस आमरण बिलगून राहिले; तसल्याच प्रकारचा संबंध पेशवे व पुरंदर किल्ला, यांच्यांत अखेरपर्यंत टिकला. वास्तविक, पुरंधऱ्यांचा मराठी राज्यांत शिरकाव झाला, तो छत्रपतीमुळें व पुढें त्यांना जें महत्त्व प्राप्त झालें तेंहि त्यामुळेंच. तेव्हां त्यांची सेवा तिकडेच रुजू असावयास पाहिजे; परंतु छत्रपतीच्या गादीशीं निगडित झालेल्या पुरंदऱ्यांना त्यांच्या सेवेला पारखें होऊन, इतरांकडेच आपलें तन, मन, धन अर्पावें लागलें. हा विचित्र योगायोग होय. असलाच योग पुरंदरच्याहि बाबतींत दिसून येतो. शिवरायाची पहिली राजधानी व धर्मवीर संभाजीमहाराज यांची जन्मभूमि पुरंदर ही असून,

हें स्थान स्वराज्याच्या आधारस्तभापैकीं एक असता, तें मोंगलांकडे राहावें, हें मराठ्यांना कसें साहणार? अखेर तीस वर्षांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या अगदीं शेवटीं शकराजी नारायण सचिवांनीं, इतर मावळातील अजिंक्य किल्ले ज्या साहसानें औरंगजेबाच्या मगरमिठींतून सोडविले, तेंच साहस उपयोगात आणून, पुरंदर मोगलापासून जिंकून घेतला. यानंतर हा किल्ला स्वराज्य जाईपर्यंत मराठ्याकडेच राहिला. सचिवाची स्वातंत्र्ययुद्धातील अमोल कामगिरी स्वामीचरणीं रुजू झाल्यामुळें छत्रपतीकडून त्यास जीं अक्षयींचीं वतनें मिळालीं व त्याबरोबर त्यानीं जिंकलेल्या इतर किल्ल्याच्या सबनिशा, त्यात पुरंदरचीहि सबनिशी शकराजी नारायणास मिळून हा किल्ला त्याच्या दिमतींत राहिला. अर्थात्, यापुढें या स्थळानें सचिवाची नौकरी बजावणें इष्ट होतें, पण विचित्र दैवयोगामुळें शकराजी नारायणाच्या मृत्यूनंतरच्या सचिव घराण्याच्या पडत्या काळात, पुरंदर सचिवाच्या हातचा निसटला व त्यावर बाळाजी विश्वनाथ पेशव्याचा ताबा बसला. अशा रीतीनें पुरंदऱ्याप्रमाणें पुरंदरहि मूळ यजमानास सोडून दुसऱ्याचा सेवक झाला. म्हणजे पुरंदरे व पुरंदर, हे दोघेहि पेशव्याचे सेवक झाले व पहिल्यानें जशी या नूतन यजमानाची एकनिष्ठपणें सेवा करून बरेंच म्हणवून घेतलें, तसेंच दुसऱ्यानेंहि करून आपला लौकिक कायम राखिला पुढें पेशवेदौलतीच्या वाढत्या अमदानींत, पुरंदऱ्यांची सेवा चढती झाल्यामुळें, त्याच्या आकांक्षेला साजेसें पारितोषिक देणें यजमानाना जरूर झालें, व त्यातच पुरंदऱ्याना आपल्या वतनी पुरंदरची प्राप्ती झाली. नानासाहेब पेशवे व महादाजी अंबाजी याची 'दिलसफाई' झाली, तेव्हा शके १६७४ सालीं पुरंदर व सिंहगड या दोन किल्ल्याच्या सबनिशा त्यास मिळाल्या. या दरकात पुढें कांहीं घालमेल झालेली नसावी महादाजी अंबाजी व नाना पुरंदरे याच्यात खासगत वाटण्या झाल्या त्या वेळीं पुरंदरची सबनिशी बाबाकडे राहिली व सिंहगड नानाच्या वाटणीस गेला घोडनदीप्रसंगानंतर पेशवा माधवराव व राघोबा यानीं एकमतानें आपल्या सरदाराच्या ज्या समजुती केल्या, त्यात आबा पुरंदरे यास पुरंदर, व त्यालगतचा वज्रगड ऊर्फ रुद्रमाळचा संपूर्ण ताबा सखारामपंतास दिला. इतरानीं पेशव्याच्या दौलतीवर यथेच्छ हात मारला असला तरी पुरंदरे व सखारामपंत याना मिळालेल्या स्थळाबद्दल, त्या वेळीं जिकडे तिकडे एकच हलकल्लोळ झाला व त्यातून जरूर ती भूमिका तयार झाली. राक्षसभुवनानंतर कर्नाटकची स्वारी निघाली तेव्हा पेशवा व सखारामपंत स्वारीवर गेले आणि आबा व दादा देशींच राहिले. दादानें प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें, गंगातीरीं वास्तव्य करून आपला काळ स्नानसंध्येंतच घालविण्याचें मुक्रर केल्यामुळें, देशचा सर्व कारभार एकट्या पुरंदऱ्यावरच पडला. चैत्रपर्यंत दोनतीन महिने या व्यवस्थेंत कोणत्याच रीतीनें बिघाड न होता सर्व सुरळीत चाललें होतें, पण चैत्रात आबा नाशकीं दादाच्या भेटीस गेला असता, पुण्याकडे आगाऊ व्यवस्थेनें परिणतावस्थेंत

पोहोंचलेल्या, एका फटानें उचल खाल्ली व हें स्वास्थ्य क्षणभर बिघडविलें. तो प्रकार असाः—आतांशा पुरंदरच्या वतनी कोळी गडकऱ्यांत व किल्लेदार आबा पुरंदऱ्यांत कांहीं बाबतींत मतभेद होऊन, त्याचें पर्यवसान या माजी गडकऱ्यांस घरीं बसण्यांत झालें. हा प्रकार तात्पुरता असून तो नेहमीं टिकणारा नव्हता, कारण कोळी व पुरंदर हे परस्परावलंबी असून त्यांची फारकत होणें अत्यंत कठीण होतें. माजी गडकरी घरीं बसले तरी त्यांना पुरंदरचा घेरा सोडून इतरत्र जाणें शक्य नव्हतें; कां कीं हे लोक दोन-तीनशें वर्षांचे जुने वतनदार असून; त्यांचें सर्वस्व पुरंदर घेऱ्यांतच अडकलें असल्यानें, त्यांना दुसरीकडे जाणें शक्यच नव्हतें; तीच स्थिति पुरंदऱ्यांची. असल्या महत्त्वाच्या जागीं जुन्या कसलेल्या अभिमानी लोकांवांचून, इतरांकडून काम घेणें म्हणजे निवळ थट्टाच होय; तेव्हां गडकरी व पुरंदरे यांत तडजोडीचें बोलणें होण्यास उशीर लागला नाहीं. आबाचा कारभारी राघो गंगाधर अत्रे यानें गडकऱ्यांची समजूत जवळ जवळ ८ दिवस आधीं काढलीच होती; तेव्हां त्यांजपासून अपाय होईल अशी कोणासच कल्पना नव्हती; आणि जर इतर राजकारणें यांत डोकावलीं नसतीं, तर झालेला अनिष्ट प्रकार खचित होता ना. पण पुरंदरे व कोळी यांतील तेढीचा उपयोग करून घेण्याची मसलत पडद्याआड घाटत होती, तिनें हा अंदाज चुकीचा ठरविला. आबा दूर आहेत, तोंच बार उडाल्यास ठीक असें पाहून तडजोडीचा फायदा रुष्ट गडकऱ्यांनीं घेऊन दगा केला. वैशाख शुद्ध पंचमीला शाकाराच्या निमित्तानें चारशें कोळ्यांनीं बालेकिल्ल्यांत प्रवेश केला व तेथें वाघाच्या शिकारीची हूल उठवून एकदम तोडातोडीसच आरंभ केला. गाफीलपणानें त्यांच्या ह्या कृत्यास विशेष अडथळा झाला नाहीं व क्षणार्धांत पुरंदऱ्याचा अंमल उठून गडावर कोळ्यांचा अंमल सुरू झाला. इतकें झाल्यावर या कृत्याच्या मागें दडालेला चरित्रनायक पुढें घुसला व त्यानें आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. पुरंदर घेतल्यावर चार-पांच दिवसांत रुद्रमाळ घेऊन पुरंदऱ्याप्रमाणें सखारामपंताच्याही तोंडास पानें पुसलीं. पंधरा-तीनवारांत सामानसुमान भरून किल्ल्याची योग्य ती मजबुती झाली व तीवरील शिबंदीचा आंकडा सतराश्यांवर गेला. आतां या प्रकारांतल्या मुख्य सूत्रचालकांकडे वळल्यावांचून पुढील धागेदोरे नीटसे उकलले जाणार नाहींत. पुरंदरे मंडळींतील दिलसफाई मागें सांगितलीच आहे. म्हणजे हें घराणेंही भाऊबंदकीनें आंतून पूर्णपणें पोखरलेलें होतें यांत शंका नाहीं. विसाजी केशव साने या नांवाचा धोंडोबा अप्पाचा एक कारकून त्यांना दोन-तीन वर्षांपूर्वींच सोडून गेला होता. हा मनुष्य पुरंदऱ्याच्या पदरीं बरेच दिवस असल्यानें त्याला पुरंदरची खडान्‌खडा माहिती असून, नोकरी सुटली तरी तो हल्लीं पुरंदरच्या पायथ्याच्या पेठेंत राहात होता. हा व पुरंदरचा वतनदार सरनाईक घराण्यांतील बाबा सरनाईक हे दोघे प्रमुख होऊन त्या दोघांनीं हा बनाव आंतून घडवून आणला होता. कोळ्यांनीं साहसानें गडाचा ताबा घेतांच, साने कबिले-

सुद्धां वर गेला व त्याला आगेंमागें बाबा सरनाईक जाऊन मिळाला. सान्यानें गडावर जातांच तेथील सर्व सूत्रें आपल्या हातांत घेतलीं. त्यानें पुण्यास कारभारावर असलेल्या नाना फडणिसास चिठी लिहून आपण हें कृत्य श्रीमंत माधवरावांच्याच सांगण्यावरून केलें असें कळवून त्यास गप्प बसविलें. श्रीमंतांच्या उठावणीनेंच सदर प्रसंग घडून आला असल्यानें त्याचा पुणें-दरबाराकडून मुळींच बंदोबस्त झाला नाहीं हे सांगणें नकोच.

## हा एक राजकारणी डाव होता

आबा व सखारामपंत यांजकडे गेलेले किल्ले ताब्यांत घेण्याला इतराप्रमाणे पेशवाहि अत्यंत उत्सुक होता; परंतु इतर गोष्टींप्रमाणें येथेंहि तो कांहीं काळ मूग गिळून बसला. राक्षसभुवनानंतर जिकडे तिकडे स्थिरस्थावर झाल्यावर आबा व सखारामपंत यांची गरज सरली अशी खात्री झाल्यामुळें, पेशव्यांनीं आपल्या डोळ्यांत खुपत असलेलें हें कुसळ काढून टाकण्याचा निर्धार केला. पुरंदर गडकऱ्यांच्या बेदिलीचा भरपूर फायदा घेऊन सान्याकरवीं त्यानें हें राजकारण साधलें व आबा आणि सखारामपंत यास मागील सेवेचें योग्य तें बक्षिस देऊन त्यांनीं त्यांच्या सेवेचें सार्थक केलें! स्वतः पेशवे शपथपूर्वक या कृत्याशीं आपला संबंध नाहीं असें म्हणत असतां आम्ही ती गोष्ट राजकारणी समजून पेशव्यानें ही गोष्ट सान्याकरवीं जाणूनबुजून केली असें म्हणतों, तेव्हां त्यासंबधींचा पुरावा पुढें ठेवतों, म्हणजे वाचकांना आपला निर्णय देण्यास ठीक पडेल. राक्षसभुवनानंतर तूर्तातूर्त मोडला गेलेला माधवरावाचा पक्ष पुन्हा एकजीव झाला. कर्नाटकचे मोहिमेत सखारामपंत जरी मुखत्यारीनें कारभार करीत होता तरी त्यावर माधवरावाची स्वतःचीच देखरेख असल्यानें त्यांतून अनिष्ट जन्मास येणें शक्य नाहीं अशी पेशव्याची खात्री होती. इकडे देशीं, आबा व दादा यांजवर मामा व गोविंद शिवराम खाजगीवाले याच्या चोरचौक्या होत्याच. पुरंदरचा प्रसंग घडताच चौकशीचा वगैरे जो फार्स चालू झाला त्यात चौकशीअंतीं चौकशी करणारास जें दिसलें त्याचें प्रतिबिंब राजवाडे खंड १४ लेखांक ६८ ह्यात पहावयास मिळतें. हें पत्र खाजगीवाले-संग्रहांतील असून तें एका अज्ञात इसमानें गोविंदपंत तात्यास नाशकास लिहिलें आहे. पत्रातील मजकूर ध्यानात घेतां राघोबालाहि झालेला प्रकार इष्टच वाटलेला दिसतो. तें पत्र असें—

'त्याविशींचा शोध लिहा स्थळी केला त्यास तेथीळ लडा पडतच नाहीं ऐसेंच उभयताचें सागण्यांत बळूं आलें परस्परें न कळतां निरनिराळा शोध केला केल्या कर्माचा वस्वास पुढें खावंदाचेच पदरीं असोन परिणाम लागवा याविशीं आस्वासन दोन्ही मजकूर उल्लेख लिहिण्यांत येऊन स्वस्ताक्षरें चिटी समस्तास त्याच अन्वयें बकारपूर्वक सरनाइकास मात्र लवकर गेली

तर याच पत्रावरून खामखा येतात काडीचा संदेह नाहीं ऐसी निशा आकारपूर्वक बकारपूर्वकाचा पुत्र आहे तो पुरवितो आमचे मतें जर खरेंखुरें मनापासून आहे तर उशीर केल्यास कार्यनाश संदेह फिटल्याखेरीज यावयास भय धरून येत नाहीं तें गरीब म्हणून संशय मानितात श्रीमंतांस करणें त्या पक्षीं इतके लांचणीवर नच टाकितां दोघांस लिा अन्वयें निखालस खोलून दोन्ही चिठ्या स्वस्ताक्षरें याव्या श्रीमंताचे चित्तानरूप निश्चयपूर्वक कार्य होऊन येतें महद् लाभ आणि लगामी हे प्रकार घडतात उगेच वलाविले तर संदेहानें संदेह होऊन एवढा लाभ हातचा जातो........'
[ छ १९ मोहरम ( श. १६८६ आषाढ वा ६ ) ].

जिज्ञासूनें मूळांतूनच समग्र पत्र वाचावें. राघोबा उत्तरेस गोहदचे स्वारीस जात असतां त्याचा पक्षपाती नारो कृष्ण दरवे, सर सुभेदार खानदेश, यावर पेशव्यानें स्वारी पाठविली असतां दादानें त्यास या प्रसंगीं कसें वागावें हें सुचविलें आहे, तें असें—' आमचा पुस्तपन्हा आहेसा कोणास कलो न देतां जसें चिरंजिवानी पुरंदरचे आत येक व बाहेर जाहिराणा येक दर्शविला होता तसे करावे ' (श. १६८८ आषाढ वा ६ पे. द. भा. १९ ले. ५२), हेंहि मूळांत वाचावें. हे दोन्ही पुरावे अपुरे वाटल्यास पेशवे व कोळी गडकरी यांच्यांत जी तडजोड झाली त्यांत अपराधी सान्यास जी बक्षिसाची शिक्षा प्राप्त झाली (पे. द. भा. १६ ले. ३२ ) ती विचारांत घेऊन वाटेल तर पुराव्याची पूर्तता करावी आणि जो कांहीं बरा-वाईट निर्णय देणें तो मर्जीनुरूप द्यावा. पुरंदर व वज्रगड हे दोन्ही किल्ले पुढें सरकारांतच राहिले हेंहि ध्यानांत असावें. एवढा तापट स्वभावाचा आबा पुरंदरे पण तो हा प्रकार पाहून अगदीं थिजूनच गेला. आपल्या सेवेचा असा विपरीत शेवट झालेला पाहून या मानी पुरुषानें हैयत घेऊन केवळ प्राणान्तच मांडला. अशा स्थितींत तो शके १६८७ मार्गशीर्ष वा ५ स मरण पावला. आबा अगर सखारामपंत असल्या विश्वासघातकी कृत्याचा यजमानास जाब विचारण्यास असमर्थ होते असें नाहीं; पण हें त्यांचें मुळीं ब्रीदच नव्हतें. पुरंदरे मंडळीवर यजमानाशीं दोन हात करण्याचे कित्येक प्रसंग आले; पण तेथें त्यांनीं अत्यंत विवेक करून आपल्या सेवाधर्मास अनुचित अशा कर्माचा त्यागच केला. नाहीं-पेक्षां तत्कालीन लोकमताप्रमाणें आबा पुरंदऱ्यांना पटवर्धनी चाळे करणें कांहीं कठीण नव्हतें. यःकश्चित् साने झुंजाच्या व सूडाच्या भाषा आढ्यतेनें बोलत असतां आबानें गप्प बसावें याचा अर्थ, पुरंदऱ्यांनीं आपल्यापुढें कोणतें ध्येय ठेविलें होतें हें लक्षांत आणल्यावांचून, नीटसा ध्यानांत येणार नाहीं. 'लौकिकी डाग लावून न घ्यावा' हें पुरंदऱ्यांचें ब्रीदवाक्य असून त्याचा त्यांना कधींच विसर पडला नाहीं.

सखारामपंतानें कर्नाटकांत मोहिमेंतून निवृत्त होऊन राजसंन्यास करण्या-

पर्यंत पाळी आणिली तेव्हां पेशव्यानें राजकारणी आणाशपथा वाहून त्याची कशीबशी समजूत काढली. आबा पुरंदरे व सखारामपंत यांच्या स्वभावांत वय-परत्वें फरक पडत गेल्यानें एकच अन्याय एकानें मनाला लावून घेतला व दुसऱ्यानें धिम्मेपणानें तो पचवून टाकिला. राक्षसभुवनच्या मोहिमेनंतर माधवरावानें नाइलाजानें वास्तविक स्वरूपावर आळेपळे घातलेलें पांघरूण काढण्यास सुरुवात केली होती. सखारामपंत व त्याचा पक्ष चिरडून टाकण्यास इतराप्रमाणें पेशवाहि उत्सुक होता, पण त्यानें प्रसंगावर नजर देऊन नाइलाज म्हणून त्यास तात्पुरतें हाताशीं धरिलें होतें इतकेंच. पण गरज सरतांच वैद्याला दूर सारण्याचा उपक्रम करण्यास त्यानें आळस केला नाहीं. आबा व सखारामपंत घरीं बसले तरी चालेल अशी खात्री पटताच या धूर्त तरुण पेशव्यानें आता त्यांस संपविण्याचा उद्योग हातीं घेतला व त्यांत त्याला सुदैवानें यशहि आले. शहाण्या यजमानास शहाणे *कारभारी काय कामाचे! तेथें होयवाचे कारण असतें; आणि असा होयवा* होण्याच्या किंमतीचे विद्यमान कारभारी नसल्यानें त्यांत बदल होणे अपरिहार्य होतें. शेवटीं तेंच घडून येऊन पेशव्याच्या एकतंत्री कारभारातील लायक दिवाणांचा कांटाच उपटला गेला. आबा दैवगतीनें आधींच खलास झाल्यानें तो प्रश्न कायमचाच मिटला. सखारामपंत यद्यपि हयात होता, तरी तो यापुढें संपल्यांतच जमा झाला. कर्नाटकच्या मोहिमेंतच बहुधा सखारामपंताचा राजीनामा मंजूर झाला असावा.

## पेशवे, सखारामपंत व दिवाणगिरी

शके १६८६–८७च्या कर्नाटकच्या मोहिमेनंतर सखारामपंत बहुधा कारभार-निवृत्त होऊन सासवडीं आपल्या घरीं 'हरि हरि' करीत बसलेला दिसतो. त्यानें आतां यजमानाची देखाव्याची वृत्ति पूर्णपणे ओळखली असल्यानें येईल त्या प्रसंगास तोंड देऊन आपल्या लौकिकास व ब्रीदास जेणेंकरून बट्टा न लागेल अशा रीतीनें कालक्रमणा करण्याचें ठरविलेले दिसतें. यजमान शहाणा झाल्यावर सुविचारी कारभारी बहुधा असेच वर्तन ठेवीत असतात. 'तुम्ही व तुमचा पक्ष वाटेल तें करा; बोलवाल तर आम्ही सेवेला हजर आहोच' असेंच याचे पुढील वर्तन दिसतें. आपल्याला जें समजतें तें यजमानांना सांगण्यास अधिकारनिवृत्त झाल्यानंतरहि सखारामपंतानीं कधींच आळस केला नाहीं, त्यामुळें त्याच्या वजनांत यत्किंचितहि फरक पडला नाहीं. ही वृत्ति त्यानें आत्मविश्वासानें स्वीकार-लेली असो अगर तसें करण्यावाचून गत्यंतरच नसल्यानें त्याला हा मार्ग चोखाळावा लागलेला असो, पण तो याच स्वरूपात यापुढे माधवरावाच्या कारकीर्दीच्या अखेर-पर्यंत दिसतो. कारभारावर नसतां मोकळ्या मनानें सखारामपंतानें पेशव्याची सेवा केल्याचे दोन महत्त्वाचे प्रसंग इतिहासांत नमूद आहेत ते असेः—आनंदवल्लीच्या

वाटाघाटींत ( शके १६८९ ) सखारामपंतानें पेशव्याची केलेली सेवा ही अत्यंत महत्त्वाची होय. घोडनदीनंतर चुलत्या-पुतण्यांत बाह्यतः गोडीच दिसत असून राज्ययंत्र सुरळीत चालेलसें वाटत होतें; पण हा निवळ भासच होता. कारण माधवरावानें राज्यप्राप्तीनंतर विवक्षित लोकांना भरडून टाकण्याचें जें एकदां डोक्यांत घेतलें तिकडे त्यानें कधींच दुर्लक्ष केलें नाहीं. इतर जी गोष्ट तडकाफडकी निकालांत आणूं पहात होते; तीच गोष्ट पेशवा योग्यसंधीवांचून अमलांत आणीत नव्हता, इतकाच काय तो दोहोंतील फरक; बाकी वृत्ति एकच. सखारामपंत जसा घरीं बसला तोच प्रसंग राघोबावरहि यावा ही पेशव्याची वास्तविक इच्छा असल्यानें, राघोबा व तो यांत लौकरच तेढ पडली व हें प्रकरण पुन्हा घोडनदीसारखें चिघळतें कीं काय असें वाटूं लागलें. गोहदच्या स्वारींतून दादा अपेश घेऊन परत आल्यावर त्याला पेशवाईची वांटणी करण्याचा मोह अनावर झाला व त्या दिशेनें त्याचे प्रयत्न सुरु झाले. अशा वेळीं पेशव्याला पुन्हा सखारामपंताची आठवण झाली व त्यांनीं त्यांस आनंदवल्लीच्या वाटाघाटीकरितां बोलावून घेतलें. सखारामपंतानेंहि आपल्या वृत्त्यनुसार आढेवेढे न घेतां यजमानांच्या हाकेला ओ देण्यास आळस केला नाहीं. या प्रसंगासंबंधीं पेशवे दफ्तर भाग १९ मध्यें नाना फडणविसाच्या हस्तकाचीं जीं अनेक पत्रें छापलीं आहेत त्यांत या वेळच्या सखारामपंताच्या परिश्रमाचें योग्य प्रतिबिंब दृष्टीस पडतें. तो कारभारनिवृत्त झाला तरी त्यानें दादा व पेशवा यांच्या चुका निर्भीडपणें त्यांपुढें मांडून त्यावर उलट आपली छाप ठेवण्याचा केलेला प्रयत्न या पत्रांत स्पष्टपणें पहावयास मिळतो. हे दोघेही त्याला जे वचकत त्याच्या मुळाशीं होळकरी वचक नसून त्याचा निर्भीड व राजकारणी सल्ला यांशिवाय दुसरें काय असणार ? आनंदवल्लीची वाटाघाट चालू असतां चुलते-पुतणे ज्या ज्या वेळीं वर्दळीवर येत त्या त्या वेळीं पुढें होऊन त्यांस थोपवून धरण्याचें बिकट कार्य सखारामपंतावांचून इतरांस करतां येतच नसे. याचें नांव छाप, नाहीं तर यजमानांनीं 'बैल गाभणा म्हटला कीं, नववा महिना' म्हणणारे फार. दुसरा माधवरावाच्या अंतकाळचा प्रसंग ! या प्रसंगीं बापूनें पेशव्याला आपल्या वजनानें कसें भारून टाकिलें होतें याची योग्य कल्पना लेखांक १०७, १०८ वरून होईलच. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, स्वतंत्रपणें कारभार करीत असतां माधवरावास बापू हा जरी नकोसा झाला होता, तरी तो त्याची योग्यता पूर्णपणें जाणून असल्यानें, दिनकर महादेव अगर गंगाधर यशवंत यांच्या बाबतींत पेशव्यानें स्वीकारलेले, पोरकट व बेइज्जतीचे प्रकार सखारामपंताच्या वांट्यास कधींच आले नाहींत. म्हणून माधवरावाला आपला अंतकाळ समीप आल्यानंतर वडिलांप्रमाणें मागील सर्व कृत्यांवर पडदा टाकून, सखारामपंताच्या गळ्यांत राज्यधुरा टाकण्यास मुळींच संकोच वाटला नाहीं. अशा रीतीनें या पुरुषावर अनेकदां अधिकारभ्रष्ट

होण्याचा प्रसंग आला तरी त्याच्या कर्तृत्वाला यत्किंचितहि बाध न येता तें उत्तरोत्तर सोज्ज्वलच होत गेल्याचें दिसून येतें.

सखारामपंताच्या दिवाणगिरीचे या कारकीर्दीतील हप्तेः—

पहिलाः—शके १६८३ आषाढ ते पौष अखेर;
दुसरा.—शके १६८४ मार्ग० ते १६८६ अखेर,
तिसराः—शके १६९२ आषाढ ( ले. ११३ ),
चौथा.—शके १६९४ ज्येष्ठ ते कार्तिक.

आधुनिक लहरी इतिहासकाराच्या विशेष अभिनिवेषाला बळी पडून ज्याच्या वाट्याला नसता दुर्लौकिक आला, अशा मराठ्यांच्या इतिहासातील शेलक्या पुरुषांत सखारामपंताचा समावेश झाल्यानें त्याच्या योग्य कर्तृत्वाचा जनतेपुढें पाढा वाचण्याकरितां आम्हाला विस्तारभयाचा दोष पदरीं घेऊन एवढा ऊहापोह करावा लागला. आम्हीं आपल्या लिहिण्यांत अवास्तव मजकूर येऊ न देण्याची योग्य खबरदारी घेतली आहे अशी आमची मनोदेवता आम्हास सांगत आहे, तेव्हां मामुली वहिवाटीला सोडून असलेलें आमचें प्रतिपादन ऐतिहासिक पुराव्याच्या कसोटीवर घासल्यास तें शंभर नंबरी उतरेलच असा आमचा आत्मविश्वास आम्हास केव्हांहि दगा देणार नाहीं अशी आमची खात्री आहे. अशा स्थितींत आमचें म्हणणें कोणास रुचो वा न रुचो, तें पाहण्याचें आम्हांस कारण काय ? तथापि, आमच्या विचारसरणींतील चुका जर कोणी साधार दाखवितील तर त्या आम्हीं आनंदानें दुरुस्त करू, पण विकारवशतेला बळी पडून जर कोणी भलतेंच बरळेल तर त्याकडे दुर्लक्ष करण्यावाचून अन्य मार्ग कोणता ? असो. अव्याहत चाळीस वर्षे चालत आलेल्या सखारामबापूंच्या अन्यायमूलक निंदेला आमच्या या प्रतिपादनानें अंशतः आळा बसेल, तरी आम्ही त्यांत संतोषित आहोंत.

विवक्षित मुद्दा सिद्ध करण्याकरिता प्रस्तावनेची संकोचित जागा अडविली गेल्यामुळें माधवरावाच्या कारकीर्दीपूर्वीचा या भागांत जो महत्त्वाचा पत्रव्यवहार छापला गेला आहे त्याकडे लक्ष देतां आलें नाहीं, परंतु या भागास जरूर तो लोकाश्रय मिळून आम्ही स्वतःचे पायांवर उभे राहून पुढील भाग लवकरच प्रसिद्ध करूं शकलों तर येथें अपुरा राहिलेला विषय तेथें पुरा करण्याची योग्य संधि आम्हास मिळेल अशी आशा आहे. प्रस्तावना लिहितांना विचारविनिमय करून ज्या सद्गृहस्थांनीं आमच्याकरितां आपला अमूल्य वेळ खर्ची घातला, त्यांची नांवें अनेक कारणांनीं प्रसिद्ध करितां येत नसलीं तरी त्यांच्या झालेल्या अगणित उपकाराचें विस्मरण होणें शक्य नाहीं.

पुणें, मार्गशीर्ष शुद्ध १,
शके १८५६

कृष्णाजी वासुदेव पुरंदरे.

# निवेदन



पुरंदरे दफ्तर भाग १ व २ हे अनुक्रमें शके १८५० व १८५१ सालीं प्रसिद्ध झाले. पहिल्या भागाच्या प्रसिद्धीकरणाचा बोजा भा. इ. सं. मंडळानें स्वीकारला व दुसरा भाग श्री. श्रीपाद रघुनाथ राजगुरु 'राजगुरु आणि कंपनी'चे मालक यांनीं स्वखर्चानें प्रकाशित केला. या दोन्हीहि प्रकाशकांस मामुली पद्धतीनें आंतबट्ट्याचाच मार्ग पतकरावा लागला. आतां यापुढें ही माला कोणत्या तऱ्हेनें चालीस लावावी हा प्रश्न येऊन पडला. सध्यांच्या आर्थिक हलाखीचे काळांत असला पालथा रोजगार करणारे कोणी भेटतील अशी अपेक्षा करणें वेडेपणाचें असल्यानें, ही आपली हौस तूर्त तरी सोडून द्यावी असें वाटूं लागलें; परंतु परमेश्वराचे मनांत आमचे हातून अद्याप कांहीं तरी सेवा घ्यावयाची असल्यानें त्या बुद्धिदात्या जगन्नियंत्यानें श्री. यशवंतराव केळकर यांच्या मनांत प्रेरणा करून पुन्हा हा योग जुळवून आणिला. नाहींपेक्षां आम्हा दरिद्र्याच्या हातून काय व्हावयाचें ? श्री. केळकर यांनीं इतिहास-प्रेमी सज्जनांकडून फूल नाहीं फुलाच्या पाकळीची मदत घेऊन काम चालू करितां येईल कीं कसें, हें पहाण्याचें सुचविलें. सांगण्यास अत्यंत संतोष वाटतो कीं, आम्ही आपली योजना ज्यांच्या ज्यांच्यापुढें मांडिली त्यांनीं त्यांनीं सक्रिय सहानुभूति दाखवून कामास प्रवृत्त केलें. मदत जमविण्याचा उद्योग सुरू केल्यावर अशी खात्री वाटूं लागली कीं, निदान दोन अडीचशें पृष्ठांचा पुढील भाग आपण खास प्रसिद्ध करूं शकूं. म्हणून मदत मिळवीत असतांच बरोबर दोन वर्षांपूर्वी कामास सुरुवातहि केली. ४८ पृष्ठें छापून झाल्यानंतर आम्ही खासगत आपत्तींत सांपडलों व हातीं घेतलेलें काम तसेंच अपुरें राहिलें. तीन महिन्यांपूर्वी प्रापंचिक स्थिरस्थावर झाल्यावर पुन्हा हा विषय डोक्यांत घोळूं लागला. पण आपण वचनास जागलों नाहीं, तेव्हां आतां पुढें मोडली घडी सावरणें शक्य नाहीं असें वाटूं लागलें व पुढें काय करावें हें सुचेनासें झालें. अशा मनःस्थितींत पुनः श्री० केळकर पुढें आले व त्यांनीं जी कांहीं मदत करावयाची ती करून खड्ड्यांत पडलेला गाडा बाहेर काढून चालीस लाविला. श्री० केळकर यांच्या सहाय्यानें 'यशोदा-चिंतामणि स्मारक संस्थे'चे ट्रस्टी यांची मदत मिळवितां आली व प्रस्तुतचा ग्रंथ हें त्याचेंच दृश्य फळ होय. एवंच, या पुस्तकाच्या प्रकाशनास श्री० य. न. केळकर यांचेच श्रम व सक्रिय सहानुभूतिच मूळ कारणीभूत झाली असल्यानें त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. तसेंच पुस्तक-प्रकाशनास मदत करणाऱ्या संस्थांचा व सद्‌गृहस्थांचा मी अत्यंत आभारी आहे.

या कामीं मदत करणाऱ्या संस्था व सद्गृहस्थ —३०० 'यशोदा चिंतामणि स्मारक संस्थेचे ट्रस्टी', ५० 'रियासतकार' गो. स. सरदेसाई, १५ न. चिं. केळकर, १० य. न. केळकर, १० द. ब. डिसकळकर, १० कृ. पा. कुलकर्णी, १० द. वा. पोतदार, १० ग. न्य. पुरंदरे, ५ वि. गो. दिघे, ५ द. वि. आपटे.

पुस्तक संपादण्याचे कामीं भा. इ. स. मंडळ व त्याशीं निगडत असलेले सद्गृहस्थ यांची मदत झाली हें सांगणें नकोच. तसेंच ज्या इतिहास प्रेमी सद्गृहस्थांनीं आपल्या संग्रहांतील पत्रें देऊन उपकृत केलें त्यांचाहि मी फार आभारी आहे. पुस्तकाच्या छपाईचें काम जरा घाईनेंच उरकावें लागल्यानें सूचींत जरूर तो सूक्ष्मपणा आला नाहीं.

'राजगुरु आणि कंपनी' पुणें यांनी पुस्तक छपाईचे कामीं आपुलकीचे नात्यानें दाखविलेली दक्षता केव्हांहि स्तुतीस पात्रच होईल.

पुणें,
मार्ग. शु॥ १ श. १८५६.

आपला
कृ. वा. पुरंदरे.

# पुरस्कार



पुरंदरे-दफ्तर हा एक अमोलिक साठा आहे. महत्त्वाचे दृष्टीनें तो पेशवे दफ्तराची सहज बरोबरी करतो. हें दफ्तर अस्ताव्यस्त पडल्यामुळें साहजिकच क्षीण झालें. तथापि रा. कृष्णाजीपंत पुरंदरे मास्तर यांनीं तिकडे लक्ष दिल्यापासून त्यांतील नवनीत सर्वांस चाखावयास मिळण्याची सोय झाली आहे.

दोन खंड तर मंडळमालेंत पूर्वीच प्रसिद्ध झाले. तदनंतर रा. पुरंदरे यांस पेशवे दफ्तरांत अवगाहन करण्याची अपूर्व सुसंधि मिळाली व पुरंदरे दप्तराचें काम साहजिकच मागें पडलें; परंतु वरील सुसंधीमुळें रा. पुरंदरे यांच्या अभ्यासास फारच साहाय्य झालें.

आजच्या खंडांत प्रसिद्ध होणारीं साधनें अभ्यासकांस फार उपयुक्त असल्याचें सहज कळून येईल. बाळाजीपंत नाना म्हणजे बाळाजी विश्वनाथ यांचें वृंदावन सासवड मुक्कामीं कोठें होतें तें ले. २११ वरून ठरत आहे. तसेंच ले. ११४ पाहणाराची, श्री. सवाई माधवरावाचे जन्माविषयीं अगदीं लगोलग लिहिलेलें पत्र पाहून, बरीच संशयनिवृत्ति होईल. पुणें, सासवड वगैरे स्थळांच्या हकीकतीसारख्या स्थानिक महत्त्वाच्या कागदापासून तों पानिपत, राक्षसभुवन येथील रणकंदनासारख्या महत्त्वाच्या प्रसंगांपर्यंत अनेक विषय या खंडांतील पत्रव्यवहारांत आले आहेत; परंतु रा. पुरंदरे मास्तर यांना त्यांबाबत विवेचन करण्यास येथें अवसरच मिळाला नाहीं. असें आहे तरी जिज्ञासु वाचक व अभ्यासक या साधनांचा परामर्श घेण्यास चुकणार नाहींत अशी आम्हांस आशा आहे.

रा. पुरंदरे यांनीं या भागास बरीच विस्तृत प्रस्तावना जोडली आहे. ही प्रस्तावना विवेचनात्मक आहे. मागें आम्हीं एकदां म्हटल्याप्रमाणें रा. पुरंदरे हे या पेशवाई इतिहासाचे विषयांत रंगून गेलेले आहेत आणि त्यामुळें त्यांचें विवेचन वाचतांना वाचक तल्लीन होऊन जातो. त्यांची भाषा म्हणजे डौलदार पण शुद्ध मराठी आहे. रूक्ष, भावनारहित विवेचन निर्जीवसें वाटतें; तसा निर्जीवपणा रा. पुरंदरे यांस प्रिय नाहीं. भावनेच्या भडक रंगाची भक्ति त्यांस मनापासून आहे. त्यांतून प्रतिक्रियेचा जोर मनाची उठावणी करीत असतो तेथें एक प्रकारची रसोत्पत्तिहि झाल्यावांचून राहत नाहीं. इतिहासांत भावना किंवा कल्पना यांना मर्यादित क्षेत्र असतें याची जाणीव मात्र रा. पुरंदरे यांना चांगली आहे.

रा. पुरंदरे यांनीं जोडलेल्या या विवेचक प्रस्तावनेचा उद्देश सखारामबापू या प्रसिद्ध पेशवाई मुत्सद्दयाची कामगिरी व योग्यता प्रस्थापित करणें हा आहे. एवढी पेशवाई ज्यानें आपल्या कर्तृत्वानें काबूंत ठेविली तो कर्ता पुरुष असला पाहिजे यांत वाद नाहीं. तथापि 'कपि तो राज्यास किडाच ईश्वरें निर्माण केला' अशी जी

पटवर्धनमंडळींची समजून ती कितपत यथार्थ, याची परीक्षा करण्यास बापूंची बाजू पुढें कोणी तरी मांडावयास हवी होती, तें काम रा. पुरंदरे यांनीं उत्साहानें व आवेशानें केले आहे; आणि आमच्या मतें हें सर्व विवेचन मननीय असेंच झालें आहे. दोन्ही बाजूंनीं प्रश्न उलट सुलट घुसळला म्हणजे मगच सत्याचे नवनीत सेवन करण्याचा सुयोग येतो. सखारामबापूची योग्यता कितीहि मोठी ठरविली तरी त्याचे ठायीं काहीं मोठे दोषहि असलेच पाहिजेत; एरवीं देशस्थमंडळांतहि 'सखाऱ्या'च्या ओकाऱ्या ( ले. ८२ ) काढणारे कां आढळावेत ? ते सर्व खाजगी द्वेष करणारे, लघुदृष्टि व अल्पबुद्धि होते असा निकाल एकाएकीं देतां येत नाहीं. सखारामपंत मात्र स्वार्थत्यागी, सोशिक, एकनिष्ठ, दौलतखवाहा आणि हे सारे बुडवे, द्वेषी असा अर्थ ठरत नाहीं. उलट सखाराम 'मात्रागमनी' हाहि भाव निराळाच दिसतो. रा. पुरंदरे यांनीं एकवार सखारामपंताचें विस्तृत चरित्र लिहिणे अवश्य आहे असें आम्हास वाटतें आणि त्यांच्या ओघवती भाषेनें, सूक्ष्मदृष्टि चिकित्सेनें आणि सात्मभावाच्या रंगानें तें जितकें चविष्ट व बोधप्रद उतरेल तितकें दुसऱ्या कोणास साधणें परम दुर्घट होय असें म्हणावयास आम्हास चिंता वाटत नाहीं. या कर्त्या मुत्सद्द्याचे विवेचक स्वतंत्र चरित्र प्रसिद्ध झालेंच पाहिजे आणि साडे तीन शहाण्यांतला एक सबंद शहाणा या त्याच्या प्रसिद्धीची यथार्थ मीमांसाहि आपणांपुढें आली पाहिजे.

आतां केवळ मराठी कागदपत्राच्या साहाय्यानेंच ही कामगिरी तूर्तच्या काळीं पार पाडावी लागणार हें उघड आहे. तथापि निजामदरबाराजवळ पेशवेदफ्तराएवढाच प्रचंड दफ्तरखाना आज मितीलाहि आहे आणि हा प्रचंड साठा शोधून निजामाची बाजू समजून घेतल्याशिवाय खरा इतिहास लिहिला जाणार नाहीं हें आपण सदैव लक्षात ठेविलें पाहिजे. तो योग लवकरच येवो अशी आमची इच्छा आहे. विशेषतः बापूच्या चरित्राची पूर्तता त्या साहाय्याशिवाय कधींच होऊं शकणार नाहीं.

बापूंकडे काहीं दोष न देता रा. पुरंदरे यांनीं पुढें तर माधवरावालाहि 'धूर्त' म्हणजे पर्यायानें लबाड ठरविला आहे ( पृ. ४६ ) जसें काहीं 'धूर्तपणा' सखारामपंताच्या गांवींहि नव्हता ! ! 'मोगलाई' मसलत एकाच पक्षाला परिचित होती आणि दुसरा साळाभोळा होता असें म्हणणें न्यायाचें नाहीं !

' गनिमी काव्याचें महत्त्व ' हा दुसरा प्रमुख मुद्दा रा. पुरंदरे यांनीं राक्षसभुवनच्या लढाईच्या विवेचनाच्या अनुषंगानें आपल्या प्रस्तावनेंत ग्रथित केला आहे. तेंहि विवेचन पार मार्मिक, मननीय व तारीफ करण्याजोगें झालें असलें तरी गनिमी कावा विरुद्ध 'जंगी' युद्ध हा वाद असा वरवर संपविण्यासारखा नाहीं. मोगली पद्धत किंवा जंगी युद्ध शास्त्रीय शस्त्रांच्या पाठबळानें करणाराच अखेर

विजयी ठरला हें लक्ष्यांत वागवूनच ह्या विषयाची समजून करून घ्यावयास पाहिजे. खेरीज पानिपतावर गनिमी कावा दाखविला नाहीं म्हणून मराठे–नवीन पिढी सुद्धां–गनिमी कावा विसरली होती असें ठरत नाहीं. किंबहुना खुद्द रा. पुरंदरे यांच्या विवेचनांतच या विसंगतीचे खांचखळगे आपणांस दिसून येतील. पृ. २७ वर गनिमी काव्याच्या 'या युद्धपद्धतीचा विद्यमान पिढीला गंधहि नसल्या'चें त्यांचें विधान व विवेचन पुढील ३० पानावरील 'धावपळीचा पेशव्याच्या सैनिकांस नेहमींचाच प्रसंग' या विधानाशीं व विवेचनाशीं किती विसंगत आहे ! पृ. २७ वर 'तरुण' पेशवा मात्र एकदम गमिनी काव्यांत वाकब होतो आणि पृ. ३४ वर गनिमी काव्याचा गंध नसलेले मराठे 'मावळकोंकणांत सतत तिंबत' राहणारे म्हणून प्रशंसा मिळवितात ! सारेच मराठे मावळकोंकणांतलेच असत काय ? 'देसुरे' त्यांच्यांत नसत काय ? निजामाकडे गेलेले गोपाळरावहि नवे दोस्त सर्व जंगी पद्धतीनेंच लढणारे होते काय ? पानिपतावर न गेलेल्या मराठी फौजा व मराठे सेनानी गनिमी कावा विसरले होते काय ? हे सर्व प्रश्न रा. पुरंदरे समजतात इतक्या लीलेनें सुटण्यासारखे नाहींत ! असो, येथें कांहीं प्रतिविवेचन करण्याचा प्रसंग नाहीं. कोठें सावधपणें चालावें एवढें दिग्दर्शन करणें व इषारा देणें एवढें 'जागलीपणा'चें कामच या पुरस्कारांत करावयाचें असतें. साधार व सप्रमाण केलेलें पद्धतशीर विवेचन केव्हांहि उद्बोधक व उपकारकच होत असतें. कोणचा एखादा पक्ष, कोणची एखादीच बाजू आणि कोणचें एखादेंच मत याचा अभिनिवेश हा सत्याच्या संपूर्ण दर्शनाला बाधक होतो; म्हणून खऱ्या इतिहासविवेचकानें आपली दृष्टि नेहमीं मोकळी व निर्मळ ठेविली पाहिजे.

रा. पुरंदरे यांनीं इतिहास-संशोधन व इतिहास-विवेचन या कामीं चालविलेले प्रयत्न किती महत्त्वाचे आणि उपयुक्त आहेत याची भरपूर साक्ष त्यांचे पुरंदरे दफ्तर-खंडच करीत आहेत. त्यांस देववेल तेवढें उत्तेजन द्यावें अशी आमची सर्वांस कळकळीची प्रार्थना आहे.

या ठिकाणीं श्री. मल्हारराव त्रिंबकराव पुरंदरे प्रभृति ज्या पुरंदरेवंशीयांनीं आपलेजवळील प्राचीन कागदपत्रांचा संग्रह प्रसिद्ध्यर्थ दिला त्यांस धन्यवाद देणें आमचें कर्तव्य आहे. आमची त्यांस अशी सप्रेम विनंती आहे कीं, हा सर्व बहुमोल संग्रह भा. इ. सं. मंडळाच्या दप्तरखान्यास समर्पण करून चंद्रचूड दफ्तराच्या जोडीला हा दुसरा महनीय अलंकार त्यांनीं मंडळाचे अंगावर घालावा, यांत त्यांचा व मंडळाचा उभयतांचा लौकिक व हित आहे.

मार्गशीर्ष शु॥ १२, ५६,
पुणें.

दत्तो वामन पोतदार,
चिटणीस,
भा. इ. सं. मंडळ.

# तारखांचे शुद्धि-पत्र



| | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ले. १७ | १६८३ मार्ग. शु. ८<br>१७६१ दिजे. ५ | श. १६८४ मार्ग. शु. ८<br>इ. १७६२ नोव्हें. २४ |
| ले. २२ | ० | श. १६८४ मार्ग शु. ५<br>इ. १७५२ नोव्हें. २० |
| | आले गावास | आलेगावास |
| ले. ४२ | श. १६८३ पौष वा। २०<br>इ. १७६५ जाने. २१ | श. १६८३ पौष वा। ३०<br>इ. १७६२ जाने. २५ |
| ले. ४३ | श. १६८५ माघ वा। | श. १६८६ माघ वा। १३ |
| ले. ५१ | श. १६८७ फा. शु. १२<br>इ. १७६५ फेब्रु २० | श. १६८८ माघ शु. १२<br>इ. १७६७ फेब्रु. १० |
| ले. ५३ | इ. १७६८ | श. १६८९ आश्वि. वा। ३०<br>इ १७६७ आक्टो. २२ |
| ले. ५४ | श. १६८६ माघ वा। ५<br>इ १७६५ फे. १२ | श. १६८६ पौ. वा। १<br>इ. १७६५ जाने. ८ |
| ले. ७३ | इ. स १६६२ नो. ११ | इ. स. १७६२ नो. ११ |



# विषयवार लेखांक-सूचि

( अंक लेखांकाचे समजावेत. )

# भारत–इतिहास–संशोधक–मंडळ, पुणें

## पुरस्कृत ग्रं. मा. क्र. २९

## ऐतिहासिक ग्रंथमाला क्र. १

# पुरंदरे दफ्तर–भाग तिसरा

(ले. १ ) श. १६८३ पौ. शु. ] श्री [ इ. स. १७६१ दिसें.

चिरंजीव राजश्री नाना यासी रघुनाथ बाजीराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष या दिवसांत खर्चाची बहूत वोढ जाहाली घरचे सोने रुपे मोडू [ न ] नाणे करून खर्च केले कर्जवाम मेलऊन आजपावेतो बेगमी जाली याजकरिता आपणास लिहिले आहे तरी हर कोठे हस्ते परहस्ते कर्ज मेलऊन पाठवावे त्याची सोय न पडे तरी तुमचे खासगत घरचे सोने रुपियाचे दागिने जे असतील त्यातून कार्याकारण जरूराती ठेऊन बाकी वीसपचवीस हजार-पर्यंत भरती करून पाठवणे यासमई आलियास फारच उपयोगी पडेल बाजद लढाई तुम्हास नग करून दिल्हे जातील खर्चाचे सकटास्तव लिहीले आहे तरी ये वेलेस काही तर्तुद जरूर करणें *रा। छ ३ जमादिलाखर जितकी तर्तुद होईल तितकीच करणे तुम्हास आम्ही त्याहाविसे नाही तुमची निष्ठा आहे ते आम्हास विदित आहे जे होईल ते तजवीज करणे हे आसीर्वाद

---

(ले. २ ) श. १६८४ आश्विन ] श्रीशंकर [ इ. स. १७६२ सप्तं.

* चिरंजीव राजश्री नाना यासी प्रती रघुनाथ बाजीराव आसीर्वाद उपरी तुम्ही उदासपणे हुजूर यावयाविसी लिहिले आणि सातारियाचे गंगाजीरायास पत्र

---

* ही खूण पत्राचे आरंभीं असल्यास तें सबंध पत्र पत्रलेखकाच्या हातचें समजावें. तसेंच पत्राचें पोटीं असल्यास तेथपासूनचा मजकूर पत्रलेखकाच्या हातचा समजावा.

पाठविले ते दिकतीचे जाणून आमचा विस्वास नाही याभावे लिहिले ते कल्ले ऐसियासि येविसी बोलणे लाव आहे साराश तुमचा विस्वास नाही ऐसे नाही रुबरू आल्यावरी तुमची निशा होईल पत्री तपसील लिहिता गाठ पडत नाही तरी लौकर येणे तुमचा सदेह ग्हणोन तुम्हाकडे किल्याचा कारभार न सागितला ऐसे तुम्हास वाटल्यास शफतदेखील वाहू कितेक मजकूर ऐसे आहेत की जे केल्याने येखादा अपाय होणार यास्तव करीत नाही तुम्ही आपले मनाचे समाधान असो देणे तुम्ही व महिपतराव हुजूर येणे येथे आलियावरी मी येकाती पेचपाच सारे सागितल्यावरी तुमची निशा होईल यास्तव जलद येणे जाणिजे बुधवार पुण्याहून कापड व नख्त येणे आहे तेहि सोबतीने आणिले तरी उत्तमच आहे बनल्यास सोबतीने घेऊन येणे हे पत्र तुम्ही व महिपतराव दोघेच वाचणे प्रगटता न होये ते करणे हे आसीर्वाद.

---

## (ले. ३ ) श. १६८४ आश्वि. शु. १२ ] श्री [ इ.स. १७६२सप्त.२९

चिरजीव राजश्री नाना यासी प्रती रघुनाथ बाजीराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत जावें विशेष तुम्हास यावयाविसी दोन तीन पत्रें पाठविलीं त्यास हाली तुम्हाकडील विनती सर्व उभयतानी निवेदन केली त्यास तुम्हासी दुसरा विचार काय आहे खासा स्वारी पैठणचे रोखे जाहाली हा अर्थ तुम्हास कलावा त्यास तुम्ही काही सशय चितात न आणिता यावयाचे करावे साल्गुदस्ता खेडचे मुकामी तुम्हासी कितेक ममतापूर्वक भाषण जाहाले आणि पुन्हा तुमचे जाणे सत्तरूपी न जाहाले येविसीचा अर्थ तुमचे विनतींत आला त्यास ते वलेस निकड जाहाली आणि स्वारी लौकर जाहाली त्यास तुमचे कामकाज दुसरीयाने केल्याने आग्हास सतोष आहे यैसे नाही हा भाव पुर्ता घ्यानात आणून पत्र पावताच स्वार होऊन येणें रा छ १० रावल #हे आसीर्वाद

---

## (ले.४ )श. १६८४ आश्वि.शु. १२ ] श्री [इ. स. १७६२ सप्त.२९

राजश्रीया विराजीत राजमान्य राजश्री महिपतराव
अवजी गो यासि

श्री रघुनाथ बाजीराव असीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष चिरजीव राजश्री नाना यास सत्तरसीस जावयाविसि पत्र

पेशजी येथून लिहिले होते त्यास किते विकल्प चितात आले ऐशास त्यांचे किते कितेक बारीक अर्थ आहे चिरंजिवाविसी आमच्या चितात दुसरा अर्थ शपथपूर्वक नाही मध्ये लबाडया करितात याचे पारपत्यही होईल येविसी त्याची खातरजमा असावी चिरंजीव व तुम्ही हुजूर येणे कितेक समक्षच बोलणे आहे त्यावरून सर्व कलेल साराश नानाविसीं दुसरा अर्थ नाहीं *तुम्ही व ते येथे आलियावरी सर्वहि कलेल हे आसीर्वाद

---

(ले. ५) श. १६८४ कार्ति. शु. ८ ] श्री [ इ. स. १७६२ आक्टो. २५

चिरंजीव राजश्री नाना यासि रघुनाथ बाजीराव आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेप तुम्हीं सांडणी स्वारावो पत्र पाठविले ते पावलें कितेक मजकूर लिहिला तो कलो आला ऐशास सविस्तर मजकूर खास दस्तूरे लेहून मागे पत्र पाठविले आहे त्याजवरून कलेल वरकड कितेक मजकूर पत्री लिहिता येत नाहीत तुम्ही येथे लौकर यावे सर्व बालणे ते रुबरू होईल रा छ ७ राखर *तुम्हाविसी संशय आहे असे नाही सर्वापेक्षा तुमचा भरवसा फार आहे परंतु काही कारणामुले साफ पत्र सातारियास न लिहिले ते रुबरू बोलू हे आसीर्वाद

---

(ले. ६) श. १६८४ मार्ग. शु. १० ] श्रीशंभू प्रसन्न [ इ. स. १७६२ नोव्हें. २९

राजमान्य राजश्री त्रिंबक सदासिव यासी श्रीमन्महाराज मातुश्री जिजाबाईसाहेब याणी आज्ञा केली यैसी जे सुा सलास सितैन मया व अलफ चिरंजीव राजश्री शिवाजी राजे विजयादशमीच्या सुमूहूर्ते सिंव्हासनारूढ जाहलियाचे संतोषाच वृत पेसजी आज्ञापत्र सादर केले आहे त्यावरून कलले असेल सांप्रत चिरंजिवाची पत्रे तुम्हास सादर आहेत आज्ञेप्रमाणे रो माहदजी नाईक मोरे व मल्हार माहादेव सांगतील त्याजवरून कलेल जाणिजे रा छ ९ माहे जमादिलौवल बहुत काये लिहिणे [ ले. सी. शि. ]

---

(ले. ७) श. १६८४ ] श्री [ इ. स. १७६२

श्रीमत राजश्री पाटील स्वामीचे सेवेसी

पोष्य जिवाजी गणेश कृतानेक नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लेखन केले पा। विशेष पत्र पा। तेथे श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे फौजेचे वर्तमान लेहून पाठवावे म्हणून लि॥ त्यास दादासाहेब कडयावर आले म्हणून वर्तमान आहे मुजरद माणूस पा। आहे तथ्य वर्तमान आल्यावर लेहून पाठऊन इकडे तो गडबड बहूतसी नाहीं इकडील वर्तमान तरी राजश्री जाधवराव रुसवा करून लोणीवर आले तेथे राजश्री बापू ना। त्याचे समजाविसीबदल आले होते परंतु ताल न बसला माघारे गेले कुरकुंबाखाली काहीं आले नाहीत जाधवराव लोणीवरून राजेवाडीस आले आहेत तेथे तीन च्यार मुकाम होणार त्यांचे समजाविसीस श्रीमंत राजश्री माधवराव येणार याप्रो। वर्तमान आहे बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंति

---

(ले.८) श. १६८४ कार्तिक व. ६] श्री [इ. स. १७६२ नोव्हें. ७

[ पहिले दोन बंद गहाळ ]

पुरवणी चिरंजीव राजश्री कालोपत यासी आसीर्वाद

स्त तो या दिवसपर्यंत सर्व याजवर आहे हे कार्ये करितात ते पाहावे इकडील वर्तमान तर रविवारी फौजा येथे आल्या तैसेच चढाघोडयानिशी श्रीमंत राजश्री माधवराव घोडनदी पलीकडे होते त्याजवर चालले दादासाहेब नदीजवल फौजासुधा गेले तो नदीस पाणी डोईइतके होत तेव्हां नदी आलीकडेच उभे राहून ते नदीपलीकडे उभे राहून त्याची याची तोफाची व जेजालाची व बाणाची लढाई लागली दादासाहेबाकडील दाहा पधरा घोडे पडले व दाहा पाच जखमी जाहाले पाच सात माणूस पडले व जखमीहि जाहाले शाहाजी सुर्वेकर वेंकटराऊ निबाळकर याजकडील यास उजवे हात स गोली लागली आहे व त्रिंबक खंडेराव यास उजवे हातास बाण लागला आहे दोघा मातबरास मात्र जखमा लागल्या वरकड मेथास्थिन आहेत तिकडेहि त्याजकडील दाहा पाच घोडे माणूस पडले व जखमीहि जाहाले संध्याकाल जाहाला म्हणून दादासाहेब मागे आदकोस सरकोन राहिले दुसरे दिवसी जुध्र करावे तो त्यानी सलियावर घातले मल्हारजी होलकर आले व पिराजी नाईक निबालकर व बाभोजी नाईक ऐसे आले सलियावर पडले

---

१ सदाशिव धोंडदेव पुरंदरे

आहे आजी कुयोग आहे याजकरिता माधवरावहि येणार ते राहिले कुयोग टलिलीयावर त्याच्या याच्या भेटी होणार यैसे आहे इकडून मल्हारजी होलकर व बाबोजी नाईक व पिराजी नाईक यैसे फिरोन तिकडे सलियाचा तहरह ठराऊन गेले आहेत दादासाहेबाचा हेत तो भारी जुंज करावे फौजहि पंचवीस तीस हजार इकडे चागली आहे तिकडे त्याजकडेहि फौज दाहा पंधरा हजार होईल ते थोडके हे फार आहेत जुज होते तरी हे काही त्यास आटोपत नाहीत यैसे आहे परतु ईश्वराची लीला कोणास कलत नाही येथील सलामामला जाहाला म्हणजे आम्ही निरोप मागोन येउ म्हणतो कलावे सेतचा दाणादुणा रात्रीचा दिवस करून घेणे राजीक या प्रकारचे वैरणकाडी गावाजवल आणून ठेवणे कुरणाची चिठीविसीहि श्रीमतास हाटकून दिल्ही तर पाठऊन देऊ दुभती म्हैस येक कामरगावीहून चिरजिवानी ठेविली त्यास बाजी कामरगावास पा आहे तो परभारे घेऊन तिकडे येईल घरी सावध असावे बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद गावकरी यास समस्त लाहाणाथोरास आसीर्वाद सागणे

---

(ले. ९)श. १६८४ मार्ग. शु. ६ ] श्री [ इ. स. १७६२ नोव्हें. २१

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री वासुदेवपंत दाजी स्वामीचे सेवेसी

पो[1] सदासिव गोविंद कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता छ ४ माहे जमादिलोवलपर्यंत येथास्थित जाणून स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष आपणाकडून बहुत दिवस जाले पत्र येऊन साभाल होत नाहीं त्यावरून चित सापेक्षित असे तरी यैसे नसावे सदैव येणार माणसासमागमे साभाल पत्र पाठवून संतोशवित जाणे यानंतर आम्हाकडील वर्तमान तरी उभयेता श्रीमंताच्या जुजाचे वर्तमान सविस्तर आपण परस्परे आईकिलेच असेल पत्री काये ल्याहावें सारौष आपले फौज मोडली मग विस्तार काये ल्याहावा आलीकडील वर्तमान तर मोगल आपल्या लस्करापासून तीं चौ कोशावर येऊन पडला आहे आज दो प्रहरानंतर भेटी होणार यैसे आहे भेटी जाल्यानंतर याचे त्याचे कसे होईल ते पाहावे भट भिक्षुक जोसी यांणी तो लेहून दिल्हे आहे की अविंधाच्या भेटी जाल्यावर सला बिघडतो याचे त्याचे जुज होते मार्गशीर्ष वद्यात युध्यास प्रारंभ होईल माघमासपर्यंत घुमेल यैसे आहे व सर्व ज्यन हेच बोलते तेच खरे होईल मोगलाचा येदा बदोबस्त भारी आहे तीस हजारपर्यंत फौज आहे सवासे दीडसे तोफा समागमे आहेत याप्रो सामान आहे आपले फौजेचे वर्तमान तर श्रीमंत

---

१ घोंडो मल्हार पुरंदरे यांचा कारकून,

राजश्री रायांची फौज तो पली यैसी सर्वांनी केली आहे सर्व आपली फौज बेदील आहे ती तो कांहीं जुंजास उभी राहात्ये यैसा अर्थ नाही दादासाहेबाची फौज म्हणावी तर फार करून त्या फौजेत मोगलाची फौज मुरादखान व निंबालकर वगैरे होते ते तो मोगल येताच तिकडे गेले वरकड फौज आहे त्यास तो कांहीं नालबदी कोणास पावली नाही असे असता जुजासमई टिकेल हे कलतच आहे त्याहीमध्यें ईश्वरीसता दमे होईल हे कोणास कलत नाहीं याप्रो मजकूर आहे दुसरे येथे आपलीयाकडील फौजेस काणी पुसत नाहीं सर्वांचे सरंजाम बंद केले नाना पुरधरे याचा सरंजाम बंद जाला आस्ले येजमानाचाहि बंद होणार आहे वडुल्याचे पत्र आले [ अपूर्ण ]

---

(ले.१० ) श. १६८५ कार्तिक ] श्री [ इ. स. १७६३ नोव्हें. १७

[पहिला पंद गाहाळ. बैहिरो आनंताचे दाजीबास पत्र-खाजगी मजकुरानंतर]

...कामरगावचे वाड्याचे काम तूर्त च्यार महिने न करणे राहूं देणे मोगलाचा दंगा वारला म्हणजे मागाहून लिहून पाठऊ त्याप्रा करणे पिंपलगावचे वाडियाचे च्यारी बुरज सफेली करून घेणे मग बखेडीयात न पडणे दरबारी फार सावधपणे आसत जाणे साकल्ये वर्तमान लिहून रा गोपालपंत दादाची जोडी येईल त्याजबरोबर लिहून पा दादासी कोणे गोष्टीविसी विपर्यास न दाखवणे त्यांशी आम्हास सचोटी राखली पाहिजे बारासे रुो देतील चिंता नाही वाजिरास पत्रे पाठवितां त्याचे कार्ये जाले तरी आधी पत्रे पेशजी लिाप्रो सत्वर घेऊन पाठवणे दिनानाथ आम्हास वारंवार लिहितात की रा जनार्दन विठल यानी आठ हजार रुो याजसाठी घरी चौकी बसविली कजिये केले यामुळे येणे न जाले त्याप्रा लिहीतात हें सत्य किंवा मिथ्या हे लिा त्यासी फजीत करून इकड लाऊन देणे त्याचे मारफतीची कामे इकडे फार आहेत यासाठी लावणे लोकांहि कोणी निढावले तरी लावणे सोच ( तीं ) ची चिंता नाही वाट चालती महादजी बाबावरील वरात येका लाखाची होती त्याजपैकी येक रुपया देत नाहीत आम्ही तगदर ( ? ) आम्हाजवल काये म्हणतात श्रीगोदीयात काये जे दिल्हे तेवढेच मात्र ऐसा प्रकार आहे विना ग्वालीयेरीस गेलीयावरी काही जाटाचे पारपत्ये जालीयासिवाय सोईस पडत नाही मल्हारजी बावा जाट [१]येकत्र जाले रोहिलीयावरी जाणार आहेत रोहीलीयाचे सूत मल्हारजीबावाकडे ल्याले की तुम्ही या

---

१ संताजी माणकेश्वराचा मुलगा

भानगडीत न पडणे थोडे बहुत दक्षणा घेऊन जाणे पाहावे सेवटी काये ठरले बागात सुपारी व नारेल फार लावणे ( यापुढें खाजगी मजकूर पत्र अपुरें. )

---

(ले. ११) १६८५ का. वा ] श्री शंकर [ इ. स. १७६३ नो. २३

श्रीयासह चिरजीव राजश्री दाजीबास प्रती बहिरो आनंत आसविर्वाद उपरी येथील कुशल ता। १७ माहे जमादिलावलपावेतों कचनारची सराय प्रांत खीचीवाडा येथास्थित असे विशेष तुम्हाकडून आलीकडे पत्र येऊन वर्तमान कलत नवते त्याजवरून परम चिंता वाटत होती त्यास हर्ली आश्विन वद्य आष्ट-मीचें पत्र आलें ते पावलें लिा। वर्तमान कललें सौंसाराचें वगैरे दरबारचे लिा। तें कलले संकलीत लिा। ऐसियास आमचें वर्तमान तरी रा। महादजी सिंदे मल्हार-जीबावाकडे जाटाचे सामिलतीस जातात आम्ही घेऊन खिचीवाडयात आलों येथें सुनेरातया खिचीवाल्यानी दाबला आहे यासाठीं आणिले त्यापासोन सोडऊन घेऊन ग्वालीयेरीस घेऊन जाऊन कांहीं जाटाचे पारपत्ये जाले तरी उतम आहे काहीं प्रेत्न करून पाहातो उजेनीस येऊन पान्नसातशें लोक ठेवले परंतु सामान या देशचे आहे तुम्हापसले लश्कर काली येऊन दाखल जाले सदासिव मुरार बनकर वगैरे सिलेदार रा। दामाजी खडेराऊ याणी आटकाऊन ठेवले आम्हाकडे येऊं देत नाहीत व त्याच्या चितात आम्हाकडे यावयाचे नाही येते तरी दामा-जीच्याने काय होते आसो तुम्ही जे लोक तुम्हापासी येतील त्याजपासोन ऐवज + + + आम्हीं आलियावरी सिलेदार व आम्हीं समजोन घेऊ चाकरीसहि त्या न ठेवणे बरो + + रुो रा। गोपालपंत दादा देत नाहीत थोडयासाठी बोलतां नये त्याहीमध्यें सफत घातली म्हणोन विस्तारे लिा। ऐसियास थोडयासाठीं न बोलावे हेच उत्तम आहेत त्याहीमध्ये ते वडील आहेत बारासे रुो देतील त्यानी च्यार दिवस न दिल्हे म्हणोन काही चितात न आणावे जाजती च्यार रुो लागले तरी वडीलच ते आहेत तुम्ही म्हणावे ऐसे नाहीं दरबारचे कामकाज दादा तुंम्ही मिलोन जाऊन करीत जाणे नरसिंगगडचे जाते समई दादास व तुम्हास सांगितल्याप्रा। कागदपत्र उगऊन लौकर पा। श्रीमंत दादासाहेब बरो-बरी स्वारीस जाणे जरीकरितां चागली त्याणी सोये करून दिल्ही तरी त्या प्रमाणेच च्यार स्वार ठेऊन जाणे न दिल्ही तरी रिकाम्या घोरात न पडणे जातीने मात्र जाणे लोक ठेवणे जाले तरी पठाण फडतरे दोनी निराले करून ठेवणे चिरंजीव व्यांसराऊ[1] श्रीगोंदियास गेला म्हणोन ऐकिले होते व तुंम्हीही लिा। हाते

---

१ अंताजी माणकेश्वराचा दुसरा मुलगा

त्याचा प्रकार काये जाला जरीकरितां चांगली सोये पेशजी लिा जाली तरी चिरंजिवाचे सजून देणे आपाची (अपूर्ण)

---

(ले.१२) १६८५ मा. वा१४] श्री शंकर [इ.स. १७६४ मा. १

पौ छ २३ शवाल आह (?) प्रदजी फिरगू जासूद

चिरजीव राजश्री दाजीबास प्रती बहिरो अनंत आसीर्वाद उपरी येथील कुशल ता माघ वद्य १४ मुा ग्वालीयेर येथास्थित असे विशेष तुम्ही पत्र पौश वद्य त्रयोदसीचे पाठविलेते काली पावले लिा ते कलले गाभाजीपंतावरोबर इकडून लोक रवाना केले म्हणोन लिा ऐसियास उत्तम केले दामाजीपंतासही लावर्णे शरिरास सावकाश वाटत नाही म्हणोन लिा तरी औशध उपाये करून आरोग्य होय ते करणे आपाजवलोन वीस घेऊन फारखती दिल्ही म्हणोन रा गोपालपंत दादानी लिा परंतु आपणास लिहावयास न पडले हे माघेच आम्ही ऐकिले की तुम्ही घालमेल माडली आम्ही त्याजवरी तुम्हास लिा होते की हे कर्म करू नका तुम्ही कां देता तुमचे बुधीस भृश जालासा दिसतो वीस हजार घेऊन चौदाचे खत माघारे द्यावे साहा रोख मात्र घेतले आणि फारखत दिल्ही घर कोणाचे बुडाले हे काही समजला नाही तुमची प्रकृत आम्हास पूर्ती ठाऊकी होती म्हणोन बहुता प्रकारे लिा व जाते-समई सांगितले की घालमेल न करणे ऐसे असता जे न करावे ते कर्म तुम्ही करिता फुकाचे आम्हास पुसत देखील नाहीत येणे कडून घरास आपाये आहे घड आम्हांसमागमे न आला व माघूनहि न आला ना दरबार राखिला काहीच केले नाही आसो जे जाले ते दैवानुरूप जाले तुम्हास बोल काये आतां तरी येक करणे की राजश्री गोपालपंतदादास बोलाऊन आणून सांगावे जबरदस्तीने मज-पासोन पालाने (?) लिहून घेतले मी देणार कोण माझी फारखती रुजू नाही ऐसे दादासी बोलोन त्याची साक्षीस ठेवणे मागे पुढे ते असावे तैसेच तिा आपाजी-पंत सुपेकर त्याजकडे जाऊन त्याला सांगणे की मजला नाना प्रकारे भासऊन बलेच लिहून घेतले हे लिहिले सही होणार नाही तुम्ही साक्षीस आसणे म्हणोन त्याला साक्षीस ठेवणे गुजरयेतीस पत्रे आमची आहेत ती याला देऊन उतरे पाा तिसरा प्रकार जे जालें तें उतमच जाले दादानी लिा की दाजीबा श्रीमंताकडे जाणार येणेकडून समाधान जाले तरी समागमे दादाम घेऊन जाणे खावंद राजी राखण म्हणजे लक्ष आहे खावंदाजवल आसले तें किती आणि घरी राहिले ते किती बहूत फेर आहे श्रीमंतास विनंती करून पत्रे मल्हारजी बावास जाठास वजीरास पेशजी लिाप्रा पाा इकडील वर्तमान आम्ही ग्वालीयेरीस आलो माहादजी सिंदे माघारे उजनीस गेले दिल्लीकडील नजीबखान मल्हारजीबावास

भेटला जाटाचे सख्ये करून दिल्हे वजिरास दिलीत बसविले वजारात दिल्ही जाटाने मल्हारजीबावास चालीस लाख रुो दिल्हे आबदाली लाहोरास आला तो सिखानी तेथेच मोडला माघारे पलोन गिलजा गेला रोहिलीयानें पूर्ववतप्राो राहावे याप्राो जाले आतां मल्हारजीबावा नजीबखानास घेऊन सुज्यातदौलाचे कुमकेस जाणार आहेत सुज्यातदौलानें मल्हारजीबावास साठ लक्ष रुो देऊ केले की माझी कुमक करून फिरंगी यास तंबी पोहचावी याप्राो जाले दिलीचा बंदोबस्त करून तिकडे जाणार आहेत याप्राो वर्तमान आहे साहा महिने फिरलो की सुलेरा (?) सोडवावा नरसिंगगडची खेडी सोडवावी आंतरवेदीतील माहाल सोडवावे इतके त्यानी कबूल केले म्हणोन आंम्ही त्यांचे मागे फिरलो सेवट येकहि न जाले हे माघारे गेले आणि ग्वालीयेरीस आलो जाठ गोह (द) कर वगैरे कोणी भेटत नाही च्यार वर्शे रुो त्यानी घेतला गडघा कोट बाधले कोणास खातरेस आणीत नाहींत ऐसा विचार आहे यासाठीं लक्षाची वरात माहादजीवरील मल्हारजीबावाकडे घेऊन पाा म्हणजे लोकाच्या नालबंदीपासोन तरी मुक्त होऊ सारांश तुम्ही श्रीमंताकडे जाऊन दरबार राखावा म्हणजे लक्ष आहे नारोपंत पोक्षे यास माचेत घेऊन तुम्ही आपले निराले काही डौल सजून पाहाणे सारे आधिपत्ये नानास देऊन पाहाणें परंतु दरबार न सोडणे वरचेवरी पत्र पाा वाडयाचे च्यारी बुरूज सफेलीसुधा करणे घरचे वगैरे सर्व वर्तमान लिहून पाा: बहुत काय लिा हे आसीर्वाद

पौ छ २३ शवाल

---

(ले.१३) १६८५ फा. शुा १३ ] श्री शंकर [ इ.स. १७६४मा.१६

श्रीयासह चिरंजीव राा दौजीबास प्रती बहिरो अनंत अनेक आसीर्वाद उपरी येथील कुशल ताा फालगूण शुध्य १३ त्रयोदशी मुाा ग्वालीयेर येथास्थित असे विशेष तुम्ही पत्रे खंडू जासुदाबरोबर पाा ती पावली सांखेत कलला गबाजीपंत समागमे झाडून सिलदार रवाना केले जदीद फडतर मात्र ठेविले म्हणोन लिा ऐसीयास फडतरीयाचे कारण काय होतें तुमचा त्यांचा रुणानबंद काय आहे ईस्वर जाणे पंनास हजार नालबंदी येकवीस हजार रुो कबज केले काये समजोन केले तें तुंम्ही जाणा आसो जे जाले ते उतमच आहे काली गोपालपंताच्या कासिदाबरोबरी सविस्तर लिा त्यावरून केलेले इकडील वर्तमान तर जाटाचा व रोहिलीयाचा सला जाला गाजदीखान वजीर स्थापला नजीबखानाच्या पुत्रास बक्षिगिरी दिल्ही पूर्ववतप्राा जाले आबदाली लाहोरास आला नजीबखान मल्हारजीबावाच्या व आबदालीच्या भेटी करून देणार मग सुजा-

---

१ अंताजी माणकेश्वराचा तिसरा मुलगा भगवंत अनंत (?)

दौलाकडे जाणार मल्हारजीबावानी मातुश्री आहिल्याबाई व मालजी होळक व तोफखाना झाडून बुणगे ऐसे देसी लाविले काली येथून कूच करून इदुरा गेली गोहदकर जाठ वगैरे जमिदार कोणी येऊन भेटत नाहीत त्यास जरब पोहचावी तर त्यानी भेटावे ते होत नाहीं पोटाचे सकट जाले माहादजे सिंघाने पान महिने समागमे फिरवले सेवटी काही कार्य न करीता उजनीस गेले मागील आवई ऐकोन गेले ऐसा प्रकार झाला चहूकडून ईश्वर सानकूर आहे श्रीमत रा दादासाहेब स्वारीस गेले तुमच्या शेर रोज घालविले उभयत श्रीमत स्वारीस गेले आमचे कोणी समागमे नाही दरबार येक प्रकारचा जाल आहे तरी तुम्ही हजार कामे टाकून आधी रा गोपाळपत दादास घेऊन आधी जरूर श्रीमताकडे जाणे तेथील रगराग आपल्या ध्यानात आसोन सुस्त कैसे राह वेले आधी सत्वर जाणे दरबार राजी राखणे म्हणजे आम्हीं निष्काळजी आसो तुम्ही प्रसगी आसलीया आम्हास काळजी नाही व आपलेहि उत्तम आहे हजार कामे टाकून आधी जाणे दादास समागमे घेऊन जाणे माहादजी सिंधा वरील वरात मल्हारजीबावत घेऊन पा। व मानाजी सिंदे सकूबाई याजवरी ऐशा दोन घेऊन पा। मग तिकडील वसुलात येईल तिकडे पाहू आम्हाविसीं पत्रे सुभेदारास वजिरास घेऊन पा। याच्या माहालचा बदोबस्त करून देणे याच बिलात (?) वजिरास कीं त्याप्रा अताजीपताचे हाते घामकाज घेत होता त्याप्रो याचे हाते घेणे ऐसे पत्र पा। सकुबाईस माहादाजी गोविदास मानाजी सिंदे यास की याचे चालवीत जाणे वरातेचा ऐवज देणे पत्रे जरूर पा। मातुश्रीचा हेत महायात्रेस यावयाचा होता तो का राहिला न कले अ.से दैवनुसार येणे घडेल तुम्हीं माहादाजीपत रईकर त्यास फारखती काये समजोन दिल्ही वीस हजार घेऊन कर्म केले यात घर कोणाचे बुडाले आम्ही असता आमचे अपरोक्ष फारखती द्यावी उचित नाही बहुत आमचा लडा त्याजकडे आहे तुम्ही ऐसे करिता यास काये म्हणावे बुधीस भ्रश काये जाहला आसे ऐसे कर्म करीत न जाणे येणेकडून अपाये आहे जे जाले ते उत्तम आसो प्रस्तुद येक करणे की गोपाळपत दादास व आपाजीपत सुपेकर यास बोलाऊन आणून सागावें कीं आम्हास नानाप्रकार भासऊन फारखाती घेतली हे सिधीस जाणार नाही मीं फारखती देणार कोण मागेपुढे साक्ष द्यावी लागेल तेव्हा तुम्हास बालावे लागेल याप्रा बोलून तरी त्यासी ठेवणें येवडे तरी काम करणे वाड्यापुढे दर वाजा आहे त्या चोटयावरी काही न बाधावे पुढे सेतखाना काढला बरे केले बागात हरजिनस झाडे लावणे सुरूची सुपारीची नारेली लावणे च्यारी बुरूज सफेलीसुधा करून घेणे आम्हा देखता बुरूज दोन तयार जाले होते त्याच्या-वरी दोन दोन गज आणखी बुरूज चढवावे मग त्याच्यावरती सफेली याप्रो तयार करावी शाहाजी रुखी पासोन तीनसे रुपये घेतले तुम्हाकड चिठी दिल्ही

त्यास सुलतानजी पा सांगावे की येका महिनियाचा करार आहे परंतु दुसरे पत्र येईल तेंव्हां ऐवज देल तोपर्यंत मजुरा देणार नाही विना दुसरे पत्र आलिया-सिवाये त्यास मजुरा न वेणें जिवाजी चाचर त्याची मानाई चाचरीण तिने आम्हांस खर्चीसाठी लिा होते तरी जरूर दोन मोहरा तिच्या हार्ती देऊन-उत्तर आम्हास पाठवणे निदान तीस रुा तरी पा आनमान न करणे तिला चिठी आम्ही लिहिली ती मुजरद तिला पाठऊन जावा आणऊन रा जोसी-बावाकडून वर्शफल जरूर पा जोसीबावाचा ऐवज पावला किंवा नाही ते लिा बहुत काये लिहीणे हे आसीर्वाद कृष्णाजी गिता देशास आला आहे आम्ही रा गोपाळपंत दादावरी त्याला हजार रुा देविले आहेत परिछिन द्यावे लागतात तुम्ही दादास सांगणे की तो येईल तेंव्हां सांगावे कीं ( अपूर्ण )

---

( ले.१४ ) श. १६८३ ] श्री तालीक [ इ. स. १७६१

सरकारची पोतनिसी व जामदारखाना पहिल्यापासून राजश्री त्रिंबकराव सदासिव व राजश्री निलकंठ माहादेव पुरदरे याजकडे आहे त्यास मानिलेच्या तर्फेने रा शामराव नारायेण यासी मुतालकी सांगितली होती त्यास हाली त्यांज-कडून दूर करून हाली तुमची तुम्हाकडे सदरहू पोतनिसी व जामदारखान्याचा तालुका पूर्ववतप्रमाणे करार करून दिल्हा आसे तरी तुमच्या चितास येईल त्यास तुम्ही आपल्या तालुकियावरी ठेऊन सेवा येकनिष्टेनें करावी तालुकिया-वर सरकारांत शामराव नारायेण वगैरे याजपासून रुन समान खंसैनात तीर्थरूप कैलासवासी नाना याणी रुपये तीस हजार साल दर साल करार करून सरकारात वेत होते ते हाली तुम्हास साल मजकुरी तुम्हास माफ केले आसेत सदरहू तालुक्याची कारकुनीचे उत्पन्न होईल ते तुमचे तुम्ही घेत जावे धंद्याची घालमेल प्रतिवर्षी कोणी न करावी येविसी दरम्याने बोली-चालीस विद्यमान राजश्री बाबुराव सदासिव व राजश्री बाबुराव राम फडनिवीस व राजश्री त्रिंबकराव विस्वनाथ सदरहूप्रमाणे करार करून देऊन तुम्हापासून रुपये १००००० येक लक्ष घेतले आसेत साल दरसाल सरकारात काही मागो नये येणेप्रमाणें करार आसे सुहूर सन इसने सितैन मया व आलफ शके १६८३ वृषानाम संवछेरे सदरहूप्रमाणे करार याप्रमाणे वर्तावे यासी राजी असो

---

(ले.१५) श. १६८३ भाद्र. व. ५ श्री [इ.स.१७६१ सप्टं १९

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री शामराव अंबाजी गोसावी यांसि सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष रा धोंडो महादेव सेनाकर्ते यांजकडे मुकासे वगैरे गाव आहेत त्याची कर्जपटीकरितां जफ्ती जाली आहे ती मोकळी करून कर्जपटी रुा ६२५

साहाशे पचवीस करार केले आहेत त्यास मौजे पांडे प्रा वाई हा गाव मार-निलेकडे निमे आहे त्या गावच्या ऐवजापैकीं सदरहू सवा साहाशे रा वसूल घेऊन सरकार हिसेबीं जमा करणे जाणिजे छ १९ सफर सुा इसने सितैन मया व आलफ

---

( ले.१६ ) श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनंती मेजणीची काठी सातारेयाहून आणविली होती ते आली त्ये काठी-प्रो काठी करून पाठविली आहे * शामराव अबाजी [ किरकोळे ] जे काठीनें मोजणी वायदेशची करितात ते काठी कोरगावांहून परशरामपंताच्या धान्याची आणऊन पाठविली आहे हे काठीनें मोजणी करवावी बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनती पौ छ २३ जिलकाद

---

( ले.१७ ) श. १६८३ मार्ग.शु.८ ] श्री [ इ. स. १७६१ डिसें० ५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री वासुदेवपंत दाजी स्वामींचे सेवेसी

पो सदाशिव गोविंद कृतानेक सा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता छ ७ जावलपावेतो मुा मौजे रालेगण भिमातीर रुजू गणेगांव येथास्थित जाणौन स्वकीये कुशल लिहीत गेले पाहिजे विशेष आपण बहुता दिवसी कृपा करून माणकू जासुदाबरोबर पत्र पा ते उनमसमई पावोन लिहिल मजकूर सविस्तर कलला येसेच निरंतर पत्र पाठऊन संतोषवीत जाणे यानंतर इकडील वर्तमान तर पेशजी पत्री लिा होते त्यावरून विदित जाले असेल त्याआलीकडे वर्तमान तर अवधाच्या व श्रीमंताच्या भेटी रविवारी जाल्या त्याउपरी काल राजश्री विठल सुदर श्रीमताचे डेरियास मेजवानीस आले होते आज बुधवारी श्रीमत राजश्री दादासाहेब व आबा यैसे व सर्व लाहान थोर सरदार यैसे मोगलाचे डेन्यास मेजवानीस गेले आहेत उदईक खासा मोगलहि श्रीमताचे घरी मेजवानीस येणार उभयताचा श्नेह चागला जाला मोगलास श्रीमंतीं पच्याइसी लक्षाची जागीर पेशजी घेतली होती ती देऊ केली आहे व दौलताबाद किल्ला देऊ केला आहे याप्रो देऊन सला केला याप्रो वर्तमान आपणास कलावे म्हणौन लिा आहे आपले येजमान निरोप घेऊन घरास येणार आहेत कलावे बहुत काये लिहिणे लोभ कीजे हे विननी हो राजश्री नारोपत याचे स्वामीस सां नमस्कार लोभास आतरन करिता पत्री + + + + +

---

( ले१८ ) श. १६८४ आश्विन ] श्री [ इ. १७६२ सप्टेंबर.

विनंती माझे वर्तमान तर जे चोरी करीत आहो ते स्वामीस विदितच आहे

---

* पत्र नारो आपाजी तुळशीबागवाले याचें.

त्यास प्रस्तुत आमचे लेखक वगैरे तमाम आले आहेत श्रीमंत त्यासी नित्य खल-बत करीत आहेत आम्हासी तो आद्यापवर भाशण नाही आम्हीहि दरबारास बहुत जात नाही आजतागाईत तीन च्यारदा गेलो मरजी येक प्रकारे दिसते लाहान माणसाचा प्रभाव बहुत मातबरास परवानगीवेगले गमन नाही पाहिले दिसी मात्र आम्हास बंदोबस्ताचे किल्याचे वर्तमान पुसिले आम्हीहि तितकेच मात्र सागितले वरकड स्वामीकार्यामुले शत्रू तो बहुत आहेत हे सर्व वर्तमान स्वामीस सागितलेच आहे काये निभाव होईल तो न कले इनसाफ वाजवी केला तर स्वामी-वर शब्द येऊ देणार नाही आन करीत तर येत्न काये येथे कोन्हासी बोलावे हे जागा दिसत नाही घरीमात्र आसतो आगर बाबुराऊ फडनिस याचे घरी जातो यान्वये दिवस घालितो वरकडे तपसिल कोठेपावतो लिहो श्रुत होये हे विज्ञाती

---

( ले.१९) श. १६८४ आश्वि० ] श्री [ इ. स. १७६२, सप्टं०

सेवेसी सदासिव गोविद कृतानेक सां नमस्कार विज्ञापना स्वामीनी जनोजी-बरोबर पत्र पो ते पावोन लिहिले सविस्तर कलले खाद्या + + + + + पाठवावा म्हणोन लिा त्यास काल रो नाना + + + + याजबरोबर पत्र पो आहे त्याजवरून सर्व क + सेल बाकी यैवज राहिला आहे त्यास बाब्या + + + लाविलाच आहे जनू बाब्या मागे लाविला आहे आज यैवज वसूल होईल उदईक बाब्या जनोजीबरोबर यैवज देऊन पाठवील बलवतराव याजकडील भोई याजबा कर्जाचा व कमाणगार याजबा कर्जाचा मजकूर लिा त्यास आपले पत्र पेशजी आले त्यावरून उभयेतास तगादा करून भोई याजपैकी पंनास रुो घेतले व कमाणगार याजपासून वीस रुो घेतले बाकी यैवज राहिला आहे तोहि सोईने निकड करून घेतो दोघाकडील सतर रुो आले ते सरकारचे हिसेबी जमा केले आहेत तेथे आपल्याकडे पाठवावयाचे असतील तर तैसेच लेहून पो + + + खर्ची लेहून आपल्याकडे पाठवून देऊ...... वसुलाचा हिसेब आपण पेशजी मोढ.......लेहून पाठविला त्यात त्याजकडे पा......रुा बाकी काढून पाठविली त्यास श्रीमंत वैशाख मासी श्रीमंताचे घरी व्रतबधास आले होते तेव्हा शंभर रुो दिल्हे म्हणून गावकरी यानी सागितले बाकी च्यारसे दाहा रुो राहिले त्यास साल मजकुरी शंभर रुो सूट गांवास दिल्ही बाकी साहासे रुो गावची खडणी केली यैसा मजकूर जाला त्यामुले गावाकडे च्यारसे + + पैकीं तीनसे दाहा राहिले त्यापैकीं तीनसे रुो व......दाहा रुा राहिले त्यास गावकरी यास आ......वताबाबत देणे आहे व ताश्रिफा देणे आहे + + + चा जमा वसूल खंडणीचा केला नाही पु + + + त्याकडे गावकी येणार आहेत तेव्हा त्यास देणे असेल ते देऊन बाकी निघेल ती घ्यावी राजकी वर्तमान लेहून पाठवावे म्हणून लिा त्यास श्रीमंत पुणियाहून माघारे आले शरिरास फारच सावकाश वाटत नाही यास्तव आले कारभारीसहवर्तमान आले थोरल्या श्रीमंता-

कडील वर्तमान तर बळ विप्रेष आहे इकडील मनसबा विस्कलीत जाला सर्वांच्या शकी गलाल्यासे जाले यात सर्व समजावे रामचद्र गणेश व कृष्णराव बलाल तिकडून आले काल त्याचे याचे खलबत जाले सारांष उभयेता श्रीमत समजतील येसे आहे कारभारी मा [ त्र ] + +पडतील्से दिसते पुढे हाईल ते पाहा ( वे ) ( बहुत ) काये लिहिणे लोभ कीजे हे विज्ञापना + + + + पाटाविसी सिवजी कोठवळा याजव + + + + + पो त्यावरून दाहा गोणपाट पाठ( विले ) आहेत त्यापैकीं कोठीकडे लागतील ते घ्यावे हे विज्ञापना

---

( ले.२० ) श. १६८४ आश्विं०] श्री [ इ. स. १७६२ सप्टं०

राजश्रिया विराजित राजमान्य

राजश्री वासुदेवपत स्वामीचे सेवेसी

पो सदासिव गोविंद सा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणे विशेष आपण पेशजी पत्र पा होते तेथे लिा होते की साल गुा सन इसनेचा स्वारीचा हिसेब आकारून पाठविणे त्यावरून हल्लीं स्वारीचा हिसेब तपसिलवार लेहून पाठविला आहे घेऊन अवलोकन करून विल्हे लावणे हिसेयात काहीं चुकले आगर हस्तदोश पडला असला तर साभाळून घेऊन विल्हे लावावा इकडील वर्तमान तर श्रीमत राजश्री रावसाहेबाचे शरिरास ज्वराची पिडा प्राप्त जाली त्यामुळे बहुतच हैराण आहेत विज्यादशमीचे मुहूर्ताने घोरपडीवर गेले होते त्यास वेथेमुळे शुक्रवारी मध्यरात्री पुणियात माघारे आले त्रिंबकरावसुधा आले आमचे यजमान आले येसा या मडलींचा मनसबा विलग पडलासा जाला पुढे आरोग्य जाहालीयावर मुहूर्त पाहून निघणार येसे वर्तमान आहे श्रीमत दादासाहेबापासीं तों जमाव दिवसेंदिवस भारी होत आहे मोगलाचा व त्याचा सलूक आहे प्रस्तुत दादा औरंगाबादेचे सुमारे आहेत त्याजकडून आज रामचद्र गणेश व कृष्णराव काले आले त्याचे याचे आज खलबत जाले परतु काही फुटले नाही सारांष तिकडील मडलीचा डाव चागला जाला इकडील मनसबा विस्कळींत दिसता याचे त्याचे सख्य होईलसारखे दिसते पुढे होईल वर्तमान लेहून पाठऊ सर्वांस सा नमस्कार प्रथम प्रथम सागणे हे विनंती

---

( ले.२१ ) श.१६८४ आश्विन शु॥ १३] श्री [इ.स.१७६२सप्टं० ३०

श्रीमत राजश्री दादा[१]

स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक विसाजी केशव [साने] कृतानेक सा नमस्कार विनंती येथील वर्तमान ता आश्विन शुध १३ गुरुवार पावेतो येथास्थित असे विशेष श्रीमत काल बुध

---

१ धोंडोबा आप्पांचा मुलगा मल्हार धोंडदेव ऊर्फ दादा.

वारी पुणियातून कूंच करून थोरले श्रीमंताजवल गेले थोरले श्रीमंत आज गुरु-वारी कूच घोरपडीहून करून खराडीच्या मुकामास गेले पिराजी नाईक निंबाल-कर काल कूच करून खराडीवर गेले तूर्त लौकर नगरावर जाणार मग तेथून मनसबा करणें तो करितील तिकडे गंगातिरी श्रीमंत गेले त्यांची यांची लडाई होणार जानोजी भोसलेहि तूर्त येणार मग ते कोणीकडे जातील पाहावे श्रीमंती मोढवियापैकी दोन उंट पुणियास आणाविसे आहेत पुण्याहून कांहीं वोझें मोढ-वियास नेणे आहे यास्तव सत्वर पाठऊन द्यावे सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

( ले. २२ ) श्री

विनंती उपरी काल शुक्रवारी प्रहर रात्री लस्करांतून दारकोबा आले त्यास लस्करचे वर्तमान श्रीमंत राजश्री रावसाहेबाकडे करार जाला होता कीं शुक्रवारी भेटी कराव्या त्यास काल भेटीचा मजकूर मोघम ठेऊन फौज व बुणगेसहवर्तमान कूच करून माघारे आले गावास आल तोफा व काही फौज तलावर टाकली त्यास श्रीमंत राजश्री दादासाहेब फौज व तोफासुधा त्याच मार्गाने कूच करून गेले याप्रा वर्तमान जाले तुम्हाकडे काही नवल विशेष वर्तमान आले आसिले तरी ल्याहावे व घरचे मुलालेकराचे वर्तमान ल्याहावे बहुत काये लिहिणे हे विनंती

---

( ले. २३ ) श. १६८४ पौष ] श्री [ इ. स. १७६३ जानेवारी

सर्व प्रकारे स्वाम खावंद आम्ही सेवक लोक आज्ञेप्रमाणे वर्तणूक करावी चाकरी येकनिष्ठेने करून दाखवावी जेणेकरून सरकारचा नफा ती गोष्ट व्हावी व करावी हे इछा आहे याप्रो करविणार खावंद आहेत आमची उमेद खावंदाचे कृपेवर खावदानी घेतल्यावर सर्वहि सेवक करितील

प्रस्तुत सर्वांनि आपलाले नीट करून घेतले आहे खावंदाचे दौलतीचे कर्जाचे कोणास आगत्य आहे नाही हे स्वामी जाणतच आसतील

मोगलासी श्नेह प्रस्तुत जाहाला आहे उतमच आहे परंतु मातबर कामे येक दोन त्याणे आपूण करावी यात नफा दौलतीचा आहे तरीच श्नेह उतम घण्याची घरची जाहागीर किले गेले किती राहिला मुल्क किती हे खावदाचे खावद ध्यानात आणतील तेव्हा विचारात येईल

खावदाचे दौलतीस जख किती वसली हे खावदाचे ध्यानात आहेच त्यास इतक्या गोष्टी नीट व्हाव्या दौल-तीचा बंदोबस्त व्हावा गेली बाजी सावरावी या गोष्टीवर चित कायेम राहून डौल धरावा हे स्वामीविना कोण करणार

खावंदाचे घरी सर्व लाहान मोठे आहेत बरेवाईट आहेत परंतु आपपरावे जातीचा अभिमान हा प्रकार काहीयेक नसावा सर्वहि खावंदाची लेकरे व सेवक जो दौलतीचा खैरखवाई तो आपला उपयोगी यैसे ध्यानात आणून सर्वांवर

तूर्त कर्नाटकचा बंदोबस्त त्याणे आपूण करावा हैदर नाईकाचा पारपत्य करावें म्हणजे पाऊण करोड रुपये आपले वसूल होतील ही गोष्ट येदा जरूर व्हावी

फडणिस पुरातन सेवक स्वाम कृपावंत क्षमा करावी आणि सेवा घ्यावी

मजुमदार पुरातन आहेत कृपा करून सेवा घ्यावी त्याजकडील नजर सरकारात आली आहे.

कृपा योग्यायोग्य आसावी आमी रितीस जो आणिक तरेने वर्तल व दाखवील त्याचे पारपत्यच आसावे तरीच बखेडे बंद तुटतील आम्ही शेवक हे जाणतो की देशग्त कोकणस्त कराडे परभू सेणवी मराठे हे सर्व स्वामीचे स्वाम इतक्याचे मायेबाप चाकरी मात्र सर्वांनी दौलतेतीची करावी हे जातिभेद आभिमान नसावे

[ ही सर्व यादी नाना पुरंदऱ्याच्या हातची आहे. या यादीच्या पाठीवर कोऱ्या जागेवर एक पत्र आहे ते असेः—]

( ले. २३ अ ) श्री

श्रीमत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य भास्करराव दादाजी सां नमस्कार विनंती येथील क्षेम आपले दये मार्गशीर्ष बहूल ८ अष्टमी तों येथास्थित जाणून स्वकुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष आपणाकडून बहुत दिवस पत्राभावे परामर्ष न होता चित्त उत्कंठीत सदैव पत्रप्रेषणी साभाल करावा यानतर दुसाला आम्हावर कसाला सिमेपरता (?) आपणास विदितच आहे नजरेचे पैकस गाडदी बसलेच आहेत येविसीचा कितेकार्थ सांगून हाली राजश्री गणेश विश्वनाथ पाठविले आहेत सर्वहि आपणास विदित करतील ते अंतःकरणी घेऊन त्याप्रमाणे दरबारी साहित्य पुरऊन समर्पक घडऊन आमचे ऊर्जित हो तें करावें बहुत काय लिहिणे कृपा आसावी हे विनती

( ले.२४ )श. १६८४ फा० वा १४ ] श्री [ इ. स. १७६३ मार्च १३

श्रीमंत राजश्री अप्पासाहेब स्वामी वडिलाचे शेवेसी

आज्ञाधारक विठल व्यंक मालेराव चेरनावर मस्तक ठेउण सिर सां नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता फाल्गुन वद्य १४ रविवार जाणोन स्वकीये श्वानंदवैभव लेखण आज्ञा करीत आसिले पाहिजे विपश मौजे मजकूरचे वर्तमान श्रीमंत दादासाहेब फाल्गू [न] वद्य १० नगर प्रांतीस आले निचेदेऽह्यारियाचे घाट उतरोन हिवरीयानरून औरंगाबादेस गेले सिवार चारीत गेले शहरास मोरचे लाउन दोन पुरे जाले मोवताले दाह पांच गाव लुटले तों येवण व श्रीमंत भोसले + गोपालराव व सदासिव रामचंद्र असे समागमे नागतल्याचे घांटे औरंगाबादेस गेले मार्गी + + ले तो गाव गेलेच मोवताले दोचौ कोसी भोसले लुटीत गेले आपण आपले गांवचे भले माणूस व वाघोलीचे रो माहदजी पाटील गोरे यांज-

कडील दोन भले माणूस ऐसे नागतलिया + + + प्रांतीस पाठविले होते त्यासी सेंपणास + + + + वेच पडोन गाव जगला आपले + + + बैल पणास साठ नेले होते पांच सात कोसावर लगट फरोन काही खर्च करोन गुर आणली औसे वर्तमान आजपावेतो जगलो आहेत पुढे कार्य होईल ते पाहावे मुलूकांतील कैद उठली गंगथडीस वरखेड वडगांव व रामडोहो व आनखी दोन च्यार गाव झाडून लुटले नवाबसाहेब तो शहरास गेले व भोसले गोपालराव वगैरे हरि-भक्ताच्या फौजा दो चौ कोसी आलाकडे आहेत श्रीमत तो कासारबारी उतरोन गेलेत औसे वर्तमान दुसर भोसलीयाणे सेवगाव रोखा रुा पांच हजार व तिस-गाऊ रुा दोन हजार रोखे करून रुा घेतले आपला सिवार रानांत आहे काही गांवाकडे आन + आहे पेसजी साहेबास ऐवज पाठविला तेंव्हां तपसील वसु-लाचा लिहिला होता त्याज उपरांती पांच साहे रुा वसुलात आलेला स्वामी-कडे रवाना करावा तो ऐसे वर्तमान (घ)डोन आले आहे मुलूक खराब जाला पुढेहि भरवसा येत नाही स्वामीची आज्ञा की रुा वसूल आला तो खरा आपणहि त्याप्रमाणे वसुलाची निकड करीतच आहे परतु कुनबी म्हनतात की माल राणात तयार जालियावाचून पैका मिलत नाही सावकर तो दे घे करीत नाहीत माल तयार करोन पैका घेणे आनी कौल साहेबाचा आहे त्या (अपूर्ण)

---

(ले. २५) श. १६८५ ज्ये. व १३ ] श्री [इ. १७६३ जू. १०

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे सेवेसी

सेवक आज्ञाधारक चरणरज धर्मराव तमाजी कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता। जेष्ठ वद्य १३ पावेतो माहाराजाचे कृपाकटाक्षे आनंद आसे विशेष ये प्रांतीचे वर्तमान पूर्वी अजूरदार जोडीसमागमे जेष्ट शुध्ध १ पावेतो विनंती हुजूर केली आहे त्यावरून अवगत होईल कदाचित कासिदजोडी न पावली असेल तरी मागती दुहराऊन विनंती केली जाते जे जाठाकडील करार-दाद ठहराऊन राजासिंग वगैरे माहराजाधिराजाची फौज ज्येपूर प्रांतास आली जा [ ठा ] चा भाऊबंदासमागमे नामाविधान घेऊन आले सुध्ध १० श्रीसवाई प्रथ्वीसिंग यास पटाभिशक करून राजी बसविले सर्वत्राकडील टिका हती घोडे व तोरेनिकम वगैरे पावला जाठाकडून जाठाचा भाऊबंद आला होता त्याचे हात बाधून हुजूर माहराजाचे उभा करून तकसीर माफ कराविली करारदाद हेच ठहरा की पुरवापार ज्याप्रकारे चालत आले आहे त्याप्रकारे जाटाने चाकरीस हजूर असावे व आपलेले हधेत सावध राहून कजिया न करावा दसरियास मजुरियासाठी जेयेपुरास येत जावे याप्रकारे रुबरू श्रीजींचे करार जाहल्यावर तकसीर माफ म्हणून श्रीजीनी आज्ञा केली तदोतर जाटाकडील टिका श्रीजीचे नजर गुदरली

पु....३

येक हती व घोडे ४ च्यार दोन रकम जावाहीर व च्यार तारखे वस्त्राचे याप्रकारे नजीर जाटाकडील जाहली व राजपूत सरदार नवलसिंग व राजसिंग व सरदारसिंग नरुका यासी वरकड लहान थोर राज्याचे भाऊबंद या सर्वांचा बहुमान श्रीजींनी केला त्यानीहि सर्व प्रकारे परस्परेने चाकरी करावी व हजूर असावे हे अगी करोन सर्व पायास लागले बालचंद छापडा माधोसिंगजीचे वेलस दिवाण होता त्यास सर्व रजपुताचे अनुमतानरूप दिवाणीहून मवकुफ करोन नतनचंदास दिवाणीची वस्त्रे देऊन दिवाणी सांगितली व हारगोविंद दिवाणाचा पुत राधाकृष्ण नाठाणी यास बकसीगरीची वस्त्रे दिल्ही व रायेचंद नाठाणी यास तोफखान्याची दरोगी देऊन वस्त्रे दिल्ही नवा जुना प्रकार याप्रकारे नूतन राज्यानी केला जसवतसिंग चौंडावत राणी चौंडावतणीचा भाऊ श्रीसवाई प्रथ्वीसिंगजीचा मामा त्याचे अनुमते व सदाशिवभट राजगुरू याचे विचारें व रायसिंग घुडचडा याचे सल्लाईतीने जे काही कर्तव्य ते बंदोबस्ताचे करावे हा निर्धार प्रस्तुतकाली ठरला आहे आपले दक्षणी सरदार राजश्री सदाशिव गंगाधर होलकराकडील व येशवंतराव बावले व दवलामिया सिंद्याकडील यैसे दरोबस्त पंधरा हजार फौज रायेसिंगाचे शामील होती ती जाटाचा सलूक जाहल्यावर त्यास आज्ञा दिल्ही ते मारवाडचे रोखे गेले मारवाडवाला बिजयेसिंग यानी त्यास भेटीचा पैगाम लाऊन बकानीरकर राजगजसिंग यास बोलाविले व रूपनगरवाला यास आपल्यासमीप बोलाऊन दाहा हजार फौजेनिसी जोधपुराहून कूच करोन मेडत्यास बिज्ययेसिंग आले सरदाराहि दुरसूरचे मुकामीहून कूच दरकूच बिज्ययेसिंगाचे रोखे गेले गावठाना दक्षणी फौज मारू लागली तेंव्हा बिज्येसिंगजीनी साफ सागून धाडले जे गावगना मारावयाचे कारण काये आम्ही तुम्हासी स्नेहभाव न वरतो तर तुम्ही गावगना मारणे विहित होते आम्ही तुमचे सलुकावर असोन तुम्हास भेटनो तव्ह न ग व कारणे उतम नाही म्हणून सागून धाडले त्यावरोन सदासिव गंगाधर व येशवंतराव बावले दवलामिया यानी ताकीद फौजेत विशेष केली की गावगना मारीत घेऊन जाऊन मजल दर मजल जाऊ न जाऊ त्यावरुन बिज्ययेसिंगजीसी भेटी जाहल्या बहुत सिष्टाच्यार जाहला बिजयेसिंगजी घरास येऊन बहुत मान वाटऊन गेले लौकीकी येकोपा स्नेहभाव उभयेपक्षी विशेष जाणविला परंतु द्रव्याचा आभाव हा प्रकार द्रिष्टीस पडतो नगू आहेत पिछा भारी जाणोन बहुमानास कमी करीत नाही द्राव्य प्रकार मानासिकच आहे जर या समाहि उभेयता सरदारासी देईल करभारी जमीयेतेने आले असते तरी जाटास मोठा शह पोह [ च ] ता व अतरवेद व भदावर सर्व सुटती व विपूल द्रव्यहि मिलते सरदाराचे अगमाची सुस्ती जाणोन राजसिंग वगैरे माहाराजाकडील सरदार यानी हा विचार केला नाहक अपणासी बा हि खा ल बुडून नफा काय या जमीयेतीने पारपत्य जाटाचे पारत होत नाही

लाखानी खाले घालावे तरी दक्षण्यास साठ हजार व आपले फौजेस दाहा हजार पाहिजेत पैसा मिळणे दुस्तर. श्रीजी माधोसिंग कालवश जाहल त्यास ज्याप्रकारे बनेल त्याप्रकारे-जाव साभयेप्रती जाणेऊन सलूक करोन सिबंदी पासून सुटावे मग पुढें बाहबरसात जे घडणे ते घडल या भावे सलूक जाठाचा करो [न] जयेपुरास येऊन सर्व नवी फौज दिलीकडील तुरक चाकर ठेविले होते त्यास आज्ञा दिधली व राजश्री ब(स)दासीव गंगाधर यासी निरोप दिल्हा याच्या शेजमुऱ्याचा यैवज पाच च्यार लक्ष ज्यपुरकराकडे बाकी आहे त्याचे तहासिलेवर सिंद्याकडील व होळकराकडील सेपनासा रावतानिसी ग्रहस्त जयपुरी आहे त्यास काही थोडा बहूत औवजासहीत ग्रहस्तास घेऊन शामसिंग रायेसिगाचा भाऊ मेडतप्राताास रा सदासिव गंगाधर व येशवंतराव बावले याकडे जाणार आहेत न गु ची वास जा ने श्नेहेवादारास मिलोन करावा त्यास आपले गडी गोष्ट यांना तिलह भरव[सा] सापडत नाहीं परिणामी द्रव्यजनित श्नेहे कलहप्राप्तीस कारण दिसतो रंगू तर सर्व प्रकारें काबाडची आहे व लौकीकी बोलून दाखविता नये सर्व प्रकारे आम्हास दक्षणेसी श्नेहे राखणे द्रव्य प्रसंगी खरे उतरत नाहीं यावरून भास हा जाणतो की परिणामी श्नेहेभाव राहणे कठीण उदईक सरदार येऊन बाकी ईश्वरसिंगजीची वेळची व. माधोसिंगजीचे वेळची मागील तेव्हा श्नेहे कसा राहील व जाठहि याचे भावे उगाच राहून समय लावितो की दक्षणीस जेप्रकारे जयपूरकराचा ममतेत आहे तिकडील अनुसंधान तुटले तेव्हा द्रिढी करणे अपलेकडील करू या भावे समये गाठून सलूक लौकीकी केला आहे द्रव्य देणे व अलवारचा किला देणे सर्व गोस्टी लौकीकी होत्या काहीहि दिधले नाही कोणीक भाऊबद पाठऊन हात जोडून तकसीर मात्र माफ करविली लौकीक शरणागतेचा जाणविला हा प्रकार आहे सरदार लौकर येऊन काही बदोबस्त करितील तरी उतम आहे नाही [तर] छत्रूवर्ग दिवसेदिवस जाडावेल याउपरी धनी सर्वज्ञ आहेत विशष विनंती करावीसी नाही सैदीव कृपा पत्री परामृष सेवकाचा करणार धणी समर्थ आहेत *बहुत काये लिहिणे हे विनती

---

(ले.२६ ) श.१६८५श्राव. शु.५ ] श्री [इ. स. १७६३आगस्ट१३

तीर्थस्वरूप राजश्री आपा वडिलाचे सेवेसी

आपत्ये कालो त्रिंबक [अत्रे] कृतानेक सिर सां नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता। श्रावण शुध ५ शणवार मु। उंबरड नजिक राक्षेसभुवन येथें सुखरूप आसो विशेप वडिलाकडून बहुत दिवस आसीर्वाद पत्र येऊन बालकाचा साभाल होत नाही तेणेकडून चितास समाधान नाहीं तरी सदैव आसीर्वाद पत्री साभाल करीत आसिले पा तेणेकडून चितास संतोष होत जाईल राजकी वर्तमान तरी

* यापुढील मजकूर निराळ्या वळणाचा.

श्रावण सुध पूर्णिमेस मोगल × × श्रीमताचे युधे जाहाले मोगल झाडू (न) + + + (वि) ठल सुंदर व विनायेक दास दोघे मारले (गेले) + + दोघे सरदार आणखीहि याजकडील कामास आले मुरादखान व बाबुराव नगी व आणिखी दोघे चौथे सरदार धरून आणले खडागलाहि कामास आला सदाशिव रामचद्रमान येका घोड्यानिसी गगापार होऊन गेला निज्यामआली व मोगल आली व बाजार बुणगे तो आगोधर उतरले होते दाहा हाजार • फौज व काही गाडदी व दाहा तोफा येसे आलीकडे होते त्यापैकी काही मोगलाचे राहिले नाही सर्व लुटले गेले श्रीमनाकडीलहि माहादजी नाईक निचालकर व आणखी येक दोघे सरदार कामास आले याजकडीलहि मनुश घोडे फार पडले व त्याजकडीलहि फार पडले राजश्री गोविंद बापूस उजवे भुजेवर तरवारीची जखम आहे हालकी आहे माणकोजी कटके याजला च्यार जखमा आहेत आणखीहि पाच साहा आसामी सिलेदार जखमी आहेत वरकड मंडली सर्व गोठ आपला सुखरूप आहे आमचे सिंगीचे उजवे पायाचे गुढगियास बाणाची काठी लागली हालकीच आहे आठा दाहा दिवसी बरी होईल आम्ही व तीर्थस्वरूप रा तात्या व चिरंजीव दाजिबा येसे सेरिरे करून खुशाल आहो आमची काळजी न करणे आम्हीहि पूर्णिमेइतके निरोप घेऊन घरास येतो कलले पा + + + मचे व मोगलाचे युध्य जाहले ...... मागेहि कोठे जाहाले नाहीत पुढेहि न + + + मुख्य श्रीमतास येश भारी आल वरकड वर्तमान मागून कोन्ही येईल त्याजबरोबर तपासिलवार लेहून पाठऊ बहुत काये लिहिणे कृपा लोभ कीजे हे विज्ञापना

चिरंजीव राघोबास व आबास आसीर्वाद रा गोविंद आनत व कृष्णाजीपंत यास नमस्कार मातुश्री आकास सा नमस्कार

---

(लि.२७) श. १६८५ श्रा. शु. १२ ] श्री [ इ. स. १७६३ आगस्ट २०

श्रीमत राजश्री अपा स्वामीचे सेवेसी

पोष्य शामराऊ मोरेस्वर कृतानेक साष्टाग नमस्कार विनती उपरी येथील क्षेम तागायेत श्रावण शुध द्वादसी शनवार मुा पैठण गगा दक्षिणतीर येथे सुखरूप आसो विशेश आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही तर सदैव पत्र पाठऊन सतोशवित गेले पाहिजे यानतर येथील वर्तमान तर श्रावण शुध नितियेचे पत्र पाठविले आहे त्यात मजकूर तपसिलवार वर्तमान लिहिले होते त्याजवरून कलेच आसेल आलीकडील वर्तमान मोगल निजामनआलीखान शहरी आहे त्याचेहि सूत्र सल्याचे मुरादखानाच्या विद्यमाने लागले आहे मुरादखान काल श्रीमंताचा निरोप घेऊन शहरास मोगलाकडे गेला तेथे जाऊन श्रीमंतानी मुदे लेहून दिल्हे आहेत की आलजपूर व शहर औरगाबाद व बेदरचा किला येसे घावे तुम्ही फक्त भागानरी आसावे येसे मुदे मुरादखानापासी सागून मोगलाकडे

रवाना केले आहे तेथून काये जाबसाल येईल हे पाहावे परतु बाजारी वर्तमान यैकतो की मोगल शहर व अलजपूर यैसे देतो बेदर देत नाही यैसे वर्तमान आहे पूर्वी भाऊसाहेबी बासस्टी लक्षाचा मुलूक घेतला होता तो मागती माघार घोडनदीच्या तलावर मोगलाने माघारा घेतला तो माघारा द्यावा याखेरीज लिहिले मुदे याजप्रमाणे द्यावे यैसे वर्तमान आहे फार करून सला होईल मोगलात प्रस्तुत काही त्राण नाही राजश्री गोपालराऊ गोविद व राजश्री मोरोबा फडनिस यास आणावयास मगलवेढ्यास नारो शंकर गेले होते तेहि येथून तीन कोशावर येऊन राहिले आहेत उदईक भेटी होणार येणेप्रमाणें वर्तमान आहे कलावे बहुत काये लिहिणे कृपा लोभ आसो दीजे हे विनती मोगलाचा याचा सला मुरादखानाच्या विद्यमाने न बने तर गंगा उतरून फौजा शहराकडे जातील कलले पा बहुत काय लिहिणे हे विनंती पौ छ १५ सफर

---

## (ले. २८) श. १६८५ आश्वि० शु॥ ५ ] श्री [ इ. स. १७६३ आक्टो. ११

[ शि. रा. रा. ]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ९० सुभानूनाम संवत्सरे अस्वीन शुध पंचमी भोमवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती स्वामी याणी राजश्री सखाराम भगवंत उपनाम बोकील गोत्र जामदग्नी सूत्र अश्वलायन ज्योतिषि व कुलकर्णी मौजे हिवरें ता। कऱ्हेपठार प्रांत पुणे यासी दिल्हे इनामपत्र यैसे जे तुम्ही हुजूर शाहूनगर

[ शि. पे. ] [ शि. प्र. ]

नजिक किले सातारा येथील मुकामी स्वामी सनीध येऊन विनती केली की आमचे आजे गंगाजी येमाजी व महादाजी येमाजी याणी कैलासवासी माहाराज यासमागमे मोगलाईत श्रम साहस फार केले त्यावरून कृपालू होऊन मौजे मजकूर स्वराज्यतर्फेने दरोबस्त कुल बाब व कुल कानू व इनाम तिजाई व हाली पटी व पेस्तर पटी जलतरू तृणकाष्टपाशाण निधि निक्षेप सहीत खेरीज हकदार करून इनाम देऊन पत्रें करून दिल्ही त्याप्रमाणे आपले वडील आनभवीत आले त्या आलीकडे कैलासवासी बालाजी पंडित प्रधान याणी आम्हास मौजे मजकूर पूर्ववतप्रमाणे करार करून मोगलाई आमल नूतन इनाम देऊन पत्रें करून दिल्ही आहेत त्याप्रा। आनभवीत आहो यैसियासी महाराजानी सदरहूप्रमाणे इनाम करार करून हाली नूतन सरदेशमुखी व साबोत्रा व धारकरी व सरपाटीलकी इनाम देऊन राजपत्रें करून देऊन वंशपरंपरेने चालविले पाहिजे म्हणऊन विदित करून पत्रें आणून दाखविली त्यावरून मनास आणून तुम्ही पुरातन राज्यातील येकनिष्ठ सेवक निष्टेनें सेवा करीत आहा तुमचे चालवणे आवश्यक जाणून स्वामी तुम्हावरी कृपालू होऊन तुम्हास कैलासवासी महाराज याणी मौजे मजकूर स्वराज्यतर्फेने दरोबस्त इनाम देखील इनाम तिजाई कुल बाब कुल कानू

हार्ली पटी व पेस्तर पटी जलतरुतृणकाष्ट पाषाणनिधिनिक्षेप सहीत खेरीज हाक-दार व करीम इनामदार करून इनाम दिल्हा आसे व पंडित महारानिले याणी मोगलाई आमल इनाम करून दिल्हा त्याप्रमाणे करार करून हार्ली नूतन सर-देशमुखी व साबोत्रा सरपाटीलकी व धारकरी सर्वमान्य तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वशपरंपरेने इनाम करून दिल्हा आसे तरी तुम्ही मौजे मजकूर चतुःसीमा पूर्व-मर्यादा सदरहू प्रमाणे तुम्ही व तुमचे व वशपरंपरेने इनाम आनभऊन सुखरूप राहाणे जाणिजे लेखनालंकार [ शि. ले. सी. ] रुजू सा सा सा

मत्री समन सरकार तेरीख ४ माहे रावर

सुा अर्बा सितैन मया व अल्फ

बार सुद सुरुसुद बार बार बार बार [ जोडावरील शिक्के ले. सी. ]

---

(ले.२९)श.१६८५आश्वि.शु.५ ] श्री [ इ. स. १७६३ आक्टो.११

[ शि. रा. रा. ]

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ९० सुभानूनाम सवंत्सरे अस्वीन शुध पंचमी भोमवासरे क्षत्रीय कुळावतंस श्री राजाराम छत्रपति स्वामी याणी राजश्री शंकराजी निवाजी व बाजि भगवंत व सखाराम भगवंत उपनाम बोकील गोत्र जामदग्नी [ शि. पे. ] [ शि. ] सूत्र आश्वलायन जोतिषी व कुलकर्णी मौजे हिवरे ता कऱ्हेपठार प्रान पुणे यासी दिल्हे इनामपत्र यैसेजे तुम्ही हुजूर शाहूनगर नजीक किले सातारा येथील मुकामी स्वामीस संनिध येऊन विनंती केली की आपण राज्यातील पुरातन सेवक निष्ठेने सेवा करीत आहो यैसे जाणून कैलासवासी बाळाजी पडित प्रधान याणी मौजे चावली ता मजकूर येथील थल कटक पैकीं जमीन चावर ॥॰ नीम स्वराज्य व मोगलाई येकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व सरदेशमुखी व साबोत्रा कुल्बाब कुल कानू हार्ली पटी व पेस्तर पटी जल तरु तृण काष्ट पाषाण निधी निक्षेप सहीत खेरीज हकदार करून आम्हास वशपरंपरेने इनाम देऊन सदरहू नीम चावर जमिनीचा पैवज मौजे मजकुरीच्या आकारात वाद घालून पत्रे करून दिल्ही त्याप्रमाणे आपण आनभवीत आहो यैसीयासी माहाराजानी सदरहूप्रमाणे इनाम करार करून हार्ली नूतन सरपाटीलकी व धारकरी सर्वमान्य इनाम देऊन भोगव-टीयास राजपत्रे करून देऊन वशपरंपरेने चालविले पाहिजे म्हणऊन विदीत करून पडित महारानिले याची पत्रे आणून दाखविली ती मनास आणून तुम्ही राज्या-तील पुरातन सेवक निष्ठेने सेवा करीत आहा तुमचे चालवणे आवश्यक जाणून स्वामी तुम्हावरी कृपाळु होऊन तुम्हास पंडीत महारानिले याणी मौजे मजकुरी थल कटकपैकी नीम चावर जमीन स्वराज्य व मोगलाई येकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व सरदेशमुखी व साबोत्रा कुल्बाब व कुल कानू हार्ली पटी व पेस्तर पटी जल तरु तृण काष्ट पाषाण निधी निक्षेप सहीत खेरीज हकदार वश-

परंपरेने इनाम दिल्हा आहे त्याप्रमाणे हुजरुन करार करून हालीं नूतन सरपाटीलकी व धारकरी सर्वमान्य तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम दिल्हा आसे तरी तुम्हीं मौजे मजकूरपैकीं सदरहूप्रमाणे नीम चावर जमीन चतुःसीमापूर्वक तुम्ही व तुमचे वंशपरंपरेने इनाम आनभऊन सुखरूप राहाणें जाणिजे लेखनालंकार [ शि. मो. सु. ]

रुजू सां सां सां मंत्री सुमंत सरकार

तेरीख ४ माहे रावर सु॥ अर्बा सितैन मयां व अलफ

वार सुद सुरूसुद बार बार बार बार [ जोडावरील शिक्के ले. शि. ]

---

(ले.३०) श.१६८५आश्वि. शु॥ ५ ]श्री [ इ. स. १७६२ आक्टो. ११
[ रा. रा. शि. ]

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके ९० सुभानूनाम संवत्सरे अश्वीन शुध पंचमी भोमवासरे क्षत्रीय कुलावतंस श्रीराजाराम छत्रपती स्वामी याणी राजश्री सखाराम भगवंत उपनाम चोकील गोत्र जामदग्नी सूत्र आश्वलायन ज्योतिषी व कुळकर्णी मौजे [शि. पे.] [शि. प्र.] हिवरे ता। कऱ्हेपठार प्रांत पुणे यासी दिल्हे इनामपत्र ऐसेजे तुम्ही हुजूर शाहूनगर नजीक किले सातारा येथील मुकामी स्वामीसंनिध येऊन विनंती केली की आपण राज्यांतील पुरातन सेवक वडिलापासोन सेवाश्रम साहास करीत आलों ऐसें जाणून कैलासवासी बालाजी पंडित प्रधान याणी आम्हास मौजे चोपेगांव ता। कऱ्हेपठार प्रांत मजकूर हा गांव स्वराज्य व मोगलाई येकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व चौथाई व सरदेशमुखी व सावोत्रा कुलबाब व कुल कानू हालीं पटी व पेस्तर पटी जल तरू तृण काष्ट पाशाण निधिनिक्षेप सहीत खेरीज हकदार व कदीम इनामदार वंशपरंपरेने इनाम देऊन पत्रें करून दिल्हीं त्याप्रमाणे आपले दुमाला करून घेऊन आनभवीत आहों तरी माहराजानी कृपाळू होऊन सदरहूप्रमाणे इनाम करार करून हालीं नूतन सरपाटीलकी व धारकरी सर्व मान्य इनाम देऊन भोगवटीयास पत्रें करून देऊन वंशपरंपरेने इनाम चालविला पाहिजे म्हणऊन विदित करून पंडित मशारनिले यांचीं पत्रें आणून दाखविलीं त्यावरून मनास आणून तुम्ही पुरातन राज्यातील सेवक स्वामी सेवा निष्ठेने करीत आहां तुमचें चालवणे आवश्यक जाणून स्वामी तुम्हावरी कृपाळू होऊन तुम्हास पंडित मशारनिले यांणी मौजे मजकूर स्वराज्य व मोगलाई येकूण दुतर्फा देखील इनाम तिजाई व चौथाई व सरदेशमुखी व सावोत्रा कुल बाब व कुल कानू हालीं पटी पेस्तर पटी जलतरू तृण काष्टपाशाण निधिनिक्षेप सहीत खेरीज हकदार व कदीम इनामदार वंशपरंपरेने इनाम करून दिल्हा त्याप्रमाणे तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने हुजरून करार करून हालीं नूतन सदरहू इनामास सरपाटीलकी व धारकरी सर्वमान्य इनाम दिल्हा आसेत तरी तुम्ही मौजे मजकूर चतुःसीमा पूर्व

मर्यादा सदरहू प्रमाणे तुम्ही व तुमचे वंशपरंपरेने इनाम आनभऊन सुखरूप राहाणे जाणिजे लेखनालंकार [ शि. ले. सी. ]

रुजू सां सां सां मंत्री सुमंत सरकार

तेरीख ४ माहे साखर सु॥ आर्बा सितैन मया व अलफ

बार सुद सुरसुद बार बार बार बार [ जोडावरील शिक्के ले. सी ]

---

(ले.३१) श.१६८५फाल्गु० वा ११ ] श्री [ इ. स. १७६४मार्च २८

पौ चैत्र वद्य सप्तमी भानुवासर तारणनाम संवत्सरे सु॥ आर्बा मु॥ तुंगभद्रा तीर हवणूर गाव

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पो गोविद सिवराम सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता छ २४ रमजान मु॥ चावडस सुखरूप आसो विशेष आपण लस्करास गेल्या ता पत्र येऊन वर्तमान कलत नाही. तरी सविस्तर वर्तमान लेखन करावे आम्ही फाल्गुण शुद्ध १५ येथे आलो रा मल्हारबा येथे येऊन श्रीमंतास हिंदुस्थानात घेउन जावे यैसे मनसबे करीत होते तो आम्ही येथे आलो त्याउपरी तो मनसबा राहून मल्हारबानी निरोप घेऊन चादवडास गेले आषा नाशकात येऊन राहिले आहेत मल्हारबाचे कारभारात होते येका दो दिवसी दरबारास येत आसतात आम्ही येथे येताच तुमच्या मजकुराची विनंती श्रीमंतास केली त्याणी आज्ञा केली की जो कारभार जाला तो उतम आहे दोघानीहि यैकावे तुमचा सरंजाम सोडतो ताकीदपत्रे घ्यावी तो आबानी आगोदरच सांगून ठेविले होते की मागील पैका सरजामाचा घेतला आहे तो देऊ नये पुढे सरजाम मात्र सोडावा त्याचप्रमाणे श्रीमंतहि म्हणतात त्यास मागील रुपया काही देवित नाहीत पुढे मोकल चिठ्या घेऊन जिकडील तिकडे रवाना कराव्या की कार्य ते लिहिणे त्याप्रा करू वरकड मजकूर श्रीमताचे पत्रावरून कलल श्रीमंताचे पत्र वाचून दाखवून भाषारे घ्यावे आपल्याकडील मजकूर वरचेवर लिहीत जावा आज्ञा कर्तव्य ते करीत जावी नाना तुमचे वियोगे आम्हास दुख आहे तेव्हा तुम्हा किती असल ते ईश्वर जाणे सेवसी शृत होय हे विज्ञापना चिरंजीव राजश्री बजूस आसीर्वाद फार सावध वर्तणुक करीत जाणे हे आसिर्वाद

सेवेसी नारो बापूजी सा॥ नमस्कार लोभ आसो द्यावा हेच खंडोजीबावास आसीर्वाद आपणच तेथे आहेत हे विनंती नारो बापूजी यांचे रामराम

---

(ले.३२) श.१६८६ वैशा. व. १ ] श्री [ इ. स. १७६४ मे १६

॥ राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री
रामचंद्रपंत गोरे स्वामीचे सेवेसी

पो बालाजी जनार्दन तां नमस्कार विनंती उपर येथील कुशल ता छ १४ जिलकाद पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष तुम्ही लिहिलेंत की पुरंधरचा मजकूर काहीच लिहिलात नाही व श्रीमंत राजश्री नारायणरायाजवळ बंदोबस्त असावा व शिंहिगडचा बंदोबस्त करावा म्हणोन कितेक लिहीलत परंतु पावला किंवा नाही पुरंधर जुन्या लोकानी दगा करून घेतला हवालदार वगैरे वरील मारले गेले राजश्री धोंडोबा आपाकडील फारकून विसाजीपंत म्हणून आहे तो कबिलेसुधा वरता गेला मग आम्हास येक चिठी त्याणे पाठविली की श्रीमंताचे आज्ञेवरून घेतला तेव्हा उगीच गडबड कशास करावी यामुळे स्वस्त होतो हे श्रीमंतानी काय समजून केले हैदरनाइकाचा प्रसंग कोण या गोष्टीस दादासाहेबाचें समत आहे किंवा काय हें आम्हा अद्याप समजत नाही आजपावेतो पुण्यात गडबड काहीच नवती पुण्याकडे या गोष्टीचें वारेंहि नाही आम्हास तो काहीच ठावकें नाही परंतु प्रस्तुत आबा येणार हे ऐकिलें त्यावरून पुणे फार गडबडलें आहे आम्ही + + + वाड्याची बलकटी करून आहो परभा (रा ) + + आबा सासवडास गेले तर गुंताच वारला ( कदा ) चित दुर्बुधी करून आधी तर येणार नाहीत ( कदा ) चित आलेच तर वाड्याची बलकटी आहे चिं ( ता ) ( न ) ( क ) रावी आम्हास काहीच समजेनासें जाहाले + + + थील श्रीमंताकडील वर्तमान जे तुम्हास कळलें असेल तें सत्वर इनाम देऊ करून माणूस रवाना करावा आमच्या जोड्या तीन च्यार श्रीमंताकडे गेल्या परंतु येकाहि पत्राचें उतर अद्याप आले नाही याकरतां पत्र पावतांच श्रीमंताचे मर्जीचा प्रकार लौकर लिहून पाठवावा त्या अनुसंधानावर चालू मातुश्रीस याप्रोच विनंती करावी पत्राचें उतर फार लौकर पाठवावें बहूत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंती

---

(ले.३३) श.१६८६वैशा. वा ८ ] श्री [ इ. स. १७६४ मे २३

॥ चिरंजीव राजश्री दादा यास प्रती धोंडो मल्हार असीर्वाद उपरी येथील कुशल ताा छ २१ जिलकाद मुाा केरूर खुर्द येथे सुखरूप आसो विशेष तुम्ही मल्हारी पवार याजबराबर निरोप विसाजी केशव याच्या कर्तव्याचा पाठविला तो सविस्तर पावला येसी आम्ही जर त्याजला पत्र किंवा जबानी सांगितले आसेल की आबाचा किला घेणे तर आम्हास तुमच्या गल्या ( ची ) शफत आसे तुम्ही त्याजकडे विस्वास सहसा न धरणे तुम्हास हरयेक मोहाचा प्रकार लेहून पाठवितील आगर आ ( प ) ण कुकर्म केले याला सामील कोणी + + आसावा या-

पु....४

स्तव तुम्हास लिा तर तुम्ही सहसा ते गोष्टीवर न जाणे मानाजी मोरे तुम्हाजवल आहेत ते जिकडे नेतील तिकडे जाणे का की आबा आविचारी आहे शोध न करिता आन्या [ या ] स प्रवर्तला तर उपाय नाही यास्तव च्यार दिवस हर कोठे कालकर्मणा करणे अखेर सत्यच होईल आम्ही हा कालपरियेत श्रीमतापासी सुखरूप आसो बहूत काये लिा आबाची माणसे कदाचित वाडा घ्यावयास येईल यास्तव तुम्ही सिबदी ठेवाल तर खर्चाखाले मात्र याल होणे काहीच नाही तर वाडा घेतील तर सुखरूप घेऊन कोणी तेथे गोळीदेखील न वाजवणे ते आले म्हणजे वाडा त्याच्या हवाली करणे तुम्ही आपला जीव रक्षणे हा आसीर्वाद

हो राजश्री मानाजी मोरे यासि रामराम लिा परिसीजे मुले तुमचे श्वाधीन केली आहेत याचे सरक्षण करणे तुम्ही पोटापाणियाची काळजी न करणे हे विनती

---

(ले.३४) श.१६८६ज्येष्ठ,शु. ] श्री मार्तंड [ इ. स.१७६४ मे ३१

पौ छ १३ जिल्हेज

तीर्थस्वरूप राजश्री बापू स्वामी वडिलाचे सेवेसी

आपत्ये रामाजी सखाजी सा नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ताा जेष्ट शुध प्रतीपदा मुा सासवड समस्त सुखरूप आसो विशेष आपण पत्र पाठविले ते पावोन वर्तमान सविस्तर कलले युध जालियाचे ही कलले इकडील वर्तमान परस्परे आपणास कल्लेच असेल. वैशाख शुध शष्टीस ( सोमवारी ) किले पुरंधरे कोळीयानी दगा करून घेतला हवालदार सरनोबत कुसाजी कामथे रामचंद्रपंत व त्याचा पुतन्या च्यार असामी ठार जाल्या दाहावीस माणूस ठार जाले व जखमाही लोकास लागल्या नवे लोक खाले घातले जुने कोळी याची समजावीस राघो गगाधर यानी केली आठ रोज तर गेले घर शाकारावयाचे निमित्य करून च्यारसे माणूस गडावर गेले आणि वाघाची पारत निघाली ऐसी वार्जी करून कबरबस्ती करून सदरेवर चालोन आले युध्य फार जाले महिपतराव पातनीस धरून ठेविले राघो गगाधर अत्रे नारायणेचे देवळी होते बायेको वरती होती वस्तभाव सर्व घेऊन गडावर नेली पधरा रोज ठेऊन कोढीतास पाठविली पुरधरे घेतल्यावर पाचवे रोजी रुद्रमाळ घेतली हे वर्तमान नासकी श्रीमंतास कळलियावर राजश्री आबा पुरधरे सासवडास आले बाबा सरनाईक कुटुंबसहवर्तमान गडावर गेले आबाचे बोलावू परिचियास गेले परतु हे गडास गेले गड जे दिवसी घेतला तेच दिवसी विसाजीपंत रा धोंडोबा आपाचे यास गडास नेले त्याचे आज्ञेने सर्व वर्तणूक करितात चौदा खंडया तांदुळ पुरधरास त्यानी दिल्हे व पाच सात खड्या रुद्रमाळेस दिल्हे रोजमरा दुमाही वाटला. किल्ला घेतल्यावर पंधरा रोजानी आमचे घर मोडून सर्व वस्तभाव नेली त्यापैकी बारा हजार रोजमरियास खर्च केले आमचे घरी पलणीमुळे वस्तभाव पैका

लोकाचा होता तो अवघा नेला चौसष्ठ हजार मोजदाद सदरेस नेली पचेवीस हजार बाबा सरनाा यानी नेले बारा हजार वाटणी जाली मोहरा होन रुप्याची भांडी वस्तभाव कापड सर्व लुटले तो अर्थ पत्री कोठवर लिहावा वरील माणुस खाले येत नाही खालील वरते जात नाहीं वेकाजीपंत गडावर आहेत काही निरोप अथवा चिठी येत नाही याप्रमाणें कहार आम्हावर येऊन बनला चांब-ळीस रोखा आला व माणसे आली दरवडे व चोर फार जाले आम्ही सासवडी विठ्ठल शिवदेव याचे घरी येऊन राहिलो वरकड कितेक बारीक मोठे वर्तमान कोठपर्यंत लिहावे श्री मार्तंड भैरव पुढे करील ते खरे देसी मोठा अनर्थ येऊन बनला आहे भोवताले गावी दंगा भारी होऊ लागला च्यारसे माणूस जाऊन कामथडी मारून नेली मसाले घेतात गडावर सतरासे माणूस गणतीस जाले विसाजीपंत कोळी बकारपूर्वक कारभार करितात पत्री विस्तारे काये काये ल्याहावे चिरंजीव बाळा आपणाजवल आले उतम जाले सर्व प्रकारे वडील आपण साभाळ करावा येविसी विस्तारे काये ल्याहावे सिवाजीचे वर्तमानही कलले आपणास वर्तमान कळावे यास्तव सुजरद माणसे सूर्याजी मालजी पाठविले आहेत आगोधर कललेच असेल यावरी बरी गत दिसत नाही सर्व गोष्टी आव-घड येऊन बनल्या आहेत आपली भेट होईल तो सुदीन असे छावणीस न राहवे रात्रीचा दिवस करून लौकर यावे अवध्या मुलकात दणाव जाला आहे सवि-स्तर सेवेसी कळावे यास्तव लिहिले आसे चिरंजीव दादा सुखरूप आहे आवघी विठल सिवदेव याच्या वाड्यात राहिलो आहो श्रीमत परामर्ष करितात विहि-रीचे काम चालत आहे देवलाचे सेवटास गेले जुन्या वाड्यात सोपा घर थोडेसे निवारा केला मला तो पडला आहे. यदा आमच्या शरीराने घालविले यामुले सवसारीक आवघे बुडाले दाणादुणा ध्यावयाची सोये बनली नाही धारण प्रस्तूत पावणेच्यार पायेलीची आहे दाणा घेतला नाहीं तेल तूप दाल तादूल किमपी नाही पुढे देव काये करील पहावे आपणाकडे लखजी आतोजी पाडोबा जिवाजीपंत चौघानी बदोबस्त दाणियाचा वैरणीचा केला आहे आम्ही तीन हजार गवत दोन हजार गवत घेतले दरवाज्याजवल कुडण करून ठेविले ते रात्री मध-रात्री जालले ऐसा दगा चौकडून आम्हास बनला आहे येदा आपण बाहेर घातले सर्व प्रकारे सकटात पडलो आपण ध्यानात मजकूर काये आणिला आह्मा-पासून आतर काये जाले याचा भाव समजला नाही बरे आसो रिणानबद प्रमाण दादाची आनाची क्रिया उजविली भास ( भाक ? ) घेतली तिचे सार्थक केले कुटुबवछल जाणोन सकटात घातले सर्व सकट मार्तंडभैरव स्वामीस आहे येदा घोडी ठेवावयास निवारा व वैरण दाणा याची सोये कसी बनेल सारावश या प्राती दगा जाला पुढे कसे होईल पाहावे सकटे येऊन पडली आहेत आपल्या ध्यानात इकडील मजकूर येकायेकी येणार नाही परतु राजे बुडाले पुरंधर या

उपरी कोणाकडे होईल हे कलत नाही खाले दगा भारी जाला पुढे ही विश्वास गेला वतनदारीची गत हीं पुढे कलतच आहे नारायेण देवली श्रीमतानी मृत्यु जयाचे अनुष्ठानास प्रारभ केला होता तेथे दगा होऊन सर्व जिनस वरता नेला ब्राह्मण पळोन आले सासवडचे बलवनरायाचे गाडे गवतास गेले ते बैल माणसेंसुधा गडकरी यानी दोन गाडे नेले खालसे दोनसे माणुस हिंडते चाबळीस रोखा आमच्या रा मसाला आहे पाटील नेले आहेत कुसाजी कामठे पहले याच्या समाचारास रा हरी गोपाल चाबळीस आले होते येमाजी कामथे यास घेऊन आले दोन वस्त्र श्रीमतानी दिल्हे पाचसात असामी चाकरीस येथे ठेविले श्रीमताची सर्व वस्तभाव कागद देखील गडावर सर्वस्वे बुडाले पुढे देव काये करील पाहावे राघो गगाधर पधरावीस रोज जाले श्रीमत येतीलसे कलताच उठोन गेले कोणी म्हणत जीव दिला कोणी म्हणते गोसावी जाले तूर्त तोंड चुकाविले आहे श्रीमताचे शरीर दोन च्यार रोज ज्वरही येत होता पुढे श्रीमत आलीयावर रग कसा बसेल पाहावे चाबळीस वाड्यामधे दोनच्यार सिपाई रख वालीस ठेऊन आम्ही येथे आलो दरवाजा वाड्यास चाबळीस केला चिरंजीव राघो गगाधर याचा ऐवज नालबदीचा झाडून आला त्यास सागावे घरची आवघी सुखरूप आहेत कुलकर्णी यानी घर थोर चागले बाधले दोन हजारपर्यंत रुपये लागले बलकट चागले बाधले चिरंजीव रावजीची बायेको चिमाबाई प्रसूत आठव्या महिनीयात जाली दोन पुत्र जाले ते गेले तीसही वाखा आहे आज वर्तमान ऐकिले आहे रामभट केले भानगडींत आहेत वेरधारा इकडून तिकडून इकडे करितात पुढे कसे होईल पहावे राजश्री हरी गोपाल येथे आहेत वाड्यातील कामकारभार आबा वाठारकर याजकडे बहूत आहे लोकही काही होत आहे गडावरून रोखा सासवडास आला तेथे पट्टी केली पाच लक्ष बत्तीस हजार रुपये पाठवून देणे व टाणेवाडा रिकामा करून देणे म्हणून लिहिले आहे व चाबळीस रोखा आला कीं कामथा मारिला याचा दावा तुम्ही सागता तरी तुम्हास तलब आहे हुजास येणे नाही तरी स्वारी पाठऊन गाव मारला जाईल बेड्या घालो डोचके मारू ऐसा दबावण रोखा आला आहे गावकरी जागतात रानी स्वारी येईल म्हणोन भितात असवळीकर हवाल्दाराची बायको सती निघाली राजश्री आबानी येथें आलियावर हजार बारासे आख व तीनशें रुपये खर्चास दिल्हे सविस्तर आपणास वर्तमान कलाव यस्तव लिहिले आहे बहुत काये लिहिणे कृपा लोभ आसो दिल्हे पाहिजे हे विनंति दोघे माणसे पाठविली चिरंजिवाजवळ माणसे नाहीत त्या दोघास ठेऊन घ्यावे जिवाभाचा परामर्प घ्यावा चिरंजीव राजश्री राघोबा नाना बळवतराव व चिमणाजी आपा यासि आसीर्वाद तुमी पत्रे पाठविली ती पावोन सर्व वर्तमान कलले तुम्ही तीर्थरूपाची मर्जी राखून त्यांचे आज्ञेत राहावे वर्तणुक करीत जावी सर्व आमचे

दैवत तीर्थरूप आहेत ते ज्याप्रमाणें आज्ञा करतील त्याप्रमाणें असणे जित्रावाची अबाल न करावी हे आसीर्वाद

---

( ले.३५ ) १६८६ वैशाख. ] श्री [ इ. स. १७६४ मे

राजश्री रुद्रापा देवकते गोसांवी यासी

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री विसाजी केशव आसीर्वाद विनंती उपरी तुम्हाकडे मुख्यांची निकड दिसती यास्तव तुम्ही श्रीमंताजवल जाऊन राहावें च्यार दिवस शह टलला म्हणजे लौकर यावें बहुत काये लिहिणे लोभ असो द्यावा हे विनती

---

( ले.३६ ) श. १६८६ वैशाख. ] श्री [ इ. स. १७६४ मे

राजश्री रुद्राजी देवकते व राघोजी कोकरे व बहिरोपंत गोसांवी यासी

श्री विसाजी केशव आसीर्वाद विनती उपरी आपण पत्र पा ते पावले लिहिले वर्तमान सविस्तर कलले हिकडे चाकरीस आले म्हणजे तिघांची घरे बुडतात तरी तिघांची घरे बुडाली मग आम्हास काये बरे तर आमची नालबंदी आणून पावती करावी आणिक मातबर भले लोक येतात त्यांस देऊ तुम्ही पेंचांत न पडावे रा सदासिवपंती आपणाकडे मागितले जा म्हणाल जिकडे जाऊं हा दुसरा भाव लिहिला तर घरें बुडाली असे पतकरून जाणें तर जावें आठ च्यार दिवस शह टले तोंपरियेतं तेथें राहावें शह टालून यावें कठीणसें भासलें तर पेंचात पडो नये बहुत काये लिहिणें आमच्या राज्यांतील लोक मोगलाजवल बहुत चाकर राहिले त्यांची घरें पेशव्यानी लुटिलीं नाहीत आणि गडाकडे राहिले यांचीच घरें लुटितात तर मग उपाय काये हे विनती

---

( ले.३७ ) श. १६८६ ज्ये. व॥ ११ ] श्री [ इ. स. १७६४ जून २४

* राजश्री वासुदेवपंत स्वामी गोसावी यासी

विनती उपरी राजश्री विसोबानी कारभार केला याजमुल श्रीमतानी चितो आनत कारकून आमची गावे वतने घरे जत करावी म्हणून पाठविली आहेत हे वर्तमान तुम्हास कलावे म्हणून लिा असे वरकड बिशाद आहे नाही हे कलेच आहे परतु दाणादुणा आहे मोढावियातील तर तुम्ही खर्चवेच केलाच आसेल वांगजेस आहे त्यास उपाय नाही कागदपत्र हिशेबाचा रुमाल जे आसतील ते बोभाट न होता मोरगावास ठेवणे कारकून येतील त्याचा हवाला वाडा करणे घोडी मात्र तेथून पलवणे गुरे आहेत

* पत्र धोंडोबा आप्पाचें

ती तेथेच आसो देणे जे राहातील ती राहातील ईश्वरी सतेस उपाय नाही तुम्ही त्याचे हाती न लागणे इनामेहि जत करितील तेव्हा गराडे राजेवाडी हेहि जत होतील तर कोणास न कलता नारोना ठाकरास वर्तमान आधी आधी पावते करणे म्हणजे तोहि निघोन जाईल बहुत काये लिहिणे हे विनती रा छ २२ जिल्हेज ज्येष्ठ वद्य ११ रविवार

---

(ले.३८) श.१६८६आषाढ.] श्री [इ. स. १७६४ जुलै

* चिरंजीव राजश्री बजाजी यासी प्रती त्रिंबक सदासिव आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीणे विशेष तुम्ही वरास कोणे दिवसी पावला वाटेने नद्यास पाणी कोण कोणत्या होते वाठार इंदोली येथे गेला होता की काय घोडी कोठे सारी ठेविलीत सासवडास कोण कोणती नेली हे तपसीलवार वर्तमान लिहिणे + + + हतीचे निगा फार करवणे कडवल कोणे कोणे जागा जाहाले असेल घोडयास हतीस लावणे सासवडी गडबड असली तर मातुश्रीसह तुम्ही पुण्यास जाऊन राहणे पचवीस माणूस नाना फडणीसाजवळून पेशजी श्रीमतानी देविले होते ते मागून घेऊन चौकी पाहरा खबरदारीने राहावे पुण्यास जाऊन सा च्यार महिने राहावे असे तेथे जाहाले असले तरी मग सासवडी फारसा खर्च ठेऊ नये पुण्यातच सारे येके जागा खर्च वोढावासासवडी येखादा ब्राह्मण पाच सात कुणबिणी चौकीस माणसे ठेऊन वरकड सारियानी पुण्यास जावे जसे ठीक दिसेल तसे करणे श्रावणमासी घरी लिगाचे आनुष्ठान व श्रीच्या प्रदक्षणेचे जेजोरीस आनुष्ठान वर्षाप्रमाणे करणे आषाढ शुध दशमीपासून आमच्या पंच्यायेत्नाची पूजा दुधाचा आभिषेक नामावली बेल तुलसी अक्षता ही पूजा तुम्ही नित्य प्रात.काली श्नानसंध्या करून पुना वरीत जाणे अतर पडो न देणे तिकडे प्रजन्य कसा पडला सिरवलचे कुरणात गवत काही जाहाले की नाही राणद + + + पाऊस कसा जाहाला हे लिहिणे पुरदरेकडील काये काये वर्तमान ते लिहिणे तुम्ही बहूत सावध राहणे कोणाच्या कजियात राजकारणा (त) न पडणे नाहक बदलामीचे कारण होईल पुण्यास गेलीयावर तेथील वर्तमान सविस्तर लिहिणे श्रीमत दादा मातुश्रीबाई पुण्यास येणार किंवा तिकडेच राहणार हे वर्तमान पुण्यात गेलियावर ठीक कलले तैसे लिहिणे येथून स्मरणार्थ याद लिहून दिल्ही त्याप्रो करणे (मो)-रोबाकडील बावाजीपनाकडील यैवज किती आला त लिहिणे हे आसिर्वाद

---

(ले. ३९) श.१६८६भाद्र०शु॥ ३]श्री[नकल इ. स. १७६४,आगष्ट.३०

सिका

कौल सरकार राजश्री रघुनाथ बाजीराव ता। समस्त किलेकरी किले पुरदर व वज्रगड सुहूरसन खमस सितैन मया व अलफ तुम्ही विनतीपत्र पा। ते पोहोंचोन

लिा मजकूर विदित जाला ज्या गोष्टी न म्हणाव्या तुम्ही कबूल न कराव्या त्या गोष्टीचे इमान तुम्हाजवल राजश्री आबा पुरंदरे मागूं लागले तुम्ही कबूल न केले म्हणौन तुम्हासी आकस करून तुम्हास खालीं घालविलें व दुसरे लोक किल्यावर चढविले तेव्हा कलेल तसे करून तुम्हास जागा हस्तगत करणे जरूर जाली म्हणोन तुम्ही केली त्यामुले खूनखराब्या जाल्या व बगर हुकूम कितेक वर्तणुका घडल्या त्यास तुम्ही सरकारचे पहिल्यापासून येकनिष्ठ इमानी व पुढें आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणार हे जाणौन तुम्हावर कृपा करून सर्व केल्या गोष्टी तुम्हास माफ केल्या आसेत व तुमचे आर्जाप्रा किले मारहि कोणाकडे न देता हुजूरच ठेऊन तुमचेच हाते सेवा घेतली जाईल बेवसवसा वर्तणूक करणे जाणिजे छ २ रबिलावल मोर्तबसुद

---

(ले. ४०) श. १६८६ मार्ग. शु॥ २] श्री [इ. स. १७६४ नोहें० २५

असल बा॥ नकल

सिका

आज्ञापत्र समस्त काजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री माधवराव पंडित प्रधान ताहा मोकदम मौजे कोन्हाटे प्रो दिडोर सरकार संगमनेर सुा खमस सितैन मयां व आल्फ १६८६ तारणनाम सवछरे राजश्री आपाजी हरी उपनाम विंझे गोत्र वासिष्ट सूत्र आश्वलायन याणी हुजूर कसबे पैठण येथील मुकामी येऊन विनंती केली की आपण कुटूंबवछल बहूत दिवस श्रम साहास करून सेवा येकनिष्टपणें केली कुटुंबाचा कालक्षेम चालिला पाहिजे त्यास श्वामीनी कृपालू होऊन नूतन येक गाव इनाम करार करून देऊन चालविला पाहिजे म्हणोन त्याजवरून मनास आणिता हे पदरचे येकनिष्ट सेवा येकनिष्टपणें केली त्याजवरून याचे चालवणे आवश्यक जाणोन यावर कृपालू होऊन मौजे मजकूर हा गाव स्वराज्य व मोगलाई येकूण दुतर्फा देखील बाबती सरदेसमुखी खेरीज मोकासी दरोबस्त आमल कुलबाब कुल कानु खेरीज हकदार व इनामदार करून हाली पटी व पेस्तर पटी जल तृण काष्टपाषाण निधी निक्षेप सहित नूतन इनाम यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें करार करून दिल्हा आसे तरी याजकडे रुजू होऊन मौजे मजकूरचा आमल साल दर साल वसूल सुरलीत देत जाणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें या पत्राची पत्नी लेहून घेऊन हे पत्न भोगवटीयास मशारनिल्हे जवल परतोन देणें जाणिजे छ १ जमादिलाखर आज्ञाप्रमाण मोर्तब बार

---

(ले. ४१)श. १७२६ आश्वि. वा। ६] श्री [इ.स. १८०४ आक्टो० २४

राजमान्य राजश्री मोरो गंगाधर दि।
खंडेराव निलकंठ गोसावी यांसी

सेवक बाजिराव रघुनाथ प्रधान नमस्कार सु॥ खमस मयांतैन व अल्फ मौजे कोराटे पो दिंडोरी हा गाव बाजिराव आपाजी यांजकडे इनाम आहे त्यास उपद्रव बहूत लागतो म्हणोन विदित जाहाले त्याजवरून हे पत्र सादर केले असे तरी मौजे मार हा गांव मारनिलेकडे पेशजीपासून इनाम चालत आहे त्याजप्रो चालवणे तुम्हाकडून वगैरे हरयेकविसी उपसर्ग लागो न देणें जाणिजे छ १९ रजब आज्ञा प्रमाण ( लेखन । सीमा )

---

(ले. ४२) श. १६८३ पौष वा। २०] श्री [इ.स. १७६५ जाने० २१

*पु॥ चिरंजीव राजश्री दादाम आसीर्वाद उपरी इकडील वर्तमान तर पौष वद्य आमावाशाचे रविवारी युध्य जाहाले तिकडील इकडील लोक पडले परतु आपली मडली सर्व सुखरूप आहेत श्रीमत आद्याप पैठणावरच आहेत मोगल या रोखे तीन कोस फिरला पुढे काय होईल ते लेहुन पाठवणे सारांष सातारिया-कडील राजिक म्हणजे घरचा उदीर त्याजला बहूत जपणे आवश्यक आहे [ पुढील एक ओळ फाटली. ] सणे न ई पलीकडील वाडियाची मित + + लौकर जाहलियाने या राजिकाचा पेच पडणार नाहीं व मौजे मोढवे येथील *वाडियातहि दारूगोलीचा सग्रह करून ठेवणे होनाजी मोऱ्यास सागून तेथील* खबरदारी करणे तुम्हीहि आपणाजवळ दारू गोली ठेवणे वरचेवर वर्तमान आपणाकडील लेहून पाठवणे हे पत्र कोणास न दाखवणे हे आसिर्वाद

---

(ले. ४३ ) श. १६८५ माघ वा।] श्री [इ. १७६५ फे. १८

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री राजाराम गोविंद गो।

सेवक रघुनाथ बाजिराव नमस्कार सु॥ खमस सितैन मया व अल्फ चिरंजीव राजश्री त्रिंबक सदासिव व कृष्णराव बलवंत व रा। रामचंद्र गणेश यांचे बाग सासवडास आहेत तेथें तुम्हाकडील लोक उतरोन झाडास उपद्रव करितात म्हणून हुजूर विदित जाहाले ऐसियास हे गोष्टी कार्याची नसे याउपरी आपलेकडील लोकास ताकीद यथेस्तजेने करून बागात न राहत झाडास वगैरे उपसर्ग न करीत ते करणें येविसी बोभाट आलिया कार्यास येणार नाही आहे

---

१. ४० व ४१ हे दोन लेखांक पंचवटींतील डॉ. खाडिलकर यांच्या संग्रहांतील आहेत.

* पत्र धोंडोबा आपाचें.

न तोडीत व निंब वगैरे व कुपण न तोडीत यैसी ताकीद करणे जाणिजे छ २७ साबान आज्ञाप्रमाण सासवडास बाग मले व लावणीची झाडें फार आहेत तरी येकंदर बाव मलियास व लावणीचे झाडास उपद्रव न देणे जाणिजे छ मार [ ले. सि. शि. ]

---

(ले. ४४)श. १६८६ अश्विन शु ॥ ] श्री [ इ. स. १७६४ सप २१
[ शि. मा. ब. ]

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता। मोकदम मौजे चावली ता। करेपठार प्रांत पुणे सुा सीत सितैन मया व अलफ मौजे मजकूर हा गांव किले वज्रगड येथील सरंजामाचे बेगमीस रा। सखाराम भगवंत यांजकडे दिल्हा होता त्यास हाली मा।रनिल्हेकडून किला दूर करून सरकारात ठेऊन रा। रामचद्र त्रिंबक यास बदोबस्त सांगितला असे व किल्याचे सरंजामाचें बेगमीस मौजे मजकूर पेसजीप्रमाणे करार करून देऊन हे आज्ञापत्र सादर केले असे तरी मा।रनिलेसी रुजू होऊन मौजे मजकुराचा अमल सुरलीत देणें ✻ जाणिजे छ ३ राखर आज्ञाप्रमाण ( लेखन सिमा )

---

(ले.४५) श. १६८७ आश्वि. वा।७ ] श्री [ इ. स. १७६५ ऑक्टो० ६
[ शि. मा. ब ]

अभयेपत्र राजश्री पंत प्रधान ता। मोकदम व रयात मौजे राक का। सासवड सुा सीत सितैन मया व अलफ तुम्ही पुरंधरच्या दंगियामुले परागंदा जाला म्हणून हुजूर विदीत जाले ऐशियास मौजे मा।र दरोबस्त चिरजीव राजश्री त्रिंबक सदासिव याजकडे आहे सबब गावचे आबादीवर वडिलाचे नाबरीवरी नजर देऊन हे अभये पत्र सादर केले ( आहे ) तरी तुम्ही बेवसवास गावचें गावी येऊन कीर्दी + + + करून सुखरूप राहाणे पुरधरचा वगैरे उपसर्ग लागणार नाहीं अभये असे जाणिजे छ २० राखर आज्ञा प्रमाण [ ले. सी. शि. ]

---

(ले.४६)श.१६८७ आश्वि. व॥ ७]श्री शंकर[इ. स. १७६५ ऑक्टो० ६

यादी वाटणी संकराजी निंबाजी व बाजी भगवंत व सखाराम भगवंत बोकील येकवट होते ते निराले निघाले त्याची वाटणी सुा सीत सितैन मया व अलफ शके १६८७ पार्थिव नाम संवछरे आस्वीन वद्य ७ सप्तमी सन हजार ११७५

---

× येथून अक्षर निराळें.

शके १६८५ सुभान नाम संवछरी कार्तीक शुध १० दशमीस विभक्त जाले ते समई वाटणी जाली.

इनाम गाव

१ पुरातन गाव मौजे हिवरे ता। करेपठार प्रां पुणें पैकी मोकासी बाब चौथाईचा हिसा निमे गिरमाजी मल्हार याचा देऊन बाकी जागीर व बाबती व सरदेशमुखीचा ऐवज तिघाजणानी ती ठाई यथा विभागे वाटून ध्यावा.

३ नूतन इनाम गाव

१ मौजे बोपगाव ता।। करेपठार प्रा पुणें दरोबस्त

२ मौजे थिवरी व नादूर प्रा

३ सेवगाव

४

घरातील नक्त ऐवज व सोने रुपे व सोनेरुपियाचे डागिने आवघे येकत्र करून तिघा जणानी ती ठाई वाटून घेनले परस्परे गुंता राहिला नाहीं कलम १

बायका मुलें व सुना त्याजवर जी वस्तभाव होती ते जिकडील तिकडे स्वसंतोशे घेतली परस्परे कोणाकडे आधीक उण्याचा गुंता राहिला नाहीं. कलम १

ऐकूण देह च्यार येथील जो आकार होईल त्यापैकी समाईक कारकून त्रिवर्गानी ठेवावा त्याचा मुशाहिरा वजा होऊन बाकी ऐवज राहील तो त्रिवर्गानी ती ठिकाणी वाटून घेत जावा कलम १

दो सेन्या हिवरे व बोपगाव ती जागा वाटून घ्याव्या उत्पन्न विठल सिवदेव याजकडील दिवाणागिरी दिवाणगिरीचा सरजाम व नारोला(?) कारकुनी बाजी भगवंत याजकडे चालत आहे त्याप्रमाणे आनभवीत जावे. कलम १

धोंडो दत्तात्रये याजकडील मजमू व मजमूचा सरंजाम व फाकड्याकडील कारकुनी संकराजी निंबाजी यानी घ्यावें त्याप्रमाणे त्याजकडे चालत आहे त्याप्रमाणें पुढें आनभवीत जावे कलम १

श्रीमत राजश्री पंतप्रधान याजकडील जातीचा सरंजाम व फौजेचा सरंजाम सखाराम भगवंत याजकडे आहे त्याप्रमाणें त्यानी अनभवावे कलम १

सदरहू कलमे साहा याचा फडशा विभक्त जाले तेव्हाच जाला परस्परे लढा राहिला नाहीं.

**विभक्त जाले ते समई समाईक कलमे**
**राहिली होती त्याची वाटणी हाली जाली आसे**

रथ सुमार ३

ता।

१ शकराजी निंबाजी याकडे बा।

भगवंतराव

१ बाजी भगवंत याकडे बा। मुऱ्हारपंत

१ सखाराम भगवंत याकडे

मोडका लुटीचा

सदरहू तीन रथ तिघानी घेतले

कलम १

गाडे व छकडे

२ छकडे

४ गाडे

२ कदीम

२ जदीद

४

६

तपशील

१ तात्याकडे गाडा नवा

१ दादाकडे नवा गाडा

४ बापूकडे

२ गाडे तात्या व दादा याजकडे नवे दिल्हे सबब दोन

२ रथ दादा तात्याकडे चांगले दिल्हे सबब रथाचे ऐवजी छकडे दिल्हे

४

६

सदरहू प्रमाणें तिघानी घ्यावें घेतलें

कलम १

पुस्तकें

२ तात्याकडे

१ भागवत बारास्कंद

१ विष्णुपुराण

२ बापूकडे

१ मयूख बारा

१ मच्छेपुराण

२ दादाकडे

१ भारत पर्वें अठरा

१ गीतगोविंद

२

६

सदर प्रा। सा। पुस्तके तिघाजणी वाटून घेतली.

**गालीचे व सतरंज्या**

३ गालीचे

२ नवे

१ जुना

३

१ सत्रंजी

४

ता।

१ तात्याकडे गालीचा नव्या पैकीं येक

१ बापूकडे गालीचा नवा

२ दादाकडे

१ गालीचा जुना

१ सत्रंजी जुना गालीचा दिला सबब दिल्ही

२

४

समाईक येक ऱ्या खतापैकी वसूल
१०३५ विा तात्या
९४० ऐन
९५ जिनगराबाबत
१७०६ विा बापू
१५७५ ऐन
१३१ जिनगराबा

२७४१
पैकी वजा समाईक खरेदी जीन
९५ विा तात्या
१३१ विा बापू
बाकी

रुपये
२५१५

ता
८३८।-। तात्या ९४० पैकी
८३८।-। बापू १५७५ पो
८३८।-॥ सक्रोबा
१०१॥=॥ तात्यानी दिल्हे
७३६॥=॥। बापूनी दिल्हे
८३८।-॥

२५१५

सदरहू पंचवीससे पंधरा रुपये तिघानी वाटून घेतले कलम १

कोठीचे बैल तिघाजणांनी ती ठाई वाटून घेतले कलम १

गाई गुरे म्हशी व वासरे तिघाजणांनी ती ठाई वाटून घेतली कलम १

सदरहू वाटणी मा हरी गोविंद जाली आसे.

सदरहूप्रमाणे तिघानी वाटून घेतले कलम १

जाजमे व रुजामे व लोडे व तकिये येथा विभागे वाटून घेतले कलम १

खते बापूजवळ आहेत त्याचा वसूल होईल तो तिघानी घ्यावा ज्या समई ज्यास जे खत लागेल ते घेऊन वसूल करावा.

५२७३॥ नखतीची खते बाा याद आलाहिदा आसे

४॥।२।२ गल्याची खते १८ गला वाा यादी

सदरहू नखत ऐवज व गला वसूल होईल तो तिघानी ती ठाई वाटून घेत जावा वसूल बापूनी करावा. कलम १

वसूल तिघानी करावा खते तात्यापाशी ठेविली आसेत भाडी ताब्याची व पितली व लोखंडी डागिने मांडयाचा तपशील.

१ सासवडी भांडी तात्याकडे होती ती तात्यानी व संकरोबानी वाटून घेतली निमेनीम.

१ हिवऱ्यात व स्वारी बराबर भांडी होती व गडावर होती ती बापूकडे गडी भाडी होती ती गेली आहेत. आली तर बापूनी घ्यावी.

१ पाणी तावावयाची कढई बापूस दिल्ही

१ गुळाची काईल तात्या व दादाकडे दिल्ही.

सदरहूप्रमाणे भांडयाची वाटणी जाली परस्परे गुंता राहिला नाही.

कलम १

रथाचे बैल सर ७
२ मुरारपंता बाा तात्याकडे
२ भगवंतराया बाा बापूकडे
३ सक्रोबाकडे
  २ धाकटे बैल
  १ पानशा बाबत
  ३
७

सदरहूप्रमाणें सात बैल तिघानी वाटून घेतलें कलम १

इनामे व मिरासीची सेते व विहीरी देखील आंबराई याचे वाटणीची यादी आलाहिदा आहे त्याप्रमाणें त्रिवर्गांनी येथा विभागे आनभवावी कलम १

घोडी याचे वाटणीचा जाबता आलाहिदा आसे घोडी यो किमत रुपये

| | | |
|---|---|---|
| २७२१५ | माद्या | ६१ |
| ५००५ | नर | २५ |
| ८०९ | तटे यादी | ३४ |
| ५३० | खचरे | ६ |
| ३३५५९ | | १२६ |

यांसि वाटण्या ३

११०३८ सकरोबा ३९

| | | |
|---|---|---|
| ९३३० | माद्या | १९ |
| १२९० | नर | ८ |
| २१८ | तटे | १० |
| २०० | खचरे | २ |
| ११०३८ | | ३९ |

११४५८ बाजीपंत ४८

| | | |
|---|---|---|
| ८४६० | माद्या | २१ |
| २५१५ | नर | १० |
| ३६३ | तटे | १५ |
| १२० | खचरे | २ |
| | | ४८ |

जिनस खानापैकीं लगाम लाहुरी व सुरवारी हिरडे व विणें वाटून घेतले लाहूरी हिरडे कलम १

कुणविणी
११ बापूकडे होत्या १३ पैकीं वजा
  १ गुणी म्हातारी
  १ मयेत
  २
  बाकी
१६ तात्याकडे सासवडात होत्या २२ वजा
  २ पळाल्या
  १ मयेत
  ३ नव्या खेरदी
    २ दादाकडे
    १ तात्याकडे
  ६ ३ बाकी
२७ ताा
९ तात्याकडे
  ८ सासवड पैकीं
  १ बापू पैकीं
  ९
९ बापूकडे ११ पैकीं
९ सक्रोबाकडे
  ८ तात्यापैकीं
  १ बापू पैकीं
२७ ९

सदरहू प्रमाणें घेतल्या कलम १

घरें व वाडे
१ मौजे हिवरे येथील वाडा ती ठाई व वाड्यापुढील बखळ देखील ती ठाई वाटून घेतली आसे बखळ खेरेदीची वाडग्याच्या सुमारें बरोबरी

| | |
|---|---|
| १२७०१ सखारामपंत | ३९ |
| ११०६३ माधा | २१ |
| १२०० नर | ७ |
| २१० खचरे | २ |
| २२८ तटे | ९ |
| | ३९ |
| ३३५५९ | १२६ |

सदरहूप्रमाणें फडशा जाला आसे

१ पुरदरचे माचीचे घर तिघानी घ्यावे
३ कसबे सासवड येथील
१ नवा वाडा पागेचा ती ठाई वाटून घेतला
२ जुने वाडे त्यामध्यें इमारतीची घरे आहेत ती तिघानी वाटून घ्यावी
ता।
१ बाळोबा पाटील
१ विठल सिवदेव याचे सेजारी

३
१ मौजे चावली येथील मिरासीचा वाडा तीठाई वाटून घ्यावा

६
नवे वाडे मेळविले ते ज्याचे त्याकडे
सदरहूचा फडशा जाला आसे उटे व हत्यारे व किरकोळ जिनस घरातील सर्व ती ठाई वाटून घेऊन फडसा जाला आसे कलमे २
तेरीज येकंदर कलमे
६ विभक्त जाले ते समई फडशा जाला
१७ हाली फडशा जाला आसे

२३

येकूण कलमे तेवीस याचा फडशा येकवटपणाचा सर्व ती ठाई करून जाला आसे परस्परे काही लढा राहिला नाही याउपर येकत्रपणचा कोणे गोष्टीविसी आर्थाआर्थी समंध राहिला नाहीं येकत्रपणी विठल कृष्ण वगैरे याचे कर्ज देणे होते ते औघ्याचे फारीक जाले आसे छ २२ जमादिलोवल दस्तूर बगाजी गोपाल देशपांडिये प्रा पुणें

सही संकराजी नियाजी — सही बाजी भगवत

गोही — सही सखाराम भगवंत

कासी रामचद्र देशपांडे ता खेडेबारे

(ले. ४७)श. १६८७ कार्ति० वा ८] श्री [इ. स. १७६५ नोव्हें० ११

नकल

सिका

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता मोकदम मौजे चांचळी ता करेपठार प्रां पुणे सुा सीत सितैन मया व अलफ मौजे मजकूरचा अमल किले पुरधरचे सरंजामास दिल्हा होता तो त्याकडून दूर करून राजश्री सखाराम भगवंत याजकडे दिल्हा असे तरी मारनिलेकडील कमावीसदारासी रुजू होऊन मौजे मजकूरचा आमल वसूल सुरलीत देणे जाणिजे छ २१ जमादिलोवर आज्ञाप्रमाण मोर्तब

---

(ले.४८)श. १६८७ मार्ग. वा। १४ ] श्री [ इ.स. १७६५ दिसें० ११

[ मा. व. शिक्का ]

आभयपत्र राजश्री पंत प्रधान ता गोंदजी कामथा मौजे खलद ता करेपठार सुा सीत सितैन मया व आल्फ तुवा पुरधरच्या दंग्यात गडाकडे चाकरीस होतास सबब हाली गावी राहावयास वसवास धरितोस म्हणून हुजूर विदित जाले त्याजवरून तुजला गावचे गावी राहावयाचा हुकूम करून हे अभयेपत्र सादर केले असे तरी मुले–माणसेसुधा गावचे गावी सुखरूप त्रेवसवास राहाणे उपसर्ग लागणार नाही अभये असे जाणिजे छ २७ जाखर [ ले. सी. शि. ]

---

(ले.४९)श. १६८७ माघ. शु॥ १४]श्रीशंकर[इ.स. १७६६जाने. २४

सहश्राये चिरंजीव रा राघोबास प्रती वहिरो अनंत आसिर्वाद उपरी येथील क्षेम ता माघ शुध १४ मुा झरकोन जाणून येथास्थित असे विशेष तुम्ही गेल्यातागाईत काही वर्तमान कलत नाही तरी ऐसे न करणे सदैव पत्र पाठऊन तोषवीत आसिले पाहिजे इकडील वर्तमान तरी श्रीमंताबराबर रा विठलपंत तात्या व आम्हीही खिचीवाडयापर्यंत आलो आहो येथून विठलपंत तात्या श्रीमंतापासी निरोप मागून माघारे ग्वालीयरीस गेले आम्हीही येका दो दिवसानी येथून आज्ञा घेऊन ग्वालेरीस जाऊ श्रीमंताची फौज झरकोनच्या किल्यास लागली आहे मोरचे बसले तोफा लागल्या आहेत सत्वरच हस्तगत होईल तुम्ही आम्हापासून गेल्यास ठाण्यात कितीका दिवसानी पावला ते लिहिणे वसूल वमूल कैसा काय चालतो ते लिहिणे सावणदरारीया वगैरे गावविसी चिंतोपताचे पत्र पा होते तें पावले किंवा नाही जागा हस्तगत जाली किंवा नाही साद्यंत लिा पा येकूणिससें रुपयाच्या हुडया अद्याप न आल्या तरी सत्वर पा

---

## (ले. ५०) श. १६८७ माघ वा ५ ] श्री [ इ. स. १७६६ जाने. ३१

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री मालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसि पोष्ये माधवराव बल्लाल प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष का सासवडास कुसू घालावे लागते त्यास का मजकुरी वस्तीस घरे वाडे आहेत त्याची मोजणी करून वाडे घराचे बरहुकूम वरगणी ज्याची त्याजवरी घालून कुसू आठ हात उंची व तीन हात रुंदी याप्रमाणे मातीचे तेथील कादार बगाजी साबाजी यास व गावकरी यास ताकीद करून सरकारचा कारकून व ढलाईत देऊन घालवणे गावात नादार कुले असतील त्यास कुसाची वरगणी न घालणे जाणिजे छ १९ साबान सुा सीत सितैन मया आलफ बहुत काय लिहिणे* हे विनंती

---

## (ले ५१) श. १६८७ फाल्गु. शु. १२ ] श्री [ इ. स. १७६५ फेब्रु. २०

*आसिर्वाद उपरी जेव्हा कोठे कामकाजास झुंजाचे मोर्च्यांचे श्रीमंत पाठवीत जातील तेव्हा श्रीमार्तंडाचे स्मरण करून भडार कपाली लाऊन पागोट्यात भंडाराची पिशवी लाहानसी करून ठेवीत जावी भंडाराचे विस्मरण तिलमात्र करू नका तोच सर्व विघ्ने निवारण करणार आहे हे पत्र कोणास न दाखवणे हे आसिर्वाद
पौ छ १० रमजान सन सबा माहादू भोसल्याबराबर

---

## (ले.५२) श. १६८७ पौष वा २ ] श्री [ इ. स. १७६६ दिजं० २९

[ शि. मा. व. ]

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ता समस्त कोली पुरधरकर सुा सीत सितैन मया व अलफ तुम्ही चवणेश्वरच्या डोंगरावर जमा होऊन त्या प्रातात उपद्रव करिता म्हणून हुजुर विदित जाले ऐशियास हे गोष्ट कार्याची नाहीं तर हली हे आज्ञापत्र सादर केले आसे तर याउपरी प्रातात उपसर्ग न करणे येविसी फिरोन चोभाट.........णार नाहीं पारपत्य...... हुजरून प्यादे रा केले असत तरी सदर .....करणे जाणिजे छ १६ रजब आज्ञाप्रमाण [ ले. सी. शि. ]

---

१ पत्र नाना पुरंदऱ्यांचें मजाबास.

(ले. ५३) श्री इ. स. १७६८

राजमान्य राजश्री रामाजी शामराव दिा शाहाजी भोंसले गोा यासी

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार सुा समान सितैन मया व आलफ रा संकराजी निंबाजी याजकडे राजश्री शाहाजी भोसले याचे तर्फेन मोकासे पो कडें रजणगाव पो देह विा

१ मौजे निंबगाव खळी

१ मौजे कोहकडी

१ मौजे विसापूर

१ मौजे राये गव्हाण

येकूण देह च्यार पेसजीपासोन आहेत त्यास तुम्ही खलेल करितां म्हणून हुजूर विदित जाले त्याजवरून हे पत्र सादर केले आहे तरी मानिलेकडे गाव सुदामत चालत आहेत त्या प्राा चालू देणे नवीन गैरवाजवी दिकत न करणे भोसले याचे पत्राप्राा चालवणे जाणिजे छ २८ जमादिलोवल आज्ञाप्रमाण (लेखन सीमा)

---

(ले. ५४)श. १६८६माघ व.४]श्री सांव:स पुत्रोज[इ. स.१७६५फे.१२

आसीर्वाद उपरी राजश्री भवानराव प्रतिनिधी काल सोमवारी निरोप घेऊन गेले परंतु आज मंगलवारी येथेच आहेत आद्यापी लस्करातून गेले नाहीत यास्तव तुम्ही उद्या मुकाम कराल तरी न करणे कूच करून जेजुरीस जाणे पुढे दरमजल जाणे ते मागाहून आटोपून येतील पहिले पत्र लिहीले होते की यास बराबर घेऊन जाणे परंतु याचा गुता येथे लस्करात आहे मागाहून आटोपून लौकरच येतील तुम्ही दर मजल जाणे हे आसिर्वाद पौ छ १७ रजब मुा लोणी

---

(ले.५५) श. १६८५ आषा. शु. ८ ] श्री [ इ. स. १७६३ जुलई १७

चिरंजीव राजश्री नाना यासि माधवराव बलाल प्रधान आसिर्वाद उपरी येथील क्षेम ताा छ ६ मोहरम मुा नजीक नलदूर्ग येथे सुखरूप असो विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान कलले तुम्हास यावयाविसी तीर्थस्वरूपानी पत्र[1] पाा आहे तरी सत्वर यावयाचे करावे इकडील वर्तमान विस्तारे गोविंद सिवराम लिहीतील त्यावरून कलेल सासवडच्या वाड्याच्या खडण्या लोकापासून यानी कसकसा घेतल्या हे लिहावे बहूत काय लिहीणे हे आसिर्वाद पौ छ १५ मोहरम

---

१ पत्र राघोबादादाचें.

( ले. ५६ ) श्री

राजश्री अस्करराव काका व राघोपत स्वामी गोसावी यासि

पोष्य निलकठ माहादेव नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीणे विशेष राजकी बहिरो अनत याजकडे मोगलाचे पटीबदल तगादा केला आहे कामरगावाहून मुलेमाणसे माचीस आली व याचे घर व फिरगोजी पवार याची घरे चाबळीस तो याचा चाकर ऐसे तीन कलमे मिलोन तीन साडे तीन हजार रुपये मागता ऐशास तूर्त मारनिलेस पैक्याचा तगादा न करणे रा छ १६ मोहरम सुा सबा सितैन मया व अलफ हे विनति

---

( ले. ५७ ) श्रीशकर

पौ छ ८ रावर

*सेवेसी रामचद्र गणेश साा नमस्कार विनती उपरी आपली आज्ञेप्रमाणे राजश्री नाना फडणीस यास वर्तमान सागितले हतीचे साा साडे तीन हजार सत्वरच देतात कुरणाचा मजकूर तरी त्याचा लडा आहे याजकरिता राजश्री नारो आपाजी यास मना[स] आणावयासी सागितले आहे आपाजवल नवा कागद दिल्हा तो नाना फडणीस वाचून पाहातो म्हणुन करार केला परतु अपा म्हणतो की तूर्त दाखवीत नाही गावकरी यासी काही बोलावयाचे ते बोलून उपरात दो ती दिवसी दाखऊ याजउपरी आपण लिहितील त्याप्रो करावयाचे ते केले जाईल श्रीमत शुक्रवारी निघाले त्रयोदसीस बुधवारी येथे येणार नबाबाकडील लढाईचे वर्तमान खरेच आहे भागानगरचे व शहरीहून वर्तमाने लिहिली आली फौज गारत फार जाली छापा रात्रीस इग्रजानी घातला लस्कर सारे लुटले गेले नबाब सडे मान पडून गेले त्याचाहि शोध पुरता लागला नाही मागाहून येथास्तित वर्तमान आलियास लेहून पाठऊ रवाना प्रात काल रविवार दशमी रा सदासिवपत यास वर्तमानहि सागितले आहे साा सत्वरच घेतील तुकोजी होलकरहि जवलच आले भेटी जाल्याचे वर्तमान आलियास लेहून पाठऊ बहुत काये लिहिणे लोभ करावा हे विनती

---

( ले. ५८ ) श. १६८४ ] श्री [ इ. स. १७६२

[ पहिला बद गहाल ]

बहुत काये लिहिणे हे विनती

त्यामध्ये शिा की जप्ती आली सो घेतात यैसाचो भाट येऊ लागला स्वदेशेची खेडी याचा तो काही बोभाट आद्यापवर आला नाही परतु लौकरच येईल यज

मान स्वामी बहुत आजुर्दे आहेत निरोप घेऊन घरास यावयाच्या उद्योगात आहेत परतु आपले कोणी इष्टमईत्र येथे आहेत ते म्हणतात तूर्त जाऊ नये दम धरून राहावें होता होईल ते पाहावे मंग जाणे तर जावे त्यावरून तूर्त आठ च्यार दिवस राहिलेसे जाले आहेत प्रस्तुत दरबारी कृतकर्मे सकारनामक[1] व अकारनामक[2] उभयेता आहेत दुसरे कोणाचे काही सिक्षत नाही त्याचे ममतेचे आहेत ते त्याचे हाताखाले कारभार करितात सारांष श्रीमताची दौलत फार करून लोकाचे घरी गेली काही मोगल घेऊन जातो किलेदेखील गेले पुरंधर व रुद्रमाल अकारनामक व सकारनामक याणी घेतले तुम्हास कललेच असेल पुढे होई [ल] ते लेहून पाठऊ पत्र वाचून फाडून टाकावे उतर पाठवाल ते आमचेच हाती येऊन पोहचे येसे पा

---

(ले. ५९) श. १६८४ ] श्री [ इ. स. १७६२

चिरंजीव राजश्री नाना यासि माधवराव बलाल आसीर्वाद उपरी राजश्री भवानराव चहू राउतानसी लस्करात आले खासा स्वारी गंगापुरास जाली भेटी जाहाली नाही होईल मारनिले आपण होऊन आले तेंव्हा जे करणे ते विचार करूनच करणे ते करावे लागले मातबर मनुष्य निग्रह करिता नये लोकोतर उतम तेच करावे लागेल सारांश वाईकराडचा फितूर वारला येविसी तुम्हासहि विचार सुचेल तो लिहिणे रा छ १७ जिलकाद बहुत काय लिहिणे * हे आसीर्वाद पौ छ २१ जिलकाद

---

(ले. ६०)श. १६८६ ज्ये. ] श्री [ इ. स. १७६४ मे-नकल

विनंती उपरी आपण पत्र पाठविले की किल्याचे वर्तमान सविस्तर लेहून पाठवावे त्यास येथील वर्तमान तरी विसाजीपंत माचीस आहेत व किलेयावर चिव्हे व जाधव व पेठकर माहार व बेरड येसे मिलून पाचसे दोही किल्यावर आहेत आपण लिा + + की माचीस येतो त्यास आपण आहात...हे तसे सर्वास... .........आहे किल्या......कर व चिव्हे .........त्याचा बंदोबस्त अहो वरकड वस्त.........हीमाजी ढोबरा मुखजबानी सागता..........येईल तुम्ही यावयाचे करा.........तुमच्या येजमानाची दहासेत .........हूल रात्रीची येक दोन वेला पडली.........येथील वर्तमान आहे वरकड वर्तमान ल्याहावे तर गोस्ट फुटती याजकरिता लिहिता येत नाही कागद रात्री......हे विनती

---

(ले. ६१) श्री

राजश्री संताजी वाबले गोसावी यासी अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य

---

१ सखाराम बापू. २ आबा पुरंदरे.

स्नो केदारजी सिंदे रामराम विनंती उपरी येथील कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष राजश्री गोविंद शामराज व राजश्री सदासिव बाबुराव [ अत्रे ] हे उभेता मामलेदार सरकारचे कर्जाखाले मामलेतीमुळें फसले आहेत तरी तुंम्ही त्यांच्या तालुकियांचे कुली जमीदारांस तंबी करून मशारनिलेचा मागील फडशा ती साला उगवे ऐसे करणे व पुढेही अंमल त्यांचा खुलासा सुरलीतपणे दस्तबुद चाले ते गोष्ट करणे येविसी हैगै सहसा न करणे जाणिजे छ १७ माहे जमादिलाखर* बहूत काये लिहिणे हे विनंति ( मोर्तब सुद )

---

( ले.६२ ) श. १६८५ माघ शु. १ ] श्री [ इ. स. १७६४ फे. २

स्मरणार्थ सुा आर्बा माघ शुध प्रतिपदा मुा सासवड आबाकडे यैवज येणे

२०००० सातारियाचे मुतालकीचे सलासचे वेफ़ोवानी आणले चाळीस हजार पैकी निमे

४००० घरचे सिलकेचे ८००० पैकी निमे

४००० सातारियाचे घरचे ८००० पैकी निमे

१२००० सरलश्करचे मजमूचे चौ साला सितैन ता सलासआखेर

१०००० लाकडाचे २०००० पैकी निमे दाहा हजार

२५०० माचीचे घराचे ५००० पैकी निमे

२३०० मोहरा चौदा हजार पैकी च्यार हजार सातशे आल्या बाकी निमे मोहरा साताची वाटणी तेविसशे

१७५०० घोड्याचे ३५००० पैकी निमे

३०००० पुण्याचे घरचे

खते पत्रे पहिली नवी जुनी कापडाची सिलक

---

( ले.६३ )श. १६८७ माघ शु. ५ ] श्री [ इ. स. १७६६ जा. १५

*चिरंजीव राजश्री बज्याबास प्रती त्रिंबक सदासिव असीर्वाद उपरी येथील कुशल ताा माघ शुध पंचमी परियेंत कुपल असो विशेष तुंम्ही पत्रे हणगूचरोमर पाठविली ती पावली सविस्तर कलले श्रीमंत राजश्री रावसाहेब कृपा बहुत करितात कोणेविषी संशय पडदा नाही येणेकरून खुशाल आहों आम्हाविषी तिलमात्र चिंता न करावी म्हणून लिहिले त्यास श्रीमंत थोर खावद तीन पिढ्या निष्टेने शेवा करून कृपाच संपादिली आहे पुढेहि त्याचे पायापेक्षा दुसरे दैवत कोण आहे तुम्ही बहुत शाहाणपणें श्रीमंताची मर्जी राखून मनोदयानरूप वर्तणूक करीत जाणे वरकड विशेष ल्याहावेसे नाही श्रीमंत राजश्री दादासाहेबाचे

१ ही याद नाना पुरंदऱ्याच्या हातची आहे.

लष्कराहून पत्रे राजश्री नागो शंकराजी व निरंजन मुकुंदरावजी आली ती पाठ-विली ती पावली उत्तरे घेऊन पाठविली आहेत निकडून सरकारचे आमद हिंदु-स्थानांत जातील त्याजबद्दल स्वानादे करणे परंतु अविनाशन काम करणारे जे आहे व प्रतिभन आहे सरकार भाजी वगैरे सर्व घरीन आहेत तुम्हांस तेथे इंसी माय मेली राजश्रींत कारी थोडी आहेत नव्हा आणखी वर्तमान संनिधाने घर-गा-वर लिहीत जाणे बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद

---

( ले.६४ ) श. १६८८ चैत्र शु. १० ] श्री [ इ. स. १७६६ एप्रिल १९.

[ सि. ना. च ] मा। अनाम देशमुख व देसाई कर्यात मामलेदार याखि माधव-राव बल्लाळ प्रधान सुा सीत सितैन मया व अलफ राजश्री गोविंद शिवराम राजश्री भाऊसाहेबांबरोबर हिंदुस्थानात स्वारीस जाऊन लोकांचे कर्ज घेऊन सरकारात उचापत दिल्ही तो ऐवज अद्यापि पावला नाही यामुळे हे कर्जदार जाले सबब कर्जकरी यास उपद्र[ व ] देतात तरी येविशी ताकीद करावी म्हणून मारनिलेनी विदित केले त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी सरकारातून यास ऐवज पावेल तेव्हा तुमचा निकाल करितील तूर्त यास तगादा न करणे ऐसे कर्जकरी-यास तुम्ही सांगोन मारनिलेस उपद्र[ व ] कर्जदाराचा लागो न देणे जाणिजे छ ९ जिलकाद आज्ञाप्रमाण [ के. मी. शि. ]

---

( ले.६५ ) श. १६८९ श्रावण ] श्री [ इ. स. १७६७ आगस्ट

सा नमस्कार विनंती उपरी पत्र पा। ते पावले श्रीमंताचे लस्करचे वर्तमान ल्याहावे म्हणोन लि।। त्यास आदितवारी आमुद निघोन काल मगळवारी आले म्हसीदीचे राजणगावावर आले इतके वर्तमान मात्र कागदी आहे युद्धप्रसंग ते दिवसी करणार येसी वदंता दाट होती मग जाले न जाले हे काही कळले नाही आज उद्या दुसरे वर्तमान येईल तेव्हा कळेल श्रीमंत राजश्री दादा सातारियास गेले त्याजवर तीन च्यार हजार फौज व गाडदी येक हजार रवाना जाले आहेत नूतन वर्तमान आल्यावर लेहोन पाठऊ आपणहि समाचार घेत जावा श्रीमंत राजश्री रावसाहेब याचे लस्करचे वर्तमान लिहीत जावे बहुत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे विनंती.

---

( ले.६६ ) श. १६८९ श्रावण शु॥ १४] श्री [इ.स.१७६७आगष्ट ९

[ आरंभीच्या दोन ओळी फाटल्या आहेत ]

पौ वहिरो रघुनाथ सां नमस्कार विनती येथील क्षेम ता। छ१३ माहे रावल पावेतो मुा बसोदे येथे सुखरूप आसो विशेष स्वामींनी बहुता दिवसी कृपा करून

पत्र पाठविलें तें सुसमई प्रविष्ट होऊन भेटीतुल्य जाहाले याचप्रकारे सदैव येणाराबरोबर पत्र पाठऊन परामर्ष करीत जावा यानतर राजकी वर्तमान तर श्रीमत दादासाहेब नासीकीं आहेत व श्रीमत माधोराव पुण्यात आहेत उभयेताच्या भेटी आद्यापवर जाहाल्या नाहीत फौज माधोरायाजवळ आसी हजार आहे हिंदुस्थानास येणार कळावें यानतर जाट जोहारमल याने बहूत दगा माडला आहे गडबाईहमीरपूर व काल्पी व रायेपूर वगैरे येथे ठाणीं बसविली पुढें झासीकडें जाणार खासा जाठ रायेपुरावर आहे येथे प्रा आजच राजश्री विसाजीपताची पत्रें राजश्री वेंकाजीपत आबास आली कळावें तुम्ही आपणाकडील सविस्तर वरचेवर लिहीत जावें राजश्री गंगाजीपत व रघुनाथरावजी याचा परामर्ष उत[ म ] प्रकारें करीत जावा गंगाजीपतास पुत्र येथे जाहाला म्हणौन त्यास सागावें आपले हकारपूर्वक गरोदर आहेत राजश्री नारोपत दिवाणजी नित्य गायनास बोलावितात आज मारानिल्हेचा नाच होत आहे सेवेसी कळावें खासगत वर्तमान तर आम्ही देशास जाणार प्रस्तूत राजश्री रामचेंद्रपंतानीं व नारोपत दिवाणजीनीं आम्हास पावसापाण्यामुळें राहाविलें त्यास राजश्री लक्ष्मणपत दादा आम्हीबरोबरच जाऊ कळावें ज्याप्रो आपली कृपा आम्हावर होती त्याप्राच राजश्री नारोपत दिवाणजीची कृपा आहे काही दुसरा प्रकार घरीत नाही त्याचे ममतेने तूर्त राहिलो बहूत काये लिहावे कृपा लोभ आसों दीजे हे विनती

सेवेसी देवराव पुरुषोतम व आपाजी महादेव सा। नमस्कार कृपा आसों द्यावी हे विनती

---

## (ले.६७)श. १६८९ श्रा. व. ८ ] श्री [ इ. स. १७६७ आगस्ट १७
[ मा. व. शि. ]

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरधर विस्वासनिधी राजमान्य राजश्री माधवराव पडित प्रधान ताहा मोकदम मौजे पिंपले ता। करेपठार प्रात पुणे सुा। समान सितैन मया व अलफ शके १६८९ सर्वजितनाम सवत्सरे राजश्री सखाराम भगवत उपनाम चोकील गोत्र ज्यमदग्नी सूत्र आश्वलायन याणी हुजूर कसबे पुणे येथील मुकामी येऊन विनती केली की आपण राज्यातील पुरातन शेवक स्वामीशेवा येकनिष्टपणे बहूत दिवस केली यास्तव स्वामीनी कृपाळू होऊन काही नूतन जमीन इनाम करार करून देऊन भोगवटियास इनामपने करून दिल्ही पाहिजेत म्हणून त्याज वरून मनास आणिना हे राज्यातील पुरातन शेवक स्वामीशेवा येकनिष्टपणे बहूत दिवस केली यास्तव याचे चाल्वणे अवशक जाणून याजवरी कृपाळू होऊन मौजे मजकूरपैकी जमीन अवल दुमसीम तिहीं प्रतीची चिघे ८१५ पधरा दरोबस्त कुल बाब कुल कानू हाली पटी व पेस्तर पटी जलतरू तृण काष्ट पाषाण निधी निक्षेपादि सहीत खेरीज हकदार करून नूतन इनाम सरकारातून करार करून देऊन

हे सनंद सादर केली असे तरी मौजे मजकूरपैकी सदरहू जमीन बिघे पधरा चतुःसीमा पूर्वक याचे दुमाला करून देऊन यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने इनाम चालवणे साल दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणे या सनदेची प्रती लेहून घेऊन हे असल सनंद याजवल भोगवटियास परतोन देणे जाणिजे छ २१ रबिलावल आज्ञाप्रमाण [ शि. ले. सी ] बार

---

(ले.६८) शके १६९० भाद्र.] श्री [ इ. स. १७६८ सप्टं.–आक्टोबर

*पुा आसीर्वाद उपरी केशोभट आले त्याणी सागितले की सर्व कामकाजे यादी देणी जाहाली म्हणून तुम्ही सागितले त्यास खासगी गावावरील नेमणुकेचे काय केले ते आधी लिहिणे बाबाजी महादेवाचा गुता उरकून देऊन त्यास घेऊन येणे तुम्ही येका दो दिवसी याल म्हणून सागितले उतम आसे परंतु आमचे मते राव दशमीस निघाले म्हणजे मग आज्ञा घेऊन यावे आपल्या यादीचे कागदपत्र सनदा सिके करून आणावे नाही तरी तुम्ही आलियावर मागे तेथे येक काम म्हटलें तरी होणार नाहीं मोरोबास सदासिवास कोणी दरबारांत येऊ देणार नाही सिका मोर्तब होणार नाही नाना फडाणिसाचा कारभार ठावकाच आहे यास्तव येका पत्राचा दस्तकाचा सिक्याचा गुता उरकुन लागलेच येणे जर गुता येका पत्रा गुता न ठेविता उरकून घेणे सारांष आम्ही लिहितो हे नीट मनात दुरंदेसी पाहून समजणे तुमची शरीर प्रकृत ठीक नाही तिडकेचा उपद्रव हा निस्तोष दूर जाहाला पाहिजे यासाठी दोन तीन महिने औषध शेवन करून पथ्यशील आसावे पिडा दूर जाहालियावर मग मोठे स्वारीस जावे तूर्त येथें यावे आमचे घरी पक्ष होईल मग सातारियास जावे तेथें औषध घ्यावे कोल्हापुरची यात्रा नवरात्रांत करून यावे मग येथास्तित प्रकृत जाहालीयावर स्वारीस जाणे तरी जावे मध्ये तातड सहसा करू नये यांत जीव नाही प्रवासांत आसेच जावे हे उतम नाही रावसाहेब धणी खावद आहेत त्यास दुसऱ्याचा दर्द ममता कलतच आहे शरीर बरे तरी सर्वहि उतम हे ध्यानात आणावे वरकड प्रकार कृपेचा धण्याच्या कललाच आहे उमेदहि वाढऊन फलात्कार समजला आहे रुबरू थोडेसे बोललोहि आहे वारवार म्हणावे त्याहावेसे नाहीं तुमच्या चितांत द्रढतरी आसेल ते खरे साराष आपलें शरीर नीट करून जे करणे ते करणे कोल्हापूरची यात्रा तेवढी करणे आम्हासहि घेऊन जाणे तुमच्या कामाच्या यादी जाहाल्या कोणत्या न जाहाल्या कोणत्या देणी सनदा जाहाल्या कोणत्या ते लिहून पाठवणे रायासी बोलून वतनाचे येणे व शरीर प्रकृत नीट जाहालीयावर स्वारीस येईन यैसे बोलणे हे असीर्वाद

---

* पत्र नाना पुरंदरे यांचें वज्याबास

(ले.६९)श. १६९० आषा० शु॥] श्री [पौ. इ. स. १७६८ जून २१

पौ छ ५ सफर तिसा सितैन

"चिरंजीव बज्याबास आसीर्वाद उपरी नरोजी जासुदा बा। पत्र पाठविले होते त्याचे उतर लिहिले ते कललें पत्र लौकर जुज जाहालीयापासून न आले येणेकरून मातुश्री व आम्ही चितेत होतो यास्तव लिहिले होते तुम्ही लिहिले ते प्रमाणच आहे आलीकडे तुमची पत्रे नाईकूबराबर आली धोंडजी जासुदाबा आली ती व गोदू नादरा व धर्मा काकडया बा पाठविली ती पावली सविस्तर कलले राजश्री आपाजीपंत भाऊ आले भेटी जाहाली श्रीमताची भेट जाहाली त्यानी भोजनास बोलाविले तात्या आबा बालकोबा आपा मोरोबा शामराव खडोजीबावा गेला (?) भोजने केली त्याणी वस्त्रे दिल्ही बहुत उतम जाहाले त्याची आस्था व मातुश्री बयाची होती की तुम्हास भेटावे पलसीस न्यावे आमचेहि मनात होते आम्ही त्यासी निश्चये केला होता तुम्ही गेला फार उतम केले संतोष जाहाला मारानिलेवर काही आरोप नाहीं तुकोजी होलकर याजवल जाऊन राहिले जफ्ती व काही लडा नाही म्हणून लिहिले उतमच आहे आपाजी-पंताकडे काही गुता नाही गगोबानी काही चालू दिल्हे नाही स्थल रक्षून मात्र होते तात्यासी उलगडून बोलणे पुढे दिवाण फडणिस होलकरास देणार म्हणून लिहिले त्यास आपाजीपताचा धदा कानू कैद चाले यैसे तात्यासी बोलून राव-साहेबासी बोलून ठीक करवणे सरकारचे कारकून आसल तरी उतमच आहे परंतु आपाजीपताचे चालेसे करवणे तात्यासी भीड तोडून बोलणे हे पत्रच तात्यास दाखवणे गकारनामक नगरास पाठविले म्हणून लिहिले ते कलले वरकड लिहिले ते कलले श्रीमंत बुधवारी पुण्यास दाखल होतील म्हणून लिहिले ते कलले तुम्ही पुण्यास समागमे जाऊन मग आज्ञा घेऊन गुरुवारी येणें शरीर प्रकृत बरीच आहे येका दो देवाचे मारग मलणे आहेत तुम्ही पाहिजेस तरी जरूर येणें कुसाजीपंत + + याबराबर आहे व सातारियाकडील पत्रे पाठविली ती पावली कीं नाहीं लिहिणे हे असीर्वाद

---

(ले. ७०) श्री

[ पहिला मंद गहाळ ]

२

वा बा अथवा सरदार म्हणून घेतली असेल तर सरकारातून आमच्या कामांची मुक्तता घडेल ते करावे दोन्ही न होत तर त्याचे त्यासी समजोन घ्या म्हणून अज्ञा करावी परतु इतःपर दिसगत काढवावी यैसे नाही त्याप्रा त्यानी

---

+ पत्र नाना पुरंदरे यांचें.

जाबसाल त्यासी केले ते गोस्टीचे समक्षतेरतव अस्तमानी अम्हीहि गेलो होतो त्यास संधेचे समई सविस्तर जाल्या जाबसालाचे ऊहू करून आज वैधृतीकरिता जाबसाल निस्चये करीत नाहीं उदईक जाबसाल निस्चयात्मक ठराऊन देतो म्हणून बोलिले त्याप्रा कनिस्टानीहि सविस्तर बोलणे येकून उतर दिल्हे जे बोलणे ते बोलिलो आहो राहिले ते बोलून उदईक करार करून देतो म्हणून बोलिले आहेत कलावें "नानाप्रकारे आम्ही आगी लागावयास पहातों ते तों वरचेवर गोष्टीने समजावावे या प्रकारांत आहेत त्याचा पक्ष सबल आहे आपला पक्ष बोलण्याचा मात्र उठोन उभे राहावयाची शक्त प्रत्ययास येत नाहीं म्हणौन त्याची चतुराई चालते हे ईश्वरे आनकूल केले आसते तरी चागले झटकर बोलिते सेवट रंग याखेरीज पडणार नाहीं हा सिधांतच आहे कालहरण तेहि करितात आणि आम्हीहि करितो येसे आहे जर उठावयाचे श्री करिते तरी सर्व गोष्टी घडतात नाहीतर जशा घडतील तशा मान्य करून काल काढावा येसे प्राप्त होते परंतु प्रशस्त वाटत नाहीं तेजानें जे होते ते उतम रा गंगाधरपंती लिा ते सविस्तर कलले लोकाच्या व फौज आपले संग्रही साप्रत किती उठते हे परिछिन्न शोधावे विसाजीपंतासीहि काही मसलत करावी परंतु राखून केवळ उघड दाखऊ नये बुधच विचारावी कसी हिंमत काय मसलत ते ठीक करा रा जानाजी भो याजपासी फौज किती आज आसेल हाहि शोध करावा उभ[य] पक्षी बल कसे आसे नानाप्रकारे मनसुबे ध्यानास आणून कर्तव्य निघण्याचा प्रकार योजून लिा आथवा गंगाधरपंतास पा येथील पुरते उद्या परवा कलते वराडातील मोगल नरम केले ते आलजपुरास गेले कराड्या घाट चहडला परंतु फौज पाहुणी आहे रा बाबुराव मोरेश्वर यास पत्रे लिहावी जे याचा आमचा रिणानबंध नाही तुम्ही पाहून गेला आहा त्याचे राडपणच आहे की यैक्यतेत मेलून आमचे मनोरथ सिधीस नेतात वराडातील उतावली करून आब कमी केला आणि हे रडत भागानगरी बसले ते सेर जाले याचे इरे देणे आणि दृढनिश्चयेकरून लिा केवल परशरामपंताचे भरवशावर न राहणे तथापि यासहि इरे देणे किला घेवणे येशा प्रकारे पत्र लिहून रा करावे हे विनती

---

(ले.७१) श. १६८६ आषा. शुा ३] श्री [इ.स. १७६४ जुलै २

श्रीमंत राजश्री तात्यासाहेबाचे सेवेसी

नकल बमोजीब असल बरोबर अजूरदार कासद च्वव अन्शावर कागद पावता जाला छ १९ [मो] हरमी सन ११७४ शहरी

सेवक गणेशराव देवाजी कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ताा छ २ रोज मोहरम मुा लस्कर नजिक कनकगिरी अलीकडे च्यार कोस आणून

पु.द. ७

स्वकुशल लिहीत गेले पाहिजे विशेष आपण मुजरद बहीरजी खिजमतगार बार छ ३० जिलकादचे पत्रे पाठविले ते छ १७ जिल्हेज मुा मारली नाईक्कोपे परगणे कुकनूर नजिक कोस तेथे पावोन लेखनार्थ विदित जाला तेथे आज्ञा की सिवाजी जासूद व त्रिंबक विठल व इनामी कासीदबार यैसे दोन च्यारी पत्रे पाठविली येकहि उत्तर न आले दोनी तीन महिने वर्तमान कलत नाहीं म्हणून बहीरजी बार पत्र पाठविली आहे विस्तारपत्र लिहिणे [आ]ज्ञा तरी आपण लिहिले प्रो अवघे पत्र पोहचून त्याची प्रतिउतर मुजरद पीरखान पत्सी त्याबार इकडील साकल्य वर्तमान कितेक मजकूर लिहून सेवेसी पाठवून दीड महिने जाले तो पोहचून त्याचे भाव ध्यानास अले असेल त्याप्रमाणे तेथील बदोबस्त केलाच असेल त्यानतर भिकू मिर्धाचे जोडीबार अलीकडे पत्र लिहून सेवेसी पाठविली आहे तेहि प्रविष्ट भावार्थ विदित जाले असेल पूर्वी पीरखान बार लिहिलेप्रा कारकुनास सासवडीस राजश्री नीलकठराव अबाकडे पाठविले असालिया उतम जाले नसलीया अता श्रीत्रिबकेस्वरास श्रीमत राजश्री दादासाहेबाकडे राजश्री चिंतोपत सातारकरास [श्री]मत राजश्री माधवराव पेशवे व राजश्री बापूने कार्ये निमित्य लस्करातून कुकनूरचे मोकामीहून रवाना केली तेव्हा अम्ही राजश्री चिंतोपतदादास आपले घरास घेऊन जाऊन येक रोज ठेऊन घेऊन मेजमानी करऊन वस्त्रे देऊन पाठविली आहे त्यासमई आपणाकडील कार्येभागविसी फार प्रकारे सांगितली आहे तेहि कबूल केला आहे का आपण सासवडाहून राजश्री नील-कठराव अबाचे भेटी घेऊन टाकोटाक निघकास श्रीमत राजश्री दादासाहेबाकडे जातो तेथे औरगाबादेहून आपणाकडील कारकून शाहाणा पाठऊन देणे तुमची कार्येभाग उत्तम प्रकारे तुमचे मनोदयानरूप करऊन देवितो तुमची सुमतीचा वस्त्राची मजूरहि बलतो त्यास द्रव्यहि दाहा बारा हजार पावेतो देणे लागेल याप्रकारे तुमचे येजमानास औरगाबादेस लिहून पाठऊन आपणाकडे त्याचा कारकून येऊन त्रिंबकास पोहचे सारखे करणे म्हणून बहुता प्रकारे अभये देऊन गेले आहे यास स्वामीनी निघकास कोणी आपले विस्वासिक धारकून पाठऊन आपले मुदे जे असेल ते त्यापुढे सागून आपले नावे पत्र राजश्री दादासाहेबास आपले कितेक मजकूर विनंती करायास कारकुनास सेवेसी पाठविला आहे ते ध्यानास आणून कृपा करावी म्हणून येक पत्र दुसरे राजश्री नीलकठरावजीस येक तिसरे राजश्री चिंतोपतदादास पत्र की लस्करात कितेक मजकूरविसी राजश्री गणेशराव सांगितले आहे आमचा सर्व भार तुमचा ध्यानात आहे त्याप्रा बदोबस्त उत्तम प्रकारे करून द्यावी आम्हास तुम्हावाचून दुसरे अधार नाही म्हणून पत्र लिहून अनरती काही साहित्यपत्र मामलतचेविसी पाहिजे असिलीया यादी लिहून पाठवणारास पाठऊन द्यावे येन्नास अतर करू नये अगतयरूप पाठऊन दिल्हे पाहिजे

हा समये उतम आहे तूर्त साहित्यपत्र पाहिजे तेहि घ्यावे पुढीलहि मजकूर बोलायाचे प्रकार आम्ही येथे राजश्री दादासी बोलिलो आहेत काये म्हटलिया अगदी सरंजाम आपले नावे सनदपत्र करून द्यावे दुसरे मौजे पिपले राजश्री मल्हारराव घेतला आहे ते देवाची सुमंतीची वस्ते द्यावे म्हणजे सरका[रा]स सा सात हजारपावेतो म्हणून बोलिले आहे त्याणे म्हणाले आहे की दाहापावेतो देणे लागेल आपण तो तेथे येत्न करितो तुमचे दैवाने जे होईल ते खरे म्हणून फार प्रकारे बोलिले आहे वर्तमान आपणास कलावे म्हणून लिहिले असे आपले तर्फेने कोणी जाईल त्यास या प्रकारे सुचऊन सागावे अधिक अगले न बोले येसे सागावे तिकडे पाठविणेस कारकून कोणास नेमता राजश्री विठल व्येंकटेश अपले मायेत असून तुमची बंधूकडील मायेत नसलिया दुसरेकडे गोष्टी कार्ये जालेवाचून फुटू न पावे येसे असलीया त्यास अपले संग्रही घेऊन खर्चेची बेगमी करून पाठवणे तो कबूल न करी दुसऱ्याकडील माया नसूये येसे अढळलीया राजश्री गोविंदरावजीस या प्रकारे सागून पाठऊन देवे ते जाणेस अनमान केलिया राजश्री त्रिंबक माहादेव यासी पाठऊन द्यावे यासी जाणेस अनकूल न पडे तर अपले विचारे आपले मायेचे माणूस पोहान पाठवावे अथवा राजश्री सदासिवपंत बिदनूरकर त्यास तरी पाठऊन द्यावे अम्हास समजले मजकूर लिहिला आहे तेथे अपले विचारास अणऊन पाठऊन द्यावे बहीरजी समागमे अपण लिहिलेप्रा सरकारची पत्र ताकीद पाठऊन देतो वास्तव त्यास च्यार दिवस ठेऊन घेतली आहे सत्वरच पाठऊन देतो विशेष बहिरजी इकडे येतो पैठणाजवळ राजश्री जीवनराव व भैनाचाई व जनार्दन अंबाजी भेटिले औरंगाबादेस जातो येसे सांगितले अलेहि असेल तेहि आलेवरी तेथील कारभार काये जाले आपले व त्याची स्वालजवाब काये जाले त्यास आपण काये सागितलेत विस्तार ते लिहिले पाहिजे अपण जमीनदाराची हातच तनखा बरहुकूम दोन यादी करऊन त्यापैकी अपलेकडे घ्यायाचे यादीच प्रकार लिहिला तरी उतम आहे त्याचप्रा अगोधर घेतला आहे त्याची नकलहि करून सेवेसी पाठविली आहे त्यावरून विदित जाले असेल त्याणे तो अपले यादीप्रा सनदपत्रें करऊन घेऊन अले आहे अम्ही काही सनदपत्र घेतली नाही काये म्हटलिया आम्हीहून सनद पत्र लिहून घेतली याप्रमाणें केल्याप्रा निमे वाटणी करार जाल्यासारखे होतो सनद लिहून घेतले नंतर पुढे बोलायास जागा नाही येसे समजोन घेतली नाही त्रिंबकाकडील स्वालजाब मनास अणऊन घ्यावे. या विचारात अहो अपणास कलावे म्हणून लिहिले असे यास्तव कारकुनास राजश्री चिंतोपंत सातारकर याकडे त्रिंबकास पाठऊन मजकूर ध्यानास अणऊन लिहिले पाहिजे अपण कोणतेविशई चिंता न करावी तूर्त च्यार दिवस खर्चवीण श्रम आहे ईश्वर परिहर करील अपणही फार सावधपणानें खर्चवेच करावे येथे लस्करांत फार माहागाई अहे रुपायास जोधले

पाच सहा सेर आहे हरभरे रुपयाचे तीन सेर सर्व वस्त माहागाचे अहे लोक श्रमी आहेत छयात्रणी तो निश्चयेरूप जाला लस्कर रायेचूर व गदवाल या प्रांताकडे जाऊन तेथील खंडणी घेऊन तेथून फिरऊन हुनगुदवरून बागडकोटवरून धारवाड प्रांत यास जावे हा मनसुबा दिसतो कनकगिरी पालगाराची सलहा वीस हजार रुपयेवरी जाला उदीयेक केचनगौड नगुडास जाणार तेथील बोली उरकलीयावर रायेचूर गदवाल तुगभद्रा व कृष्णा मध्ये अहे तिकडे जाणार राजश्री गोपालरायास दोन हजार फौजानसी सवणूर रक्षयानिमित्ये ठेविली आहे राजश्री रास्ते व विठल सिवदेव सवनूरचे असपास विसा कोसावर अहे सवणूरचे नवाब श्रीमताची समागमे अहे हैदर नाईक दोन तीन हजार फौज च्यार पाच हजार गाडदीनसी मीरफैजुलास बकापुरी ठेऊन आपण बिदनुरास गेला आहे भाद्रपदमास जालेवरी श्रीमत राजश्री दादासाहेब फौजसह कर्नाटकची बदोबस्तीविशी येणार नवाब निजाम अलीखान भागानगरास गेले विशेष लस्कर कुकनूरजवळ अकरा मोकाम होतो तेव्हा अमची मुलूक अगधी पायेमाळीखाली येऊन खराब जाला येक खुद कसबा मात्र सुखरूप राहिले दाणेदुणेहि फार माहागाई आहे वैरण अमची प्रांती मिलत नाही विशेष लस्कर अमची प्रांतीं अकरा मुा जाल्या तेव्हा अमची खासगत कार्ये तुमचे कृपेने जाले माली नाा कोद अमची इनाम अमची भाऊबध वीस वर्षे खात होता दुसरे मौजे मनापूरचे पाटील पुड होऊन पाच गाव परगणेची खात होता सेभर वर्षे अमची अमल देत नव्हता यासमई श्रीमतास दाहा हजार रुपये नजर कबूल करऊन तोफा लाऊन साहा गाव घेऊन अपले ठाणे घातले अपले प्रतापे अघटित कार्ये घडून अले या गोष्टीची येश अपणास अले रुपये मात्र फार पडले अपले दयेने त्याचीहि निभाऊ होईल वर्तमान अपणास कलावे म्हणून सेवेसी लिहिले असे कुकनुरी समस्त सुखरूप आहेत अपणाकडील साकल्ये वर्तमान लिा पाा बहिरजीस मागून सरकारची ताकिदपत्र साहिताची घेऊन पाठवितो विशेष राजश्री त्रिंबक विठल याचे गुा येथे कर्ज सेभर रुपये १०० घेऊन अपणाकडे छिटी पाठविली होती यास त्याकडे अद्याप पावले नाही म्हणून वर्तमान कलले यास तो ग्रहस्त ज्याकडून देविला होतो तो अम्हासी येथे रुा पावले नाही म्हणून निकड करितो यास स्वामीनी रुपये १०० सेभर पूर्वी लिहिले प्राा राजश्री राजेंद्रपतास पावते करऊन त्याची पावती पाठविली पाहिजे पुढे अमची खर्चची फार श्रम अहे वास्तव मारनुलेचे विदेमाने येथे कर्ज घेऊन खर्च चालवावे लागतो पूर्वी लिा प्राा स्वा अगत्य पोहोचाऊन देविले पाा येथे राजश्री माहा (द) [सेट] वीरकर याची गुा कर्ज घेऊन अपणाकडे छिटी पाठऊ तेथे रुपये कोणाचे मुखानी पोहचयास लिहू ते पोहचणार स्वामी समर्थ असा येसे लिहिले म्हणून राग न करावे पूर्वी अपली अशा येसे अली अहे म्हणून येथे लागले ते कर्ज घेऊन लिहून पाठवणे तेथे पावते करू

म्हणून यास्तव विनंती लिहिले जातो बहुत काये लिहिणे कृपा पूर्ण असिले पाहिजे विज्ञापना राजश्री गोविंदराव व त्रिंबकराव व त्रिंबक माहादेव बाबा व नारायेण भट काकास नमस्कार विनती, उपरी लिहिले परिसून कार्येभागाची बंदोबस्ती केले पाहिजे हे विनती

---

(ले.७२) श. १६८४ कार्तिक ] श्रीगजानन [ इ. १७६२ नोव्हें.

तीर्थरूप मातुश्रीबाई वडिलांचे सेवेसी

अपत्ये माधवराउ सां। नमस्कार विज्ञापना उपरी आज शनवारी दोन प्रहरा तीर्थरूप राजश्री दादासाहेबांच्या आमच्या भेटी जाहाल्या येक ठाईच सारे लस्कर उतरले वडिलास कळावे मुा पारगा[व] भीमातीर सेवेसी श्रुत होये हे विनती

---

( ले.७३) श. १६८४ का. वा १०] श्री [इ. १६६२ नो. ११

तीर्थस्वरूप राजश्री काळोपंत बाबा स्वामी वडिलाचे सेवेसी

बालके भगवंतराव अनंत कृतानेक नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ताा कार्तिक वद्य १० दशमी मुकाम हिंगणी नजिक दैठणे वर्तमान येथास्थित आसे विशेष तुम्ही बाजी बोडका याजबरोबर पत्र पाा ते पावले मुलीचा वगैरे लग्नाचा मजकूर लेहिला त्यास तीर्थरूपानी लिाच आहे परंतु माघ मासी लग्नाचा इत्यर्थ करावा हे प्रमाण स्थलाचा मजकूर तर आपास लावणे तेव्हा ठीक करून पाठऊ साहित्याची वगैरे तरदूद आपाबरोबर पाठविली जाईल राजकी मजकूर तर श्रीमंत माधवरावजी याची फौज बारा हजार आहे आमची फौज दादासाहेबसुधा तीस हजारपर्येत आहेत सारांश आमच्या येजमानाचा पैडा भारी पडला त्याचे बल कमी पडले त्याचे आमचे फौजेचा मुकाबला याच तलावर रविवारी जाला नदीपार ते व अलीकडे आम्ही तोफाचा व बाणाचा व जेजालाचा व गोल्याचा मार जाला नदीस पाणी फार याजमुले तरवार चालावयाचा उपाये राहिला नदीने उभयपंक्षी आबरू वाचाविली गोल्याने व बाणाने पचवीस तीस बो माणूस इकडील जखमी जाले तिकडीलहि जाली दाहा पाच इकडील तिकडील ठार जाले मग दुसरे दिवसी मल्हारजी होलकर [ दर ] मियान येऊन सला ठरलावला याप्राा वर्तमान जाले आपले खासगत वर्तमान जे तुम्ही ऐकोन लिहिले ते प्रमाणच आहे विशेष ल्याहावेसे नाही आपा आपल्यावर जे रुबरू सागावयाचे ते सागतील बहुत काये लिहिणे हे विनती

चिरजीव राघोबास आसीर्वाद उपरी तुम्ही पत्र पाा ते पाा उतर लिहिल्या-

---

१ अंताजी माणकेश्वराचा तिसरा मुलगा.

वरून कलल सौ मातुश्री ठमावहिनी व सौ वगावहिनी यास सा नमस्कार लिा परिसोन ममता करावी हे विनती

चिरजी [व] सौ लक्षुमीबाईस आसीर्वाद गगाभागिर्थीसमान मातुश्री आवास सा नमस्कार प्रविष्ट होय.

---

(ले.७४) श. १६८५ ज्येष्ठ ] श्री [ इ. स. १७६३ जुलै

चिरजीव राजश्री माणगाबा यासी त्रिबकराउ सदासीव आसीर्वाद उपरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान सविस्तर कलले श्रीमत राजश्री रावसाहेबानी आम्हास बोलाविले आहे की भेटून जाण म्हणून लिहिले औशास तुम्ही राजश्री पाडूसी बोलणे की श्रीमताकडे जाणे लौकर आहे व श्रीमत मातुश्रीबाई कोणासी बोलत नाहीत बाईनी बोलाविले नाही आणि उगच यावे त्यास श्रीमतानी कृपा करून बोलाविले यावे लक्षप्रकारे श्रीमत रावसाहेबाशिवाय कृपा करून कोण बोलाविणार आहे ऐसे पाडूसी बोलणे व त्यास पत्र लिहिल ते देणे आणि श्रीमत फिरून बोलावी तें करणे आम्ही येकादसीस येथून निघणार त्यास सप्तमी आष्ट्मीस तुम्हापासी माणसे भोई वगैरे सारी पाठवणे बाई बोलावती तर येतो त्यानी न बोलाविले तरी येणे उचित नाही श्रीमत भूमपराडयासमीप आले पत्रे आली आम्ही गारदौंडिजवल भिमा उतरू म्हणजे साऱ्या नद्या तेथे आहेत नावा आहेत वाटहि नगराकडील ठीक आहे यास्तव या वाटेने जाऊ बापू सखाजीनी आज लस्करचे वर्तमान सागितले की पत्रे आचाची आली तेथे मार नलदुर्ग किलेकरानी खेतील उट सरकारच्या पन्नास नेले आचाचे दोन नेले कोणी सोडविले नाहीत दौलताबाद किल्याचा धेराखालील शहर मोगलाकडील फौजानी घेतले जगजीवन पवार वगैरे यानी घेतले हे येक वर्तमान दुसरे वर्तमान मराठे सरदार आद्यापि मोगलाकडे गेले ते आद्यापि श्रीमताकडे आले नाहीत लस्करात ठीक नाही ऐसे आहे नगरास जाणार यासा वर्तमान सागितले राजश्री नानास सागणे बापू सखाजी येथे आले याचे कारण पुरधरचा बदोबस्त करायासाठी आले पहिले हवालदार सरनोबत दूर करून दुसरे धीराजी थोरात व नलवडे ठेविले हे वर्तमान नानास सागणें आम्ही इकडून जाऊ तिकडून येत नाही त्यामधे बाई बोलावती तर येऊन नमस्कार करून मग इकडे येतो आता उगेच करयास यावे पाडूस सागून रायास सागवणे रामचद्रपत गोरे याणी पुसिले तरी लिहिल्याप्रमाणेच सागणे बालकोबा नारोपत यासीहि सागणे अतराचा मार लिहिला व मासला पाठविला तो पाहिला उच चागले नाही आम्हापासी आहे तसे नाही त्यास बारा शो तोला देईल तरी घेऊन पाठवणे पधरा शो तोला नलगे यासो सागणे हे आसीर्वाद

---

(ले. ७५) श. १६८६ कार्तिक ] श्री [ इ. स. १७६४ सप.

सेवेसी विज्ञापना काल येकादसी सा[ सव ]डाहून पत्र बाप्याचें आलें तेंच बजिनस [ पा ]ठविले आहे त्यावरून कलेल आज द्वादसीस सुभान माली सासवडास गेला होता तेथे वर्तमान आहे की दादा कलवांतीण भागानगराहून आणिली आहे तिणें आगदी वेडे केले आहे मल्हारबा व माधवराव कारभार करितात आबास माधवराव आपला + + + मागतात आबा देत नाहीं म्ह + + + आहे तुम्ही जु + + + + + + + व रायानी कबूल केले आबा झुंजावयाचे सामान करितात सासवडच्या वाड्यांत नवे लोक ठेवितात गडावरील गडकरी बहुत घाबरे जाहाले आहेत की माधवरायानी किला घेतल्यावर आपली आवस्ता काये होईल आणीक वर्तमान आहे की आबास व सखारामपंतास लस्करांत जप्ती केली + + गडावरील व + याव व पैका + + ड्यातील व + + + का + + + तात यांत खरें खोटे न कले आकी + + वर्तमान ते सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

---

(ले. ७६) श. १६८५ का. शु. १२] श्री [ इ. स. १७६३ नोव्हें. १७

असल बा नकल

चिरंजीव राजश्री आबा यांसी प्रति माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद उपरी येथील क्षेम ता। छ ११ जमादिलाव[ल] तुम्हांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी प्रस्तुत तुमचे शेरीरप्रक्रतीचे वर्तमान कसे किती दिवस ज्वर येत नाही पुढे पुणियासी कधी येणार फौजची समजावीस चालीस लागली किंवा नाही पुढे आमचा निघावयाचा प्रकार सत्वरच आहे यास्तव फौजहि सम[ज]ली पाहिजे व पुढेहि तुमचेच काम आहे यास्तव फौजेचा प्रकार कसकसा केला हे लिहिणे समजावीस नसली जाहली तर सत्वर करणे मोगलाचाहि प्रकार नीट पहिल्यापासूनहि नाही हेहि वर्तमान तुम्हास ठाऊकच आहे प्रस्तुत मोगलाचा प्रकार असा आहे की त्याचे मते जफ्ती ती करावी हा त्याचा मनोदये आहे दबाऊन पाहावे जेथवर साधल तेथवर घेऊन सलूक करावा हा त्याचा बारीक विच्यार दिसतो व जफ्तीहि थोडी थोडी करितात आसे आहे तुम्हास कलावे लस्करात तुमचे आमचे बोलण्यात नानाच्या सरंजामाविसी असे होते की सर्व सरंजाम सोडितो त्यास ती गोष्ट आद्याप दिसत नाही त्या वेलस असा करार होता की दोन गांव मात्र ठेवावे वरकड तुम्हीच होऊन सोडावा असा करार होता त्यास आद्याप जाबसाल दिसत नाही हे आ[र्धी] वाटेत करार केल्यानंतर नच फिरावा असे तेव्हा होते त्यास तीच गोष्ट हामी आहे किंवा नाही हे कलले

पाहिजे हे आसीर्वाद आबा [ ? ] बराबर होते यास्तव प्रस्तुत सोडणे पुढे तुमचे आमचे विच्यारे होईल तसे करू हे आसीर्वाद.

पौ छ १२ जावल सुा आर्बा सितैन शके १६८५ सुभानूनाम सवछरे.

---

(ले. ७७) पौ श. १६८६ पौष व. ] श्री [ इ. १७६५ जा. १३

पु॥ चिरंजीव राजश्री बजू यासी असीर्वाद उपरी भअस्करराव अपल्या वाडियात येतात त्याचे ऐकावे आपण त्यासी बोलावे यात काही चागले नव्हे साप्रतच्या प्रकारात आबा सखारामपत आम्हासी कसे आहेत घरी मातुश्रीस काये म्हणतात ह्या गोस्टी फार वाईट अमच्या कानास येतात त्यास ते सुखरूप बोलोत परतु मातुश्री त्याच्या बायका अपल्या घरास अणितात अपल्या त्याच्या घरास पाठवितात अपण घरास जातात हे काये असे करू नये मातुश्रीस आमची विनंती सागोन अथःपर त्याच्या घरास मातुश्रीनी जाऊ नये व बायकोस पाठऊ नये याप्रो करणे त्याचे घरास हळदकुंकू वगैरे शिष्टाचार करावयाचे राहिले नाही करू नये इतके सखाराम याणे केलें आहे हे असीर्वाद

पौ छ २० रजब बा
बदली चोकीदार पुणें

---

(ले. ७८) १६८६ फा. शु. ५ ] श्री [ इ. स. १७६५ फे. २४

श्रीमत राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

विनती सेवक गणेश केशव कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना ताा फाल्गुन शुध पंचमीपर्यें [त] स्वामीचे कृपेकरून येथास्थित असे विशेष राजश्री त्रिंबकराउ मामा गडावरी दोनच्यार वेला मोजदाद करावयासी गेले होते त्यास पहिले दिवसीं बार लोक दाहावीस तीस होते तिसरे दिवसी चालीस पनास चवथे दिवसीं पनास पाऊणसेपर्यंत गेले आज लोक चार से दोनसेपर्यंत सकाली घरी भोजन करून गेले त्यास गडकरी सारे दरवाजेयावरी येऊन उभे राहिले आणि त्रिंबकराउ मामा-सागोन पाठविले की दोन च्यारसे माणूस घेऊन आ(ज) गडावरी येतात त्यास आम्ही तुम्हास पा (चा)निसी गडावरी घेऊ नाही तरी तुम्ही माघारे निघोन जाणे याजप्रो च्यार सा घटिका ( गडा )वाले उभे राहिले फारसा जोर केला तर (गड)-करी जुजावयाचा मजकूर केला होता ऐसे ( दे )खोन मामानी आपली पालखी फिरोन माघारे सारे लोकसुधा आले गडावरी मामास घेतले नाही रागे भरून मामा खाली आले याजप्रो आज मजकूर जाहला पुढे आणखी नवलविशे( ष ) वर्तमान जाहले तरी सेवेसी लिहून पाठ + + विदित जाहाले पाहिजे सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

---

(ले.७९ ) श. १६८६ फा. शु. ८ ] श्री [ इ. १७६५ फे. २८
नकल

चिरंजीव राजश्री महिपतराव त्रिंबक यासी प्रति रघुनाथ बाजिराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुमचे प्रयोजन आहे तरी भेटीस येणे तुमचा सरंजाम चिरंजीव राजश्री आबास सांगून सोडविला जाईल मागील सरजामाचे वसुलाची विनंती करू नये रा छ ७ रमजान हे आसीर्वाद.

---

(ले. ८०) श. १६८७ फा. व. १४] श्री [इ. स. १७६६ मार्च १०
राजश्री मोकदम मौजे गराडे गोसांवी यांसि

श्रो सखो माहादेव आसिर्वाद उपरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले वर्षप्रतिपदा कधी करावी म्हणून लिहिले ऐशीयास वर्षप्रतिपदा उदईक मंगलवारी करावी गुढी उभारावी तैलाभ्याग करावें निंब भक्षावा परंतु अधिक मास निघाला आहे बहुत काये लिहिणे हे विनंति

---

(ले. ८१) श. १६८८ आश्वि० ] श्री [ इ. स. १७६६ आक्टो०

सेवेसी विज्ञापना यैसी जे येथील वर्तमान तरी राजश्री सखारामपंत दसरीयाचे मुहूर्ते जाणार यैसी बोली आहे श्रीमंत बजाचा तो तूर्त जात नाही दिपवाली करून जाणार यैसे आहे दुसरे वर्तमान राजश्री सखोपंत आबाकर्डील पागेचे कारकून आहेत त्यास रा सिऊचा भोपटकर याणी कुणबीण दिल्ही होता ती पलोन गेली ती रा राघो लक्षुमण याचे वाडियात जाऊन राहिली येक महिनाभर होती मग यास उमगली याजकरिता याचा गडी पुसावयास गेला त्यास त्याणी मार दिल्हा मग सखोपंत बज्याबाकडे गेले त्याणी ( त्या ) चा का [ र ] कून बोलावून आणिला मग त्यास फ ( जित ) करून कुणबीण देविली राजश्री विष्णुभट भंडारी म्हणौन को [ क ] णस्ता ब्राह्मण आहेत ते जोतिसी आहेत त्यास मातुश्री आबाईनी पुसले कीं आपा सासवडास कधी येतील त्याजवर त्याणी उत्तर दिल्हे की विलंब दिसतो त्याजवर मातुश्री बहुत कष्टी जाहाली म्हणौन भटजी बोल [त] होते सवसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

(ले. ८२) श. १६८८ ] श्रीमार्तंड प्रसन्न [ इ. स. १७६६–६७

स्मरणपूर्वक यात्रा करीत जावे व्ययसवत्सरे मुक्काम श्रीगंगातीर ही याद आठा चौ दिवसा मनन करीत जावी कोणास दाखऊ नये सागू नये उपाहास होऊ देऊ नये
पु.द. ८

पाठीमागे चालत जावे दरबारास जाणे ते पालखीत बसून जात जावे १

शिष्ठ ब्राह्मण कोणी आपले घरास आला तरी आधी नमस्कार करीत जावे ताजीम द्यावी दोन च्यार पाच रुो देत जावे ब्राह्मणाचे ठायी लीन आसत जावे १

वरच्यावर पत्र आम्हास होईल वर्तमानाची पाठवीत जावी प्रमाण जे होईल ते लिहीत जावे लटके बोलत जाऊ नये कोणाचा भाव कसा आपले ठाई होतो रावसाहेब जे बोलतील आधिकोतर जे होईल ते लिहीत जावे १

आपले घरची कीर्द खर्च वेच पाहात जावा चौकशी करीत जावी कीर्दीवर रुजू करीत जावे पागा घोडी उटे प्रत्यह पाहत दोनदा जावी सावल घोडी मतवाली जोत्यासिवाय कोणास बसुउ नये आपणच बसत जावे वरकडास बसू देत जाऊ नये बिघडते १

इतके आम्ही बुधीवाद सांगितले म्हणून आमचे गुणदोष मसकरी करू नये मनातहि आणू नये आणि याप्रो चालावे यांत क्षेम आहे १

दादा पोतनीस आसेच आहेत तोंडावर गोडमात्र बोलत जावे लक्ष शामरायासीच राखावे दादाहि लचाड आहे जेव्हा आपला दावा पाहील तेव्हा चुकणार नाहीं १

जुज जाहले तरी राया बा आसत जावे रायापुढे दोन कदम आसत जावे कदाचित रायानी निशाणापाशी जा म्हटले लोक दिल्हे चाकरी सांगितली तरी बालकोबा मलबा [पानसे] रामचन्द्र गणेश आपले मायेचे आहेत त्याला घेऊन जात जावे ते सांगतील तसे चालन जावे जुजाचे समई श्रीचा भंडार कपाली लावीत जावा किंचित भक्षावा घोड्यास लावावा रिकीबीस पाय देते समई मार्तंडजीचे स्मरण करून घोड्यावर बसत जावे हे मोठे निर्विघ्न आहे याचप्रमाणे रायानी कोठे मोर्चे लावले तेथे जर निशाण देऊन पाठविले तरी बालकोबा मलबा रामचद्रपंत यास न्यावे हे सांगतील तसे करीत जावे १

कोणापाशी काही वस्तु मागू नये भिडेस घालू नये कोणी काही देऊ केले रायाजवळ रदबदल करा म्हटले तरी करू नये कोणाचे काही घेऊ नये १

---

( ले. ८३ ) श. १६८८ ] श्री [ इ. स. १७६७

श्रीमंत राजश्री वडयाचा स्वामीचे सेवेसी

सेवेसी विनती मोरो राम कृतानेक सा नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता आषाढ वद्य द्वितीया सोमवार प्राथकाल पर्यंत येथास्थित असो विशेष आपण परवा पत्र पा ते पावले ज्याची चिठी त्यास पावती केली चिठी हती दिल्यास आक्षरशा वाचून पाहिली पाहून स्वताक्षरे प्रति उत्तर दिल्हे ते सेवेसी पो आहे त्यावरून सविस्तर ध्यानास येईल परवा सौम्यवारी यावयाचा मोहूर्त आहे त्याजप्रो आती

विल्हे यावे रुबरू बापूनी सांगितले आहे की तुम्हापेक्षा आम्हास अधिकोत्तर किमपी नाही बज्याबाची रीत करणे सहिष्णता फार चांगली नानाचे मर्जीस त्याचा माझा उपाय काही नाही मला दुसरी जोड काये आहे येक वेळ सर्व प्रकारे सर्व कारभार मजला बज्याबा पासोन करवणे म्हणजे माझे कर्तेपणाचा कलस जाला आसे बोलणे सर्वोत्कृष्ट नानाचे शरीर फार आशक्त जाले येविसीची हळहळ व तुमचे शरिराची अशक्तेची हळहळ विशेषात्कार आमचे दौलतीविसी व वाडया-विसी वगैरे काही माझा लोभ आहे यैसे नाही येक दोन महिने स्वारीस जाण्याचा आवकाश आहे तोपर्यंत नानाची मर्जी प्रशस्त जाली तर उतम न होये तर उपाये काये बज्याबास घेऊन जाणे जरूर आम्हास त्यासिवाय स्वारीस जाणे उचीत नाही याप्रकारे सर्व गोष्टी विसी आपले ठाई प्रशस्तता पत्री कोठवरी ल्याहवी रुबरू विनती सविस्तर करीन कळले पा वरकड सर्वार्थ श्रीमंत राजश्री नानाकडील वगैरे कितेक समक्ष विनती करीन कळले पा बहूत काये लिहिणे हे विज्ञापना

---

( ले. ८४ ) श. १६८८ ]　　　श्री　　　[ इ. स. १७६७ सप.

सेवेसी विनती सर्व प्रकारे श्रीमंत दादासाहेबाचे लोकाचे लक्ष येथे चिंतो विठल व चिंतो अनंत आबाजी माहदेव वगैरे सर्वांचे कागदोपत्री शपत पुरस्कर जाले आहे हरी भिडा कालीच येथे आला येजमानाचे त्याचे सलूक जाले येका महिन्यानंतर दादासाहेबाकडे जाणार तेथे जाऊन सामोपचारे सर्व गोष्टी आल्या उतम पेच पडल्यास निर्बल पक्ष तिकडील आहेच सर्वात्मना तिकडील लोकाचे लक्ष ते ठाई नाहीच या कर्माचेच डौल येथील बापूने फार आसे आहेत आलिया-नंतर सर्व लोक आपण बापूस चिठी द्या ती श्रीमंत [1]नानास बोणी पडून करवी हे न कले त्याजवरी आम्हास पुसले बापूनी चिठी पाठविरी म्हणून बजूने दिा की बजूनेच चिठी द्या हे पुसले त्याजवरून विनती केली की बापूनीच चिठी दिा होती त्यांत भार होता की जाते वेळेस मजला भेटून गेला नाही परी कितीक दिवस राहाल येस दिा होते त्याजवर येरे म्हणाले आसे लक्ष कमन जाहले म्हणजे आम्हास संतोष आहे बज्याबानी माझे लक्षाने चालोन त्याचे गोष्टीस आचारे आसे बोलले यानंतर येजमानाचे नानाचे दरम्यानकीस बोलण्यास लागे आताजी आहेत नारोपंतासी बोलताना बतनस मधीक जाले म्हाच फारे बापूच्या नानाच्या दरम्यानकीस नारोपंतच आहेत बापुतेह कमन दोन च्यार आती आहे हा

---

१ या पत्रांत आलेल्या 'नाना' चा अर्थ नाना पुरंदरे असा घ्यावा. सखाराम बापू व नाना पुरंदरे यांची खासगी स्नेहसंबंध मुद्दाम नसे. वरावाने लक्ष बापूकडे विशेष.

सर्व होईल लक्ष्मी-नारायेणाचे काम थोडे थोडे तथापी फार लांबले परंतु झाले आता रिगणा मात्र होणे आहे तो होईल दोघे तिघे सुतार ठेऊन वरकड देवाची जाली कवाडे दरवाजा सर्व जाहाले देवप्रतिष्टा वैशाख शुध आष्टमीस आहे होईल व तुम्ही आलता प्रतिष्टेचे समई म्हणजे उत्तम होते आसो देवाचे पोशाख नग थोडे बहुत घेरच करून ठेवले आहेत देव बसलियावर लिहून पाठऊं दक्षणच्या काठ्या दोन पुण्यात नव्या केल्या येक निजिरायास दिल्ही येक तुम्हाकडे पाठविली आहे लढोचे हवाली करणे सविस्तर त्रिंबक वैद्य सांगतील त्याजवरून कलेल आनाजीपंत भाऊ पलशीकर कोल्हापूरचे यात्रेस येणार आहेत तुमचा जाण्याचा निश्चय लेहून पाठवणे म्हणजे त्यास लेहून पाठऊ ते नेतील तुमचे भेटही होईल त्याची आस्था फार आहे संकोच न धरणे उतर या हे आसीर्वाद.'

---

(ले.८७) श. १६९० चै. शु. १] श्री [इ. स. १७६८ मार्च १९

श्रीची वसंतपूजा येणे प्रो करावी सर्वधारी नाम संवत्सरे सुरु समान चैत्र शुध प्रतिपदा

श्रीचा नैवेद्य तांदूळ उत्तम बारीक शेरभर प्रत्यह त्याचा भात करावा रुप्याचे ताम्हणात उकरून घालावा काही करपला आसेल कदाचित तर तो भात वाढावा करपू घालू नये आणि भात मोकळा करून मग शेरभर दह्याचे माप आहे त्या दह्यात मीठ घालून भातावर दही घालावे भात कालवून ताट भरून मग वाग्याचे भरीत उत्तम करावे मिरे मिरे हिंग याची फोडणी द्यावी थोडके निवट करावे भरीत वाटीत घालावे पापड येक प्रत्यह भाजून नैवेद्यावर ठेऊन त्यावर लवण शाक आपा निंबू आलेल ते थोडसे नेऊन उत्तम प्रकारे नैवेद्य दाखवावा यात तिळमात्र अंतर पडू देऊ नये याप्रो करीत जावे

नमस्काराचे व सायंकाळचे आळसाचे भोजनाचे व रात्री प्रहराचे साहित्य

देवास स्नानास करेचे पाणी घागरी दोन आणीन जावया साइवली देवास स्नान घालून देवास वस्त्र पुसून आंतर लाऊन गंध केशरी पूर्ण लावावे आदान कस्तुरीच्या प्रत्यह वालभर कस्तुरीचा लावाव्या टिका लावाव्या याप्रो देवास व म्हाळसाबाईस लावावे मग शेदास पुष्प टाकावा शाळंबेस देवाचे गंध सर्व लावावे पुष्प टाकावा मग तुळशी बेल पत्र देवास वाहावे व फुल म्हाळसाबाईस वहावे मग फुले बेल वाहावा भंडार वाहावा उदपत्री येक प्रत्यह लावावी कापूर उजळावा दशांग लावावा मग नैवेद्य दाखवावा विडा हाति या पानाचे दोन पुडे सुपारी आधेली ठेवावी याप्रो करावे नेवैद्य प्रत्यह तोळे दोन कापूर गंधास आणि तोळा घालावा कापूर थोडे थोडे उगाळावे गंध तिसरी अंगुळा भरीत

---

१ ही सबंद याद नाना पुरंदऱ्याच्या हातची आहे. ही भा. मा. स. अंक मध्ये छापली असून पुन्हा ती मूळप्रतीवरून येथे घेतली आहे.

ठीक येथून करून देत जावे नमस्काराचे ब्राह्मणास दोघास दोन धोत्रजोड चौ चौ रुपयाचे दर आसामीस धुऊन द्यावे या धोत्रावर नमस्कार घालीत जावे

ब्राह्मणभोजन समाप्तीचे वेलेस पक्वानाचा नैवेद्य दाखवावा पाच सुवासिणी व पंचवीस ब्राह्मण भोजनास घालावे पुर्णपोल्या खीर करावी विडे उतम द्यावे दक्षणा दर आसामीस अर्धा रुपया प्रो देत जावी जावे गंध उगालते वेलेस पानी पलीनें घालावे हाताने घालू नये नखाचे होते पख्याने देवास वारा थोडासा घालीत जावा मग गणोचाने खाली येऊन भोजन करीत जावे बेलपत्र माशाचे व फूल माशाचे येकूण दोन दो माशाचा प्रत्यह

---

(ले. ८८) श. १६९० वै. व. ३ ] श्री [ इ. १७६८ मे ५

* चिरंजीव राजश्री बच्याचा यासि प्रति माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद उपरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले त्यास तुम्ही मोठे काम करावे हे मनात येथेहि आहे प्रसगहि पुडे आहेतच वरकड येथे यावयाचे प्रकार तर तसेच जरूर आढल्यावर बोलाऊ आधी पाठऊ येथे ठेवीत नाही चिता न करणे प्रस्तुत डेरेमात्र दिल्हे आहे ज्या पक्षी केदारजीस न पा त्यापक्षी निघून तिकडे जाऊ तुम्हास येणे म्हणून पत्र पा अद्याप संधिक्त गोष्ट आहे निवडल्यावर लिहिण्यांत येईल रा छ १७ जिल्हेज हे आसीर्वाद पौ छ २० जिल्हेज

---

(ले८९) श. १६९० वै. व. ११] श्री [ इ. स. १७६८ जून ११

अपत्ये नारायेणराव साष्टांग नमस्कार विज्ञापना श्रीमंत महाराज छत्रपती स्वामी याचे कन्येस वर राजश्री राधोजी मोहिते पेशजी आणविले होते ते जेष्ट वद्य पंचमीस आले लग्नाचे फार दिवस राहिले नाही नवमी दशमीचे दिवसी मात्र लग्ने आहेत पुढे लग्न ठेवावे तर ते दुसरीयाचे चाकर लग्न करून आपल्या रोजगारास जाणार व त्याचे राहणे जाहाले तरी लग्न होईतोपर्यंत सरकारांतून त्याचा खर्च चालवावा लागेल याजकरितां नवमीस लग्नाचा निश्चय केला आहे त्यास नख्त व कापडाची बेगमी करावी म्हणोन राजश्री विसाजी दादाजी याणी सातारियाहून लिहिले त्यावरून पांच हजार रुो नख्त व साडेआडतीससे आखी सनगे येणेप्रो सातारियास पाठविले सेवेसी विदीत व्हावे यास्तव लिहीले आहे रा छ २४ मोहरम *सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

१ ही सर्व यादी नाना पुरंदऱ्यांच्या हातची. श्रीक्षेत्र जेजुरी येथील श्रीमार्तंड-म्हाळसाकांताचे वसंतपूजेसंबंधीं या सूचना आहेत.

१ पत्र नारायणराव पेशव्यांचें माधवराव पेशव्यांस.

( ले. ९० )

[ पहिला बद गहाळ ]

१ णूक आली आहे साप्रत दिवस यैसे दिसतात की या उपरी आमची व आपली भेटी होईलच आणि आम्ही जे आजीलागाईत वर्तणूक केली आहे तेच उतम यैसे स्वामीच्या चितात येईल आणि चितातील बहुतकाली सशय दूर होईल यैसे दिसतें कदाचित आम्हापासूनहि अतर आसलेच तरी तेहि कलेल बहुत परिहार त्याहावयाचे काही नाही भेटीस यावयाचे मनोदये आहे परतु दोन महिनियात च्यार हिसके पुणाचे जाले आजीच पुणियास मागती जावें लागते जातों तेथील सविस्तर पुणियाहून लेहून पाठऊ शृत जाले पाहिजे कृपा आसो द्यावी हे विनति.

---

( ले.९१ ) श. १६९ - आश्वि.शु.१४] [इ. १७६८ आक्टो. २४

[ आरभीचा मजकूर फाटण्यात गेला आहे. ]

नमस्कार विज्ञापना ता आश्विन शुध चतुर्दसीपर्यंत स्वामीचे कृपेकरून यथास्थित आसे विशेष स्वामींनी आज्ञापत्र सादर केले की श्रीमत राजश्री नानाचे शरीरभावना कैसी आहे ते लिहून पाठवणे म्हणून आज्ञा त्यास राजश्री नाना सासवडाहून निघोन श्रीसोलापुरास जावयासी निघोन आले त्यास मार्गी दहिगावी पोटात तिडीक फार येऊन वावा जाहाला याजमुळे येक दिवस दहीगावी राहिले दुसरे दिवसी निघोन आरल्यासी आले तेथे दोन दिवस राहिले का उतार न पडे यास्तव तेथून निघोन सातारियासी आले तेथे दैवी उपाय फार केले व वैद्याचे उपाय करितात राजश्री बलवतराऊ वैद्यहि येऊन उपाय करतात परतु काही अद्यापवरी गुणावर पडत नाही फार करून वायूचा उपसर्ग फार होतो पोट घागरी सारखे फुगते अनाचा लेश पोटात जात नाही याजप्रो भावना आहे चिरजीव गोपाळपनास येथून घेऊन हिसेचाकरिता राजश्री नाना फडणिस याणी ढालाईत पाठऊन घेऊन गेले त्यास सन सलासात वेनाजी मागेश्वर याणी रुमाल गडावरी घेऊन गेले त्यास पाच सात वरसे जाहाली सन समानान फाल्गुनमासी श्रीमत राजश्री बच्याबा याणी रुमाल खाली आणिले ते रुमाल सरदीने कुजले सारे कागद येकच लासवाटा जाहाला उदरानी जाया केले काही भिजले आहेत जाल्यानी भरून खरडे आणून ठेविले आहेत ते पाहण्यासी येक दोन महिने लागतील आलीकडे सन सलासापासून हुजराच्या दौलात हे डौल निराळे याजप्रो येथील मजकूर आहे ते कागद श्रीमत राजश्री बच्यामापासी दाखविले त्याणी उतर केले की यात काही

---

१ पत्र सखारामबापूचें.

हिसेब सापडावयाचा नाही कदाच्चित शोध करून खर्डा सापडले तरी तलास करितो स्वामीनी राजश्री नाना फडनीस यासी सागोन पाठवावे आणि चिरंजीव गोपालपंत यासी पाठऊन द्यावे रुमालाचा शोध करून कागद सापडले तर उतम आहे विदित जाहले पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

(ले.९२) श. १६९० माघ शु. ७] श्री [इ. १७६९ फे. १३

'सेवेसी विज्ञापना राजश्री सखारामपंत सासवडीच आहेत आम्ही दोन वेल त्याचे भेटीस गेलो होतो श्रीमंताचा शागीर्द व च्यार जासूद व तीन खासबारदार यैसे आमच्या बागेत लक्ष्मीनारायेणाचे देवली राहिले आहेत बापू आपल्या वाडियांत येऊन राहिले आहेत प्रातःकाली उठावे शौच्यास जाऊन तोड धुवोन च्यार घटका सगडीजवळ बसावे उपरांतिक निद्रा करावी सा घटकापर्येत निजावे तदोतर उठोन स्नान करावे दोन प्रहरा भोजन करावे त्यानंतर च्यार पाच डाव सोकट्याचे खेलावे पुढे च्यार घटका पोथीपुस्तक वाचावे मग श्रीवटेश्वरास जावे मग संध्या करावी रात्रीस आपला घरचा कारभार व कोण्ही आला गेला यैसे प्रहर नऊ घटका जागावे उपरांतिक निजावे श्रीमंताचा शागिर्द दिवसात येक वेळ त्याजकडे वाडियांत येत असतो गावच्या कारभारात बगाजीपंत चवऱ्या महारापासून कामकाज घेतात येविसी राजश्री नारोपंत नानाचेंहि लिहिलें आले होते त्यास मागानी फिर्याद बापूपासी केली त्यावरून बापूनी बगाजीपंतास सागून पाठविले की मांग गुरे गावची वोढतात त्याप्रमाणें वोढू देणे राजश्री बज्याबा याचे मानस कसे हे समजले नाही यास्तव चालते तसे चालो देणे बगाजीपंती थोडसे वोढले त्याजवरून रागे भरले प्रस्तुत मांगापासूनच कामकाज चालते दुसरे सुप्याचे पाणी सासवडच्या बागाइतास येते भोगले माली व म्हेत्रे माली व जगथाप माली याचे बागाईत सतर बिघे भिजते त्यास साल गुदस्ता भोगल्याचे धरण चिमाजी गोविद याणी पाडले सालमारी म्हेत्र्या मालियाचे धरण पाडले तो बोभाट बापूपासी गेला बापूनी चिमाजीपंतास रुबरू निक्षून सागितले की सासवडचे बागाईत पुरातन येथे तुम्ही कजिया करावासा नाही तथापि बज्याबा आलियावरी काये होणे ते होईल तूर्त याची धरणे चालो देणे सतर बिघियाचे साडेच्यार पाचसे रुपये मालियापासून घ्यावे लागतात यैकिले नाही त्यावर नाना आबोडिकराहाती बापूनी चिमाजीपंतास सागोन पाठविले यैकिले नाही तेव्हां मातुश्री आबईस सागोन पाठविले माली पाणी आणितात चिमाजीपंत आणू देत नाही येविसी काये करणे ते करावे मातुश्रीनी सागितले की मला काही समजेना देशमूख आहेत व आपण आहेत जे करणे ते करावे तेव्हा पिराजी देशमुखास बापूनी सागितले की माल्यास सागोन आपले पाणी आणवणे माली धरण काढू लागले तेव्हा

पु.द. ९

चिमाजीपंत मातुश्रीकडे आले बोलले जे आम्ही तुमचे भाऊ पाण्याचे भांडण भांडत आसता तुम्ही कसी परवानगी माल्यास दिल्ही व आम्हाकडेहि त्याणी आपला पुत्र व बालाजी भिकाजी यास पाठविले तुम्ही माल्यास परवानगी कसी दिली म्हणोन त्यास आम्ही सांगितले आम्हास बरे वाटत नाही आम्ही घरी आहो बापूचे तुमचे आगोदर बोलणे कसकसे जाले ते आम्हास ठाऊक नाही बापूचा निरोप आम्हाकडे आला व मातुश्रीसहि त्याणी सांगितले त्यावरून आम्ही मालियास सांगितले जे बापूनी तुम्हास सांगितलेच आहे तरी तुम्ही जा आपले पाणी काढून आणा आसे सांगितले आता तुम्ही म्हणता तरी पुरातन जाबसाल सुप्याचे बागाईत चालते कोणते हा भोगवटा दाखवा व तीन खंडी मालवे दिल्हे कोणी घेतले कोणी याचा दाखला आथवा कागदपत्र दाखवा म्हणजे माल्याच्या तोंडांत मारतो त्याप्रो भरून घेऊ उगेच तुम्ही तोंडाने म्हणत आसाल आणि आम्ही वेव्हार सागावयासी तुमच्या वचनावरी लागावे तेव्हा बापूनी चितावरी धरिले चौघे मेळवितील मनसुबी होईल तेव्हा सासवडी सतर बिघे बागाईत चालते हा मातबर भोगवटा चौघेजण ठराऊन लबाड करितील तेव्हा चौघात लबाड व्हावे हे आम्हास कसे पुर्वेल दाखला-मोझ्या तुम्हापाशी काही कागदपत्रांचा आसला तरी दाखवा आम्ही भांडतो तेव्हां आपल्यापासी कागदपत्र नाही बज्याबानी आपल्यास कागद लेहून दिल्हा आहे तो कागद पाहाता आपल्या खदस्तूरचा कागद बापाजींच्या नावे आहे त्यात आन्वये की पुरातन जे चालत आले आहे खरे आहे तेच करावे नवे करू नये आसा पत्रात आन्वये तेव्हा त्यासी बोलो जे खरे पुरातन आहे त्याप्रमाणे करावे आसे पत्र आसता भांडावे त्यास आधार कोण तो जुने मोडून नवे होईल ते कसे आसे बोललों परंतु ते चिमाजीपंताच्या मनास न येता मातुश्रीचे पायावरी डोई ठेऊन सांगितले जे आतःपर आपण सुप्यास जात नाही सुप्याचे सेत आपण टाकिले याप्रमाणे काली छ ४ सवाली बोलोन आपल्या घरास गेले गावहि उज्याड करितो येसेहि बोलले चिमाजीपंती मलोजी देशमुखाचे रूबरु पिराजी देशमुखास सिव्या दिल्ह्या तेव्हा मलोजी देशमुखाने गम खालला पिराजीबावास वर्तमान सांगितले पिराजीबावानी गोविंद विश्वनाथ यासी बोलावून नेऊन मातुश्रीस सांगून पाठविले की चिमाजीपंती आम्हास व मलोजीस शिव्या दिल्ह्या आपण वडील आपणास कळावे चिमाजीपंतास भांडणे होती तरी दिवाणचा हासील बुडऊन पाणी बंद करून काधावे करितात येविसी कार्य त्यास सागणे ते सागावे बापूस वर्तमान शिव्याचे कळल्यानंतर जनोबास चिमाजीपंताच्या घरास पाठऊन फजित केले बहुत वगैरे बोलाऊन आणून गाव फोडावासा चिमाजीपंती केला होता परंतु नानाजी रघुनाथ चिमाजीपंताकडे जाऊन गावकरास व त्यास सांगि-तले जे गाव फोडता यामुळे तुम्ही फजित पावाल हे गोष्ट कामाची नाही याप्रमाणे सांगितल्यास मग गाव फोडावयाचे राहविले भोगल्याचे व म्हेना माली याचे पाणी

आज उद्या मल्हारास्वल होईल जाले वर्तमान सेवेसी लिहिले आसे श्रीमंत राजश्री घोडोबा आप्पा याची मुलेमाणसे भोसल्याच्या गडबडीत मुले पिंपल्यास आली आहेत त्याचे भेटीस मातुश्री आवई गेली होती पाटिलास व चिमणास सेले तिवटे दिली श्रीमंत राजश्री बाबा व सौ येसूबाई येक दोन वेल पिंपल्यास त्याचे भेटीस गेलील होती व येक दोन वेल भोजनासही गेली होती राजश्री आपास बहीरभूमीची वेथा जाली आहे याजकरिता ते मोडच्यात आहेत वरकड सर्व पिंपल्यास आली हे विज्ञापना

---

(ले.९३) श. १६८९ चैत्र ५] श्री [इ. १७६७ एप्री० १२

चिरंजीव राजमान्य राजश्री महिपतराव त्र्यंबक याशी माधवराव बलाल प्रधान आशीर्वाद उपर येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष राजश्रीस उतार पडला किल्यावर नेणे म्हणोन तुम्हास लिहिलें असतां अद्यापपावेतो वरते नेले नाही म्हणो विदित जाहाले तर हाली पत्र पावतांच किल्यावर घेऊन जाणें दिरंगतीवर न घालणे गा छ ३ जिलकाद खाली राहिल्यास चिंता नाही असे वाटेल तेव्हां तेहि होईल तुम्ही सर्व प्रकारे खातरजमा करणे तसे दिवस आल्यावर दाटून किल्यावर राहावे हे ठीक नाही प्रस्तुत खाली राहाणे हे ठीक नाही बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद

---

(ले.९४) श. १६८९ चै. शु. ७] श्री [इ. १७६७ ए. ५

* चिरंजीव राजश्री बज्याबा यासि प्रति माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले राजश्रीस वर न्यावयाचा मजकूर लिहिला तो कलला त्यास आमचे येणे तिकडे होईल असा निश्चय नाही यास्तव पाहिले लिहिले आहे त्याप्रमाणे सत्वर करणे का कीं प्रस्तुत काल खाली राहावयाचा नाही यास्तव लिहिल्याप्रमाणे करणे वरकड चाकरी करून दाखवावी म्हणून लिहिले त्यास तुमच्या स्वरूपास हेच योग्य आहे की आपल्या मातबरीसारखी चाकरी करून दाखवावी यातच सर्व आहे कोणी म्हणतात की चाकरी करतो हेच मोठे काम आहे असेहि कित्येक आहेत आपले स्वरूप काय आणि सरकारची तैनात काय खातो हे मनातच येऊ नये आणि जी चाकरी करतो हे फार मानून कितेक आहेत तुमची उमेद आहे याचप्रमाणे काम तुम्हापासून घ्यावे हेच मनातून येथूनहि आहे समयानसार व प्रसंगानसार घडेल तुमची मातबरी असी आहे की सर्वापेक्षा चाकरी अधिक करावी यातच स्वरूप आहे बाबापासूनहि असेच आहे पत्र फाडून टाकणे दीक्षितासी बोलून निरोप

---

१ हें पत्र काव्येतिहाससंग्रह पत्रें यादी (द्वि. आ. ले.१९९) यांत आलेलें असून तें बहुधा नकलेवरून छापलेलें असावें, हल्लीं आम्ही हें अस्सलावरून छापीत आहों.

दिल्हा आहे येतील तुम्ही त्याचे स्वरूप राखीत जाणे बाहेर वाकडे न पडे ते करणे अधिक उणे आढलेल ते निराले पत्र पा जाणे पत्र दुसऱ्यास नच कलावे येथून माझ्या आनचे जाईल ते अथवा तुमचे दोनही पत्रे नच कलावी महिनाभर राहणे कन्यागताचे स्नान करून येणे रा छ ५ जिलकाद हे आसीर्वाद

(ले. ९५) श. १६८९ चैत्र शु. ५] श्री [ इ. १७६७ ए. ३

तीर्थरूप राजश्री नाना वडिलाचे सेवेसी

आपत्ये बजूने सा। नमस्कार विज्ञापना ता। चैत्र शुध पचमीपावेतो येथास्थित आसो विशेष वडिली पत्रे तुकोजीबरोबर पाठविली ती पावली सविस्तर कलले तीच तिन्ही पत्रे राजश्री दादास दाखविली पत्रे पाहून समाधान जाहाले साराऊप येथून आम्ही श्रीमतास पत्राचे उतर पाठविले त्याची नकलच सेवेसी पाठविली त्यावरून कलो येईल सिहभट या रीतीचे हे समजोन आजपावेतो त्यासी दुरूनच राहिलो हे सर्वगुणसपन्न आहेत हे राजश्रीसहि ठाऊक आहे यानतरी आपले पत्राप्रमाणे श्रवणहि केले या पत्राचे उतर येईल तसे करणे प्राप्त आहे इतक्यात तातडी करीत नाही राजश्रीस वर्तमान सागितले त्यावरून फारच दिल्गीर खटे आहेत कपालावर फोड जाहाला तो तेव्हाच बरा जाहाला परतु शरीर केवलच आशक्त आहे आता राजकारण अगर बखेडा करावा ही वासना किमपि नाही असे आसून श्रीमत कसे समजून आज्ञा करितात हे वाईट न करावे यायोगे श्रीमतास उतम ते करावे परतु दीक्षीतासारिखे कुचोद्य सागर मग उपाये नाही आसो जर श्रीमती लिहिले की वर नेणे तरी मी परिछिन येईन मग काये पाहिजे ते करीनात आमचे काये गेले खालीच आसू देणे म्हणून उतर आले तरी पधरा दिवस राहून मग येणे जरूर आहे सेवेसी कलावे वडिली येणेचा प्रकार तुम्ही लिहिला त्यास ह्या पत्राचे उतर आल्यावर त्या विचारावर काये ते लिहिणे ते लिहीन तीर्थरूप राजश्री तात्यानी पत्र पाठविले तेथे लिहीले की श्रीमतास पुसून तुमच्या लिहिल्याप्रमाणे होये त्यास प्रयेत्न करिता होईल ते खरे असे त्याचे उतर आले राजश्री छादस वर नेणे तेव्हा प्रळय पाहिजे तसा करितील सागितले निवलपणे ऐकू नये हे वृत्ती त्याची श्रीमताचे करणे असे तेव्हा कलतच आहे होता होईल ते खरे राजश्री विष्णुपत आले चिरंजीवाची भुज केली ते आले तेव्हा आम्हाकडे दोन तीनदा आले मग आम्ही राजश्रीकडे प्रतिपदेचे दिवशी राजश्रीकडे नेले नजरा जाहाल्या विष्णुपत देखील परवानगीवाचून जात नाही विष्णुपत यासि दीक्षिताचे आगत्य फारच आहे हे वर्तमान जाणून पुण्यातील तेथच कलल आसल विशेष त्याहावेसे नाही आपण कोणेविशी चिता न करावी जवाहिराचे मोजदाद अद्यापि केलीच नाही मग त्यानी काय सागितले ते सागेनात चिता काये आहे

१ पुढील लेखांक हीच ती नकल.

सांगितले वरच केले मुख्य नीट मार्ग चालल्यास काही भये नाही त्यानी वर्तणूक जी केली ती तेच करू जाणत आणि श्रीमती कृपा केली याचे करणे निरालेच आहे सर्व कृत्रीम आहे यासारखे दुसरे कोणी नाही वसीकरण फारच येथ प्रगट आहेत सर्व खोटे कर्म ते राहात नाही कालेंकरून प्रसिधातहि येऊन केल्या कर्माचे फलहि पावतील काही चिंता नाही सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

(ले.९६) श. १६८९ चै. शु. ५] श्री [इ. १७६७ ए. ३

सेवेसी महिपतराव त्रिंबक व विसाजी दादाजी सा। नमस्कार विज्ञापना चैत्र शुध्ध पचमीपावेतो येथास्थित आसो विषेश स्वामीनी पत्र पाठविल तेथे आज्ञा की राजश्रीस आरोग्य जाहाले आता किल्ल्यावर नेणे म्हणून आज्ञा त्यास आम्ही राजश्रीस आज्ञेप्रमाणे विनंती केली परतु त्याचे चितास वर जाणे येत नाही बहुता प्रकारे विनंती केली परतु घसघस बहुत करितात मी तुमचे कल्याण इच्छित आसता मला पर्वतारूढ करावे हे काये वरील हावा मानेना शरीर आशक्त हाता-पायास तिडका लागतात आधी शरीर क्षीण जाहाले आणि वर नेऊन मारिता की काये मला येथ आणि वर दोन्ही फले येक परंतु ही हवा उतम आहे यास्तव हेच बरेसे वाटते तत्रापि आपण राजकारण आगर बखडा केला तरी आपणास वर घालावे ते काहीच नसता माझ्या बाईकामुलालेकराची तोडातोड करावी हे ठिक नाही तश्यात वैशाख मासी मुलीचे लग्न कर्तव्य आहे असे तुम्ही लिहिणे म्हणून आज्ञा केली त्यावरून सेवेसी लिहिले आहे तर काय आज्ञा ती करावी गडावर बदोबस्त विशेष आणि खाली बदोबस्त वरल्याप्रमाणे नाही म्हणून आज्ञा वर नेण्याची केली ऐशास आम्ही उभयता शेवक येथे आसता येथील कोणेविशी सवशय ध्यानात न आणावा बदोबस्त केला हे परभारा विदित होत आसल यास्तव जसी मर्जी तसी आज्ञा करावी मला आज्ञा केली तरी येईन सविस्तर विनंती करीन मग काये आज्ञा ती करावी आज्ञा केल्यावर फिरोन येथहि येऊ हे विज्ञापना

(ले.९७) श. १६९१ ज्ये. व. १३] श्री [इ. १७६९ जुलई १

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री महिपतराव त्रिबकस्वामी गो पोष्य नारायणराव बलाल नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावोन लिहिले वर्तमान सविस्तर कलले सासवडचे बागपैकी आबे सुमार पसतीस पाठविले ते पावले सातान्याहून आबे आले म्हणजे पाठवून देणे तुम्हास कन्यारत्न जाहालें म्हणून परस्परे आईकिलें परंतु तुम्ही काही न लिहिलें त्यावरून फारच अपूर्व वाटले पुत्रोछाह जाहला म्हणजे पत्र व शर्करा पाठवावी आणि कन्या जाहाली म्हणजे पाठऊ नये ऐसे काही तुम्हास कोणी

सांगितले असे आथवा काही शास्त्रातील वचन सापडले असेल म्हणून पत्र न पाठविलेसे वाटते परतु बहुधा ऐसे वचनही नसेल तथापि तुमचे आढलात आले असल्यास येथे पत्र पाठवयाचा गुता नाही तर येविसीचे सविस्तर लिहिणे रवाना छ २६ सफर बहूत काये लिहिणे हे विनती पौ छ २७ सफर सु॥ सबैन माया व अल्फ

---

(ले.९८) श्रीसीतकांत

राजश्री धोडोपंत गोसावी यासि

सकल गुणालकरण अखडित लक्ष्मी आल्कृत राजमान्य श्री॥ मुधोजी भोसले सेनाधुरधर दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लेखन करीत जावे विशेष तुम्हाकडील वर्तमान कलत नाही तरी सविस्तर ल्याहावें यानतर इकडील वर्तमान तरी कार्तीक वद्य नवमी बुधवारी मोरो रघुनाथ यास देवआज्ञा जाली ईस्वरे बहुत अनुचित गोष्ट केली ईस्वरी सतेस उपाये नाही घरी मुलाचे व त्याचे स्त्रीचे समाधान करावे तुम्ही ते आस तुमचा त्याचा विचार दुसरा नव्हता ऐशास तुमचे कर्ज त्याजकडे आहे तो ऐवज आपण तुमचा निकाल करून देऊ परतु त्याचे घरी उपसर्ग येकदर न करावा आणखी कोण्ही किरकोल देणेदार असतील त्यासहि सागोन त्याचे घरी उपसर्ग होऊ न द्यावा ज्याचे ज्याचे देणे असेल तो ऐवज आपण निकाल करून देऊ आपणहि आपले समाधान असों द्यावें रुपयाचा मार्ग करून देऊ "आपलें सर्व प्रकारे समाधान असों द्यावें रुपयाचा मार्ग आपण करून देऊ चिंता नाही वरकडहि गोविद गोपाल वगैरे त्याचे कर्जदार जे असतील त्याचे समाधान करावें त्याच्याहि देण्याचा मार्ग आपलेच विद्यमानें होईल त्याचे घरीं मुले मनुष्ये आहेत त्याचा परामृश वग्नेवर करीत जावा पूर्वीहि भरोसा आपलाच होता साप्रत तुम्हासिवाय दुसरे कोणी त्यास नाही रा छ २५ माहे रबिलाखर बहूत काये लिहिणे हे विनती [ मोर्तब सुद ]

---

(ले.९९) श. १६९२ आषा. शु. ९] श्री [ इ. १७७० जून

श्रीमतया विराजित राजमान्य राजश्री

मल्हारपंत दादा स्वामीचे सेवेसी

सेवक रावजी नारायेण कृतानेक सा॥ नमस्कार विनती उपरी येथील कुशल तागाईत छ ७ रबिलावल मुकाम कपली तुगभद्रा तीर येथे सुखरूप असो विशेष आपण गेल्या तागाईत काही वर्तमान कलत नाही आलियासमागमे पत्र पाठऊन साभाल सेवकाचा करीत जावा कनकगिरीत खजिन्यासुधा वीस रोज मुकाम केला मामाकडील जासूद आले कूच करून कपलीस आलो तो आज मामाकडील स्वार सात आठसे खजिना न्यावयास सामोरा आले येथू[न] दर मजल जाऊ

कलावे मामा गुरमकुड्याचे नजिक तीन च्यार कोस आहेत कलावे राजेश्री पांडुरंग-पंत भाऊस पत्र लिहिले ते पिंपलसेत पावते करावे काणी आलियास सेवकास पत्री तोषवित आसावें बहुत काय लिहिणे कृपा निरं[ तर ] आसो द्यावी हे विनंती राजेश्री पाटील स्वामींचे सेवेसी सां नमस्कार विज्ञापणा की कृपा प्र [ त्य ]ही आसामी हे विनती

तीर्थरूप आपा वाडिलाचे सेवेसी सां नमस्कार विज्ञापणा कृपा करीत जावी हे विज्ञाप्ती

---

(ले०१००) श. १६९२ कार्ति. व. ७] श्री [इ. १७७० नो. ९

चिरंजीव राजमान्य राजश्री महिपतराव त्रिंबक यासि माधवराव बलाल प्रधान आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष खासा स्वारी पुण्याहून निघोन दहीगावचे मुकामास आली असतां आद्याप तुम्ही येत नाहीं हे आपूर्व आहे येथोन ही कूच करून मजल दर मजल कर्नाटकांत जात असे तरी तुम्ही पत्र पावतांच निघोन येणें दिरंग येकदर न लावणे सत्वर येणे रा छ २० रजब सुा ईहीदे सबैन मया व अलफ बहूत काय लिहिणे हे आसिर्वाद

पाौ छ २२ रजब

सुा ईहीदे सबैन मुा कुभारवलण

---

(ले.१०१) श. १६९२ पौ. शु. १०] श्री [इ. १७७० दिसें० २७

पाौ छ २१ रमजान सुा ईहीदे सबैन शके १६९२ पौष वाा ८ बाा सुभानजी राजपुरे मोढवेकर

चिरंजीव विजयेभव राजश्री पाटील व बापू यासी प्रति मल्हार धोंडदेव आनेक आसीर्वाद उपरी येथील वर्तमान ताा पौष शुध्ध दशमीपर्यंत मुा खानापूर जाणोन स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष साप्रत तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही त्यावरून चित उदास आसे तरी येणारा माणसासमागमे पत्र पाठऊन संतोषवित जावे यानंतर इकडील वर्तमान तर फौजा कर्णाटक प्रांते दाहा हजार पावेतो राजश्री कृष्णराव बलवंत व मलबा पानसी याजसमागमे रवाना केल्या याणी राजश्री त्र्यबकराव मामा यास सामील व्हावे याप्रो वर्तमान आहे श्रीमंत माघारे फिरले पुण्यास माघ शुध पचमीचे मुहूर्ते दाखल होणार तूर्त रोख पंढरपुरास जावयाचा आहे दुसरा विचार पंढरपुरास जाऊ नये निरानरसिंपुरावरून श्रीसिधटेकास जाऊन देवदर्शन करून कुर्कुम मोरगाव करून पुणियास जावे हाहि मजकूर आहे मोरगावचे मुकामास आलो तर तुमची भेट होईल भेटीनंतर वर्तमान कलेल तीर्थरूप श्रीतुलजापुरचे यात्रेहून आद्यापि आले कीं नाही हे कलत

नाही तरी कोणी येईल त्याबरोबर लिहून पाठवणे वरकड वर्तमान उतम आसे बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद

पांडुरंगपत भाऊ कर्णाटकात फौजे समागमे आपली पागा घेऊन गेले हे विनती

विनंती सेवक सदाशिव गोविंद कृतानेक सां नमस्कार विज्ञापना लिा परिसीन सेवकावर कृपेची वृधी निरतर करावी चिरजीव कुशाचे लग्न मार्गसीर्ष दशमीस करून सर्वास घेऊन घरास आलो दुसरे तिसरे दिवसी घराहून निघोन मार्गसीर्ष वद्य द्वादसीस कृष्णातिरी टकले बोरगाव येथील मुकामास यजमानाजवळ दाखल जाहालो स्वामीस वर्तमान परस्परे कलेलेच असेल चिरजीव कुशाबास आमवाशा जाहालियावरी मोढव्यास जाणे म्हणोन सागोन आलो तोहि सेवेसी गेलाच असेल सारीप ब्रह्मस्व करून कार्यसिध केली आपल्यास वोझे करून ठेविले ब्रह्मस्वाची फिकीर आपणासच आहे स्वामीची भेट लौकर महिन्या पाऊण महिन्यांत होईल भेटीनंतर आपले सविस्तर वृत्त निवेदन करीन हे विज्ञापना हेंा वासुदेवपंत दाजी व बहिरोपंत व नारोपंत व धोंडोपंत यास सां नमस्कार लिा परिसावा सर्व मडलीस सा नमस्कार सागावा स्वामीचे सेवेसी रखमाजी दादाजी कृतानेक साष्टांग नमस्कार लिा परिसीजे कृपा असो द्यावी हे विनंती

---

(ले. १०२)

१ महादशेट वीरकर निशा करून घ्यावी या आर्थ गेले होते त्याची निशा दाहा बारा लक्षाची रोख आले बाकी सावकारी निशा करून येफा दो दिवसी येतील साराऊप येथून माघारे फिरावयासी मुहूर्त त्रयोदसीस करार केला आहे फिरतील मोगलास वीस लक्ष करार करून खडणी हैदर नाइकाकडून देविली त्याचा सला (अपूर्ण)

---

(ले. १०३)

श. १६९३ अधिक आषा. शु॥ ६ ] श्रीराम [ इ. १७७१ जून १८

(पौ) छ ५ रावल सु॥ इसने

+ + + + सारवान

श्रीमत राजेश्री दादा व भाऊ स्वामीचे सेवेसी

विनती सेवक जनार्दन शामराज सा नमस्कार विनंती येथील कुशल ता। छ ४ रबिलावल रोज मंगलवारपर्यंत स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान उत्तम आसे विशेष येथील वर्तमान तर श्रीमताचा मुकाम आदियापि थेऊरीच आहे सुक्रवारी कूच होऊन गगास्नानास जाणार व नवा वैद्य मंत्र घालीत होता त्याचा

गुण थोडासा आला उतार आहे समागमे हरीपंत फडके व रा बज्याबा घेतले व फौज साहसे व गाडिदी पाचसे येणेप्रो सरजाम दक्षणेकडील वर्तमान तर नरसिंगपूर घेतले धारण आतां स्वस्त आहे रास्तेकडील थोडीशी फौज आली त्याजसमागमे बाजारहि आला फिरकोली गळसल आली मीर पाडाव केला होता तो येथे आणला राजेश्री आबाचे वाड्यांत ठेविला होता त्यास काल बेड्या घालून बाजारांत साऱ्या पेठांत हिडविला त्याची बायेको तोफखान्यांत दारू वाटावयास लाविली व हैदरनाईक खंडणी देतो परंतु त्याचे मर्जीप्रो होत नाही यास्तव शाफ सांगोन पाठविले जे खंडणीचा तहरद करू नका व उतरेकडील वर्तमान तर दिलीहून कूच करून पुढे आठ मजली गेले तिकडील वर्तमान उतमच आहे राजेश्री नाना फडनिस व मोरोबा फडनिस + + + उभयेताचा कळेह बहुत वैमनेस्य वाढले होते + रूस फारच लागला होता मग गोपाल नाईक ताबेकर यानी मधिस्ती करून दोघाचे समाधान पूर्वतप्रो रहश केले मोरोबादादा फडनिस नानाचे घरास आले समाधान पुर्ववतप्रो जाहले इदापूरदेशी जकात माहादाजी नारायेण याने घेतली होती त्यास नाना फडनिसानी त्याजकडून निकड करून घेतला यैवज माघारा दिल्हा रुपये हस्तगता घेतले जाहले परतु कमळाकरपंताचे कारकीर्दीचे जुने हिसेब व सर सालची दस्तके विसाजीपंताचे कारकीर्दीची नानानी आणविली यास्तव पूर्वी लि॥ होते त्यास बहिरोपंतास सांगोन पाठवणें जकात तो माघारी घेतली ती आली परंतु माघील हिसेब व सरसालची दस्तके पाहुन पुढे बदोबस्त करावा लागतो यास्तव हिसेब व दस्तके पाहिजेत (श्रीमत) थेऊराहून कूच होऊन गेले म्हणजे श्रीमंत रा अपा मोढ्यास येणार परतु नजिक राहावे यैसे आहे कुरकुंबास व सिरवळास व देवास येणार यैसे वर्तमान आहे मीहि आठा चौ रोजा भेटीस येतो भेटीआंती सर्व वर्तमान निवेदन होईल श्रीमंत आले तर येईनच कदाचित त्याचे येणे न जाहाले तर आगत्य यावे लागते यैसे काही काम आहे खाजगी आमल कोटचे वतनाचा बदोबस्त जाहाला भाऊ येथे आला परतु कचा खर्चच पडला व वाईदेसी येकाबे गाव आहे ते आमानत पूर्वीच केले परतु मोकलीक करावया बद्दल सेरणी द्यावी लागती यास्तव भाऊबंदाकडे मजला जावे लागतें यास्तव निरोप घेऊन यावे लागतें बहुत काय लिहिणे हे विज्ञापना

---

(ले.१०३) श. १६९३ का.व. ४]श्रीराम[इ.स. १७७१ नोव्हें० २६

राजेश्रीया विराजित राजमान्ये राजेश्री वासुदेवपंत दिवाणजी स्वामीचे सेवसी

पो जनार्दन शामराज सिर सां नमस्कार विनती उपरी येथील कुशेल ता कार्तिक वद्ये चेतुर्थी रोज मगलवार मुा वाघोली तिंत्रिये प्रहरपर्यंत वर्तमान येथा-

स्थित आसे विशेष पत्र पाठविले ते पावोन आधें भेटीचा लाभ जाहला येतेसमई गाठ पडली नाही तातड जाहली भेटीचा लाभ जाहला नाही येणेकडून चित सापेक्षित होते तो हस्ताक्षरे आले श्रवण होऊन आनद जाहला येथील वर्तमान तर रो नाना फडनिस आले नारो आपाजी आदियापि आले नाहीत येणार आहेत श्रीमताचे कार्याचे वर्तमान तर तूर्त राजेश्री बज्याचास ताकिदपत्र पाठविले जे मातल्याचे जाग्यावरी घरे पाडून इमारत बाधता ती न बाधणें पुढें चौकशी करू मग ज्याची जागा होईल त्यास देऊ तोपर्यंत जागा जैसी आहे तैसी आसो देणे नाना फडनिसानी पत्र तयार करून दिल्हे पुढे बदोबस्त ते आल्यावरी करून देऊ येैसे म्हणाले साराश श्रीमताचे ल्स्करातून दूत निघणे होत नाही पधरा वीस रोज लागतील पुढे पाहावे व राजकी वर्तमान तर काल दक्षणेकडील पत्र रो त्रिंबकराव मामाकडील आली फेते जाहली गुरूमकुडा किला घेतला त्यात पाचसे घोडे व हती च्यार व ब्होन दोन लक्ष वगैरे येणेप्रो हस्तगत जाहले खिजमतगार बारावे दिवसी खूश खबर घेऊन आले यास्तव दोघा खिजमतगारास सोन्याची कडी दोन दिल्ही वस्त्रें दिल्ही तोफा सोडल्या खुशाली जाहली उत्तरेकडील वर्तमान उत्तमच आले येणेप्रो वर्तमान आहे खडोजी जगताप आज सध्याकाली अथवा उदईक येणार आले म्हणजे कार्य करून घेतों व सदासिव केदार याचे मेढराचा मार लिा त्यास श्रीमत बोलिले जे नारो आपाजी आले म्हणजे मेढराचे कार्य करून घेऊ साराश आले म्हणजे करून घेउ चिरजीव रो मलबा आज येणार आहेत आले म्हणजे लेहून पाठऊ घरच्याविशई फिकीर करावी तर सर्व प्रकारें भरवसा आपला आहे सेतातील दाणे लवकर करऊन घरास दाणा लवकर प्राप्त होये तो आर्थ करणे चोराचिरटाचे वरून दाणे घ्यावे यास्तव लिा आसे बहुत काय लिा हे विनती

हेच राजेश्री बहिरोपत दाजी व नारोपत पानसी व त्रिंबकपत व धोंडोपत यास सा नमस्कार

हेच सुभानद्दा जामदार यास आसीरवाद

---

(ले. १०४) श. १६९३ आश्वि. व. ३] श्रीरामप्रा [इ. स. १७७१ आक्टो. २६

पौ छ १९ रजब इसने सबैन

आपत्ये दादाने चेरणावरी मस्तक ठेऊन सीर सा नमस्कार विज्ञापना ता छ १६ रजब रोज मदवारपर्यंत वर्तमान उत्तम आसे विशेष परवाचे दिवसी गुरुवारी सुप्याचे मुकामचे तपसिलवारे पत्र पाठविले ते पावलेच आसेल काल शुक्रवारी भिमापार होऊन गारेस राहिलो नदीस पाणी फार होते दोन नावा चालतात सुतलीचा तोडा काही नदीच्या गुत्यामुले गाहाल जाहला नाही आज कूच करून

नगरचे रोके......की देवकी वगैरे वर्तमान बाजारी सू+++त यैकिले ते परवा लेहून पाठविलच आलीकडे वर्तमान तर काल संध्याकाली जासूद जोडी सरकारची श्रीमताची रो बाबूजी नाइकाकडे रवाना जाहाली होती ती फिरोन आली ती भेटली लस्कर सोडून पाच रोज जाहाले त्यानी वर्तमान सांगितले जे साप्रती शेरीर प्रकृत उत्तम आहे कोपरगावनजिक लस्कर टोक्यासहि येणार लोकास नित्य वरचेवरी पत्रे बोलाऊ जातात रो सखारामपंत बापू यास रो विष्णु नरहरी आणावयास पाठविले ते वर्तमान कललच आसेल पुण्याचा कारभाराचा मजकूर उभयेता फडनिस नाहीत मातबर आमावा केलला कारभार यास्तव तूर्तमात्र रो नाना फडनिस येतपर्यंत रो नारो आपाजीकडे कारभार सागितला वरकड मार काही नाही हे वर्तमान रो माधवराव हरी सुपेकर यानी सागितले व आणखी [अपूर्ण]

---

(ले. १०५) श. १६९३-९४ ] [ इ. स. १७७२

* येणे म्हणौन लिा त्यावरून राजश्री दा......रा करावे मागाहून आपण कोरेगावचे म+++ता श्रीमंताकडे जावे विचार केला आहे यैसे यैकि[ले] [श्री]मंत राजश्री राघोबादादासहि काढावे हाहि [विचार] यैकिला जनवदंती यैकतो खरीखोटी......हिंदुस्थानचे वर्तमान श्रीमंतांचा आग्रह [रा]मचंद्रपंतानी हुजूर यावे विसाजीपंतांचे हा[ते] [कार]भार व्हावा यैसी पत्रे गेली व जातात त्यावरून [राम]चंद्रपंत देशीं येणार निशाण सिकेकटार रामचद्रपंतानी सिंद्याचे स्वाधीन केले हे वर्तमान आजच यैकिले दिलीचा किला पातशहाचे स्वाधीन करून दाहा लक्ष [रुो] पहिली किस्तपौ आठ लक्ष बाकी राहिले होते त्याची निशा [करून] घेतली या वर्तमानाची +++ कर्नाटकातील मजकूर .............. लक्षास फडशा करणे म्हणौन श्रीमंताची ++ मामास होतीं परतु मामानी नेट देउन येक+++ पंधरा लक्षा +++ केली. त्यात निजामआलीचे पेकशीप्रो बाकी राहिली होती तेहि आहे म्हणौन यैकतो आपाजी राम हैदरापासून निश्चय करून निघाला ते समई हैदराचे पाय सुजले होते फार व्यथिस्थ होता तो मेला यैसी गप उट[ली]++ यैकिले वर्तमान सेवेसी लिा आहे निजामआली [खाना] कडील इबराहीमखान धंसा गंगातिरी +++ प्रांती आहे त्याणे फार धूम मांडिली आहे +++ पारपत्य व्हावे यैसीहि विवंचना होणार ......राजश्री वा चिमणाजी व चिरंजीव मा ++ यांजकडून पत्र इकडे आले नाही से...आसतील येणार कधी

---

* सदाशिव दिनकर याचें त्रुटित पत्र.

(ले.१०६) श. १६९४ वै. शु. ११ ] श्री [ इ. स. १७७२ मे १३

पौ छ ११ माहे सफर उर्फ वैशाख सन इसने सबैन बा संभू जाधव

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक सदासिव गोविंद व जनार्दन सामराज कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता। छ ९ सफरपावेतो स्वामीचे कृपेकरून यथास्थित असे विशेष स्वामींनी रजब प्यादा याजसमागमे पत्र पा। तेथे आज्ञा की चमच्या पाठवावयाविसी तुम्हास येक दोन पत्रे पाठविली परंतु पाठवीत नाही याजवरून अपूर्व भासते इतःपर तरीं कृपा करून पाठऊन द्यावा व मुख्याची अवकृपा जाली म्हणौन आपणहि त्या पगतीस बसो नये मजकडे अज्ञानत्व आहे याजकरिता आंतर पडतच आहे सर्वोपरी आपण सूज्ञ आहेत सांभाळ केल्यास उतम आहे म्हणौन निशेधपत्र सेवकास लि।। त्यास आपण धणी आम्ही सेवक आपले सेवक लोकापासून अंतर पडल्यास धन्यानी त्याचा परिहारच करावा हे खरे परतु सेवकापासून तिलाइतके अंतर पडलेच नाही हे मनोमन साक्ष आहे असे असता उपरोध लेखन केला याजवरून चिताचे ठाई खिन्नता प्राप्त जाहाली सारांष स्वामीचे पायासी आपली येकनिष्टपणा आहे त्यामध्ये दुसरा अर्थ किमपि नाही येविसीची साक्ष स्वामीचेच मन आहे आम्ही विस्तारे ल्याहावे असा अर्थ नाही चमच्या वासुदेवपंताच्या माणसाबरोबर पा। आहे घेऊन उतर पाठवावयास आज्ञा करावी इकडील वर्तमान आधिकोतर ल्याहावया योग्य नाही श्रीमंताचे प्रकृतीचे वर्तमान पूर्ववतप्रो।च आहे पुढे आधिक आगले आढलल्यास सेवेसी लिहून पाठवीन कर्णाटकचे वर्तमान सला जाहालीयाचे आले आहे पासस्ट लक्ष खंडणी जाहाली त्यापैकी तूर्त पस्तिस लक्ष रु।। घ्यावे कार्तिक मासी तीस लक्ष घ्यावे मामानी मुलूक व किले कोट घेतले आहेत त्यापैकी गुरुमकुंडा किला व त्याखालील मुलूक येसा हैदर नाइकास देऊ नये वरकड किले मुलूक खासा स्वारी आल्यावर मामानी घेतला आहे तो त्यास द्यावा येणेप्रो। ठरलेसे वर्तमान आले आहे फौज आगोटिस येणार सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

---

(ले.१०७) श.१६९४ वै. व. ५] श्रीराम प्रां [इ. स. १७७२ मे २१

पौ छ १९ सफर बा। राणू पोमण सन इसने

श्रीमत राजेश्री दादा व भाऊ व बापू स्वामीचे सेवेसी

विनती सेवक जनार्दन शामराज सा। नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता। वैशाख वद्य पचमी रोज गुरुवारपर्यंत स्वामीचे कृपेकरून वर्तमान उतम आसे विशेष येथील वर्तमान तर श्रीमंताची शरीर प्रकृती जी आहे तीच आहे आमचे येजमान दोन तीन वेळा दरबारास गेले परतु गाठ काही पडली नाही

राजेश्री नाना फडनिसाची भेट जाहाली कितेक गाये ममतेचा प्रकार पूर्वेतप्रां बोलणे जाहले वरकड मार ल्यावा यैसे काही नाही श्रीमत राजेश्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा यास देवआज्ञा जाहली तिकडील बदोबस्त करणार श्रीमत आपाची मर्जी साप्रती छ रोजपर्यंत तो उतम आहे करनाटकातील वर्तमान वदता यैकितो जे सला बिघडला परतु पकी बातमी काही आली नाही बाजारी लोक बोलतात उतरेकडील फौजा येदा येतच नाहीत रा सखारामपत बापू यानी जवल बसून औषध देत होते तेणेकरून प्रकृती उतम होती आलीकडे जदीद कारभारी यानी हकीमजीकडून देविलेत प्रकृती बिघडली यैसे आहे याउपरी थोरले श्रीमंत धाकटे श्रीमतासी बोलिले जे आतां देशस्तामध्ये सखारामपत तेवढा आहे त्याज-सिवाये कर्तुत्वाचा दिसत नाही केलेला पुरुश आहे येणेप्रा वर्तमान येथे बोलतात सारांश जाहले यैकिले वदता सेवसी लिहिली आसे बहुत काय लिा हे विज्ञापना

(ले.१०८) श. १६९४ वैशा.व. ३] श्री [इ. स. १७७२ मे १९

पाा छ १६ सफर इसने सबैन

श्रीमंत राजश्री दादा स्वामींचे सेवेसी

व ताा राजश्री भाऊ व बापू स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक सदासीव गोविंद कृतानेक साा नमस्कार विनंती येथील वर्तमान ताा छ १५ सफर पावेतो स्वामीचे कृपे करून येथास्थित आसे विशेष स्वामीनी राणू पोमण याजबरोबर पत्र पाा ते पावले पत्री आज्ञा की चमच्या पाठविला नाही तो पाठवणें त्यास वासुदेव-पंताच्या गड्याबरोबर स्वामीस पत्र पाा त्यामध्ये चमच्या पाठविला आहे यैसे लिा होते त्यास तो गडी प्रातःकालीच न पुसतां गेला त्यामुले चमचा राहिला दुसरे दिवसीं कान्होजी सुतार मोढवेकर याचा लेक बयाजी सुतार येथे आला होता तो मोढव्यास गेला त्याजबरोबर चमच्या पाठविला आहे तो सेवेसी पोहच-लाच असेल पावलीयाचे उतर पाठवावयाची आज्ञा केली पाहिजे येथील वर्तमान आधिकोतर काही नाही श्रीमंताचे शरीरप्रकृतीचे वर्तमान जे आहे तेच आहे उतारा खाली काही नाही ईश्वर कृपा करील तेव्हा खरे राजश्री सखारामपंत बापू नित्य दोन्ही सांज जाऊन राजश्री भिकोबा वैद्याचे औषध महिन्या पंधरा दिवस देत असतात त्याणे प्रकृतीस मानले होते परंतु मागती हकीमजीचे औषध घेऊ लागले त्याणे फिरोन आपकार आहे बापूनी मर्जीसारखे हकीमजीच्या औशधाचा सला दिल्हा उपाये काये परंतु बापू नित्य दोनी सांज दरबारात जात असतात मोरोबा दादाकडे कारभार पूर्ववतप्रोच चालतो उगीच जनवदंता आहे की बापूस कारभार सागणार आसे आहे परतु निस्चयात काही नाही कर्णाटकच्या फौजाहि येणार आहेत सला जाहालीयाची बाजारी खबर आहे पासष्ट लक्ष पावेतो ठराव

जाहाला मामानी मुलूख घेतला त्याप्रो गुरुमकुडा देऊ नये वरकड मुलूक त्याचा त्यास द्यावा तूर्त पस्तीस लक्ष घ्यावे तीस लक्ष कार्तिक मार्गसीर मासी ध्यावे असा सला जाहालीयाची बाजारी खबर आहे सरकारचे लिा तो काही नाही याप्रो वर्तमान आहे चिरंजीव कुशास तीर्थरूपानी पाठवावयाविसी आपणास लिा आहे पाठवा माझा घोडा तेथे आहे त्याची बंदोबस्ती करविली पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

(ले.१०९) श. १६९४ श्रा. शु. ३] श्रीराम [इ. १७७२ आग. २

श्रीमंत राजेश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक जनार्दन शामराज कृतानेक सा नमस्कार विज्ञापना ऐसी जे ताा छ १ जमादिलावल रोज रविवारपर्यंत उतम आसे विशेष आलीकडे स्वामीचे शेरीरभावना वर्तमान कलत नाही तेणेकरून परम चित उदास आहे ते पत्री विस्तार कोठवरी लिहावा श्रीराम जाणे आस्तु मोहछाव व मतबध हा कालपर्यंत समारभ स्वामीचे कृपे करून जाहला आक्षेत्रितिया करून दुसरे दिवसी निघोन यावे तो शेरीरभावना ठीक नाही भूक लागत नाही व तिळा इतकी शेक्त नाही अस्तु शेरीरी उत्कटा फारच जाहली व द्रस्टातही जाहला जे येकवेळ श्रीपंढरीस जाऊन दरशेन घेऊन यावे म्हणजे भावना ठीक राहील याप्रो शेररी त्याचे इछेकरून भावना जाहली यास्तव उदईक सोमवारी येथून निघोन जाऊ बुधवारी तेथे पोहचू बुधवार ताा शुक्रवारपर्यंत तीन रात्र तेथे राहून समर्थाचा निरोप घेऊन सनवारी निघोन सोमवारी आठवे दिवशी निछेयेरूप येऊन येथे पोहचतो तद्नोतेर त्रयोदसीस निघोन येतो राजकारणी मार तर पुणियाहून वरचेवरी पत्रे येतच आसतील आस्तु सिंदे व होल्कर याजकडील लोक फार जाया जाहाले नाश फार जाहला म्हणोन वर्तमान आले परतु नार्वनिसीवार आदियाप फूट जाहाली नाही आज उद्या नाव निसीवार वदता होईल तूर्त वर्तमान जोतिबा भोईटे ठार जाहाल्याचे आले व महादजी भोईटे व सताजी भोईटे वगैरे जखमा आहेत याप्रो वर्तमान तूर्त आले आज उद्या नावनिसी प्रगट होईल याप्रो वर्तमान सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

राजेश्री धोंडोपंत बाबा व गोविंदराव सा नमस्कार सर्व मार श्रीमंताचे पत्रावरोन विदित होईल

---

(ले.११०) श्री [इ. १७७२

विनंती उपरी येथील फडनिस व चिटिनीस सिंद्याचे समतात मिळोन फौज फोडोन मलई करावी या विचारात होते हे रा दादास बातमी कलली उभयतास सामोपच्यारे समजावीस करून पाहिली परतु सिधीस न गेली तो सिंद्याकडील

पत्रच दस्तायैवज धरला तेणेकरून परम रागे भरून निळोबा चिटनिस याचे नावे पत्र होते म्हणून मास ग्वालेरीवर नेऊन टेविले आहेत फडनिसानी साफ सागितले की आम्ही त्यात होतो परतु याउपरी कस्यातहि नाही आज्ञेप्रमाणे वर्तन करून प्रस्तुत दर्व मखलासी सागितल्याप्रमाणे करून आहेत कारभार बारीक मोठा रा दादा स्वताच करितात चौकसी कारभाराची रीत उत्तम आहे समतास त्याचे खासगी-कडील आहे मजमदार व कृष्णाजीपंत दातार हे आहेत दादो मलारहि समतात स्वामीकार्य दादाचे मर्जीनरूप आहे सियाचे खेल होतच आहेत परंतु हे न मानिता कारभार लोटीतच आहेत श्री कृपा करणार समर्थ आहे खावदाचे पायासी येकनिष्टता आहे तेणेकरून येश येत आहे आम्ही सरदाराचे मर्जीनरूप वर्तन करून आसो सेवेसी श्रुत होय प्रस्तुत सकलीत वर्तमान लिहिले आसे पेशजी तफसीलवार लिहिले आहे हे विनंती

---

(ले. १११) श्री [ इ.

[ आरंभीचा मजकूर गाहाळ ]

वय १० पावेतो जाणून स्वकीये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष सासवडी सरकारचा वाडा आहे त्यापैकी जागा राजश्री सखारामपंत यास देविली त्या जागेयावर पहिले गुजर राहात होते त्याणी घरे बाधिली होती ते गुजर घालविले तेव्हा घराचा पैका आम्ही देऊन घरे घेतली आहेत ते मारनिलेनी जागा घेतली त्यामधे सापडलीं आहेत त्याचा पैका आमचा उगवला पाहिजे याज-करिता कारकून पूर्वी येथे येऊन घराचा आकार करून नेला आहे तो मनास आणून बापूकडून पैका देववा म्हणजे जागा मोकली होईल तोवर होणार नाही आधी त्याचे कोणी येऊन कटकट करितील तरी कटकट न पडे ऐसे करावे म्हणून लिहिले ×यैशास याद पाठविली म्हणऊन आपण लिा त्यास येथे याद आली नाही पहिली याद येथे आणिली होती ते दफ्तरातून काढिली परतु पांचशे रुा आपण दिल्हे म्हणून येथेच येक ग्रहस्त बोलला यैशास पांचशे दिल्हे किंवा यादी-प्रा दिल्हे ते ल्याहावे येथे याद सापडली आहे त्याची नकल आपणापासी आसेल ते पाठवावी यादीप्रा रुा मागावे किवा काही कमी दिल्हे आहेत ते ल्याहावे रुा मागोन घेतो आणि पाठवितो उतर पाठवावयासि आज्ञा करावी बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती

---

×पत्र नारो आप्पाजी तुळशीबागवाले यांचें.

## (ले. ११२) श. १६९४ पौष वा ८] श्री (इ. स. १७७३ जा. १६

श्रीमत राजश्री बज्याबा स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक धोंडोराम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती ता। छ २२ माहे शवाल मु॥ भागानगर स्वामीचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष प्रस्तुत आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाही तरी निरंतर आलिया वार्तिकासमागमें पत्र पाठऊन आपले संतोषाचे वर्तमान लिहून सांभाळ केला पा॥ श्रीमंत आदीकरून आपण सातारियासी गेले श्रीमंतास प्रधानपदाची वस्त्रे जाली येणेकरून संतोष जाला आपण येशस्वी आहेत इकडील वर्तमान तरी नवाब प्रस्तुत बाहीर निघत नाहीत तहवरजंग व मराठे सरदार याची खानगी मुधोजी भोसले याजकडे जाली आहे गाजुदीखान पुण्यास आले आहेत + + रून येथील मंडलीस संशय जाला आहे लोक चैन पडो देत नाहीत नित्यशा नाना प्रकारचे मनसबे व तर्कवितर्क करितात त्याजवरून संशयास कारण होते लोक वर्तमाने उठवितात की गाजुदीखान येवढे मातबर माणूस उगेच कोणाचे बोला विल्याखेरीज येणार नाहीत असे ज्याचे चितास जे येईल ते बोलतात वरकड विशेष काही नाही नवाब व रुकनुदौला श्रीमंताचे श्रेहाचे ठाई आजपावेतो दृढतर आहेत नवाब इतक्याकरिताच निघाले नाहीत लोक म्हणतील की श्रीमंत माधव रावसाहेब याचा तसा प्रकार होताच नवाब बाहीर निघाले लोक उगेच राहणार नाहीत इकडील तिकडे तिकडील इकडे संशय घालितील लटिके मनसबे उठवितील याजकरिता रुकनुदौलानी दानाई केली सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

---

## (ले. ११३) श. १६९२ आषा. शु. १५] श्रीराम [इ. स. १७७० जुलै ७

श्रीमत राजेश्री दादास्वामीचे सेवेसी

विनंती सेवक जनार्दन शामराज सिर सा। नमस्कार विनंती उपरी येथील कुशेल ता। आशाड सुध पूर्णिमा रोज सणवारपर्यंत स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष येथील वर्तमान तर सासवडेहून सारे भाउबंद व पाटील देशमुख सर्वत्र आणविले आहेत साराश वतनाचा बंदोबस्त येथास्थित होणार याजउपरी द्वादसीचे दिवसी बुधवारी रात्रीं रो। सखारामपंतास श्रीमंतानी बोलाबून आणून पूर्वंतप्रो। कारभार करावा येसा निछेये जाहला त्याचा उत्कर्श येफदर न होता येस होते परंतु फिरोन दैवगतीने चलती जाहली हैदर नाइकाकडून वकील काल आले साठ लक्ष रुपये खडनी करितो परंतु हे येकत नाहीत व हिंदुस्थानातून पत्रे आली जाटानें पाऊण क्रोड खडणी केली येणे प्रो। वर्तमान आहे बहुत काय लिहिणे हे विज्ञापना

---

(ले.११४) श. १६९६ आ. वै. शु॥७] श्री [इ.स. १७७?एप्रिल१८

[1]सेवेसी विज्ञापना श्रीमंत मातुश्री गंगाबाई यासी डोन्हालेजेवण करावयाविसी आज्ञा आली होती तेन्हा राजश्री बापूस पुसिले त्याणी उतर केले हा विध कोणीच येथे केला नाही त्यानंतरी पार्वतीबाईनी घरीचा विध केला त्यासमई बापूची धाकटी स्त्री येथे किल्ल्यास आहे त्याणी हालदकुंकू वस्त्रे नेली हे कलल्यावरी आज छ ६ सफरी राजश्री मोरोपंत पाठविले त्याणी बापूस पुसिले त्याणी वाडयातील शास्त्रिंथे बोलाविले निरोप पाठविला पार्वतीबाईनी उतर केले बहुत उतम त्याच्या घरचा आवईचा हातचा यावा यापेक्षां विशेष काये थैसे सांगितले मोरोपंत येत होते तो मातुश्रीस पुत्र जाहला श्रीमंत [2]बाबा किल्ल्यास गेले पांच मोहारा मातुश्रीस नजर केल्या विदित होये हे विज्ञापना

---

(ले.११५) श. १६९६ माघ शु.१ ] श्री [पौ इ.स. १७७५ फेब्रु.१

पौ छ २९ जिलकाद

श्रीमंत राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

पो नारो आपाजी सा नमस्कार विनंती येथील कुशल जाणऊन स्वकीये कुशल लेखन केले पा विशेष स्वामीनी पत्र पाठविले ते पावले आदितवारपेठकरानी सालाबादापेक्षां दाहा रुा घेतले आहेत ते त्यांस ताकीद करून देवावे म्हणऊन लिा त्यावरून त्यांजपासून दाहा रुा घेऊन साखरोजी घोघरा जासूद स्वामीकडून आला त्याजबा पाठविले आहेत येऊन पावतील फिरंग्याकडील वकील आला आहे सलूखच आहे तो चिघाडाचा मजकूर काही करीत नाही सास्टीकडे च्यार साडेच्यार हजार फौज व माणूस साडेतीन च्यार हजार जमा आले परंतु त्याची फूट पडोन सास्टीचे टापूत उतरणे घडत नाही कडवे माणूस गाडदी व हेटकरी आसिल्याविना बनाव बसेलसे दिसत नाही आणविले आहेत येतील उभयेता कारभारी बऱ्हाणपुरीहून मोगलास निरोप देऊन निघाले पुणियास कासारबारीने येतात पौर्णिमेपावेतो येतीलसे वाटते पत्रहि आले होते हैदरनाईकाकडील तुंगभद्रेपावेतो ठाणीठुणी घेतली हे सर्व वर्तमान आपणास कलतच आहे विशेष ल्याहावेसें नाही बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

(ले.११६) श्री

चिरजीव राजश्री बापू यासी प्रति मल्हार धोंडदेव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही महिपती जगदल्या [बो]

---

१ पत्र सखोपंत फणसळकरांचे २ महादाजी नीळकंठ

पत्र पा ते पावले तेथे लिहिले की श्रीमंत भाऊसाहेब याची क्रिया होती त्यास खोंड चांगला सलक्षणिक पो आहे थोर काही मिलाला नाही यावरून हा पा आहे कलावे [ अपूर्ण ]

---

(ले.११७) श. १६९२ ज्येष्ठ] श्री [ इ. १७७० जून

सेवेसी विज्ञापना पत्रे पाठविली ती पावली सविस्तर कलले

येथील जेष्ठास तेथील वाड्यात ठेवाणार म्हणून बाजारी वर्तमान परतु लटके येथ आहित तसेच ठेवणार येथून काडीत नाही कलम

श्रीमंत दशमीस निघणार आसे आहे पुढे दोन तीन महिने मुहूर्त नाही यास्तव निघतात

शेषाद्रीशास्त्री यास काल मल्यात पुडी केली येक दोन वेल दर्शनास गेलो होतो सेला येक काव करून दिला त्यानी भस्म द्यावेसा करार केला आहे वैद्यबाबा बरोबरी पाठऊन देतो दुसरे त्याणी सागितले की काशाच्या वाटीमध्ये तेल प्रतिबिंब पाहून देत जावे त्याचे परिमित वैद्याबरोबरी सांगोन पाठवितो चालीस दिवस आसे दोन चालीस येकून ऐसी दिवस घ्यावे

कर्जपटीचा प्रकार बाहेर लोक बोलतात परतु लटके घडत नाही दरबारी काही नाही

वृद्धास पुन्हा कारभार करावा म्हणून आग्रह करितात तरी हे काहीच नाही लबाडीच वर्तमान

बापू सखाजी कडील जिनगरास येथ पाठवावा म्हणजे विल्हे लाउ

सालाबादचा यैवज बारा हजार रुपयाचे यादीवरी नाना फडनिसानी आठा महिन्याच्या मुदतीने यैवज घ्यावा म्हणून मखलासीस लिहिले होते ती यादी फिरऊन दुसरी यादी लिहीविली आहे लवकरीच यैवज पावे यैसे लिहिवितो

सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

(ले. ११८) श्री

[१] यादी स्मरणार्थ सन सीतात सुवा सवत्सरी सावनूरचे साली [२] बाबा पासून वेगले निघालो [३] नाना स्वामींनी वाटणी सरजामाची [*] तात्याचे वेलेचे होते ते निमेनिम करून दिल्हे त्या आलीकडे बाबाचे आमचे चाकरीत सरंजाम दिल्हा होता त्यापैकी दोन वाटे बाबाकडे दिल्हे येक वाटा आम्हाकडे दिल्हा धरची

---

* पत्र नाना पुरंदऱ्यांचें.

१ भा. इ. स. मंडळाच्या पाक्षिक सभा १२ च्या द. वि. आपटे व कै. पां. न. पटवर्धन यांनी वाचलेल्या 'पुरंदरे यांचे एक विश्वसनीय टिपण' या निबंधाच्या सोबत ही यादी असून ती त्र्यंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे यांनी लिहिलेली आहे. २ महादाजी अंबाजी ३ नानासाहेब पेशवे ४ अंबाजीपंत पुरंदरे.

वाटणी वस्तभाव सर्व नवी जुनी दोघानी मिलविली ते व घोडी गुरे सर्व निमेनिम करून दिल्हे नारो आपाजी व सर्व माहीत आहेत परंतु बाबानी ठीक वाटणी वाजबीप्रमाणे देणें घरची दिल्ही नाही काही वाटणीचा विभाग थोडा आला वरकड सर्व राहिले आहे ते आज पावतो राहिलेच आहे फडशा परस्पर फारखती जाहाल्या नाहीत जो वाडा थोर बाबाचा त्या जाग्यात येक ठाई आसता भोगले माली याची जागा आम्हींच घेतली ती जागा त्या वाड्यात आहे आधी भोगल्याची जागा घेतली मग वेगले निघाल्यावर बाबानी गुरवाची जागा माल्याची साल्याची तेल्याची पुरंधऱ्याची वाण्याची परटाची घेऊन घर बांधले आहे वेगले निघालो खरे परंतु वाटणी जाहाली नाहीं तेव्हा चौघे शाहाणे कोणता प्रकार ठहरावतील तो प्रमाण येके ठाई आसता वाडा बांधावयासी बाबानी लाकडे धोंडे चुना व किरकोल खरीदी येके जागा घेतलीच होती निमे वाटणी ती आमची आहे भोगल्याचे वाड्यातील जमीनीत निमे वाटणी आहे आज पावेतो फारखती न जाहाल्या सारी वाटणी न जाहाली तेव्हा ते वेलेची तेरीख वाटणीची होईल किंवा आज होईल हे चौघे वाजवी करतील ते प्रमाण पुरंदर माचीस व किल्यावर घरे बांधिली आहेत ती येके जागा होतो तेव्हा बांधली आहेत निमे वाटणी आमची आहे

नाना भाऊ वारले मध्ये जो प्रकार जाहाला तो सर्व प्रसिधच आहे

बाबाचा संवत्सर विकृति [५] प्लवंग संवत्सरी वतन जाहाले तात्या दादा[६] सातारा राजश्री जवल होते राज्यापाशी भीडभाड सर्व होती त्यावर आनंद संवत्सरी तात्या भाद्रपद शुध चतुर्थीस वारले त्यावर दादा बाबा राजश्रीपाशी होते [७] राजश्री थोर इमानी तात्याचा उपकार मानीत होता राव आपा होते दौलत वृधिगत होत होती त्याणीहि चालविले पेचपाच पडू दिल्हे नाही पडले नाहीत त्यावर दरबारी दादाच होते बाबा आपाबरावर कोकणात खानदेशात दोन वर्षे नील पिंगल या वर्षात फिरत होते मग मिरजेस राजश्रि होते तेथे नानासाहेब राहिले तेथे बाबा दादा राहिले तेथे होते त्यावर रौद्र संवत्सरी रावसाहेब नर्मदातीरी फोकरीवर स्वारीत वारले आपासाहेब कोकणात होते तेथे बाबा नाना होते मग सातारियास जाऊन राजश्रिपासी जाऊन पेशवाई केली बाबा नानाजवल कारभार करू लागले सा वर्षे कारभार चागला केला मग नाना बाबात कारभारामुले पेच पडू लागला सदोबा भाऊ लाहान होते ते कारभार करू लागले मग राजश्रि शुक्ल [८] संवत्सरी वारले मग राज्यस्थापनेच्या प्रकारात्रिषी वगैरे फ [फा ?]रच नानाचे बाबांचे पेच पडु लागून फ [फा ?]रच नासले मग बाबानी मनसबा आपला कसा केला प्रकार तो समजा-

---

५ बाबाचे जन्मसाल ? ६ मल्हार तुकदेव पुरंदरे ७ शाहू माहाराज ८ शके १६७१ मार्गशीर्ष व. २=१७४९ दिजेबर १५

बाबा रामचंद्र बाबा भाऊसाहेब व राजमंडल व नवा राजाराम हे येक करून प्रतिनिधी दादोबा याजवर मोहीम सांगोल्यावर केली भाऊ बाबाच्या मनसब्या प्रो वर्तत मग सांगोले मगलवेढे प्रमोदोथ संवत्सरी आश्विन कार्तिकात घेतली नाना साहेब चरोलीस [१] डेरे दाखल होऊन स्वारीस जावयास राहिले तेथे दाभाड्याचा पेच भारी पडला गुजराथ दाभाड्याची घेतली म्हणोन तेव्हा मग नानानी भाऊ साहेबास बहुता प्रकारे लेहून मर्जी दोघाची येक करून सांगोल्याहून भाऊ चरोलीस आले बाबाचे विचारे येऊ नये कर्नाटकात भाऊनी जावे संभाजी राज्याकडील मनसबा करून तेथील आधिपत्य मिलवावे असे होते सांगोले वगैरे ठाणी गोपालराऊ माहादेव भवानराव प्रतिनिधीस दिवाण करून दिल्हा होता त्यास द्यावी आसे बाबाचे विचारे होते ते भाऊनी मान्य केले नाही कर्नाटकचे मोहिमेस पैका पाहिजे तो भाऊसाहेब बाबा रामचंद्र बाबा याजवल कर्ज मागू लागले तेव्हा हे कोणी देईनात नानासाहेबाचा बाबाचा पेच फारच वाढून नासले मग नानानी भाऊला मिलवून घेऊन सांगोल्याहून चरोलीस नानाजवल आले बाबा मनसबा सांगतात करतात हा वाईट नानासाहेबासारखा खावद वडील भाऊ यासी तोडावे आतर करावे हे उतम नाही असे जाणून चरोलीस आले नाना भाऊ येक जाहाले बाबा फिके पडले बाबाची राजकारणे सर्व नानास कलली मग बाबा उठोन पुण्यास म्हणून आले मग बाबा भोवती चोरचौकी नेहमी नानानी ठेविली पुरधरास दिनकरपंत पाठविले मग फारच संशय वाढले विटले ते सर्व प्रसिध आहे मग बाबा घरीच होते नाना बो स्वारीत उगेच हिंडत आसेत येक वर्ष सिहस्ताचे साली निराले स्वारीस कर्नाटकात पाठविले होते परतु विश्वासाचा प्रकार मध्यमच होता मग बाबा विक्रम संवत्सरी वारले

खाजगत प्रकार राजश्रि थोरले याणीच बाबास नानास सांगितले सातारा की मजला आम्हापासी ठेवणे येथे शाहाणा करू तेव्हा क्षय संवत्सरी सातारा नानानी बाबानी ठेविले थोरली बाईची मर्जी सिवाजी हरी कारभारी याची वाईट बाबाचे ठाई होती याजमुळे राजश्रि हि बाबाचा पेच मानु लागले बाबा बाईचे यैकेनात राजश्रिचे हि थोडेसे यैकेनातसे जाहले आसा प्रकार होता तेव्हा आम्हास ठेविले राजश्रीची उभयेता बाईची मर्जी सपादून च्यार वर्षे सेवा केली शुक्ल संवत्सरी माहाराज वारले त्यावर चाकरी च केली सांगोल्यास भाऊ बो गेलो तेथे चाकरी करून सातारियासि दोन हजार फौज देऊन राजारामा बो पाठविले आईसाहेबाचे राजारामाचे बनेना तेव्हा आईसाहेबी सातारा किला बलावला वर्ती राहिली राजाराम यासी किल्यावर चपापष्टीचे भोजनास नेले कैद केले आम्ही खाली राहिलो तेव्हा नाना साहेबी आज्ञा करून किल्याभोवत्या चौक्या आम्हाकडू [न] यश-

---

१ चरोलीस मुकाम जिल्काद १-१४

विल्या सपूर्ण मार्गसीर्ष पौष माघ व फालगुन वद्य पंचमी षष्टी पावेतो मोर्चे बंदी करून रात्रदिवस मेहनत जुजे भाडणे कायेल ? करणे कुफर तोडणे हे करून तमाम खालील बंदोबस्त करून राहिलो तो दमाजी गायकवाड दाभाडयाकडील यानी खानदेशात दंगा माडला म्हणौन नानासाहेबानी पारपत्यास बापू [10]बाजीराउ बळवंतराव गणपत फौज सुधा गायेकवाडावर रवाना केले याचे त्याचे जुंज जाहाले बळवंतराव बापू बाजीराव मोडले गायेकवाड पाठी लागत जेजारी मोरगाववरून [ वरून ] साताऱ्याकडे चालला आम्हास वर्तमान सातारियास कललियावर सारी फौज घेऊन बलवंतराव बापू बाजीराउ यासि नाझऱ्यावर येऊन भिलोन दम देऊन फिरोन सर्व लोकांचे समाधान दिलासा देऊन गायेकवाडापाठीमागे लागून गायेकवाड [ म्हसवे ?] वेण्यातीरी राहिला होता आम्ही फौजा घेऊन वडुतावरून गायेकवाडावर गेलो तोहि चालून आला जुंज जाहाले निकडीने लोक जुजले तेव्हा गायेकवाड मोडून गेंडयापावेतो सातारिया शहरांत घातला लस्कर डेरे दांडे सर्व गायेकवाडाचे लुटून आणले निशाण नौबत बापू बलवंतरायाची गेली होती ती फिरोन आणली गाये [ क ] वाड लुटून फस्त केला हे वर्तमान नानासाहेबास लेहून पाठविले तेव्हा मग फार संतोषी होऊन कृपापत्रीं बहुता प्रकारें गौरविलें गेली बाजी सावरली गुजराथ मिळऊन दिल्ही जी गोष्ट तात्यास योग्य ते केले याप्रो खास-दस्तकांनसी पत्रें पाठविली बाबा पुण्यात त्या प्रकारात घरी स्वस्त होते नाना भागानगराकडे मुलुकगिरीस गेले होते याप्रो कृपेस पात्र जाहालो मग नानासाहेब सातारा आले दमाजी भेटला तहाप्रो न वर्ते म्हणून मग लुटला गेला मग पुण्यास आम्ही नानासाहेब पुण्यास गेलियावर मागून आलो बाबा हि फार च कृपा करूं लागले मग बाबाचा सरजाम व सरदारी हे करून दिल्हे काकी बाबा घरी बसले तरी बाबाचे आम्ही चाकरी सर्वोत्कर्ष जाहाली तेव्हा बाबावर कृपा करून करार करून दिल्हे त्यावर बाबा घरी आसेत आम्ही च नाना भाऊची मर्जी रक्षून चाकरी केली व खावदानी सावनूरचे साली केली [ ? ] व विश्वासराउ बाबूराउ औरंगाबादेवर पाठविले दताजी सिंदे होते निजामअली सलाबतजग यासी लडाई होत होती मग ते वर्षी नानासाहेबानी फौज देऊन व गोविद सिवराम यास बकसीगिरी सागोन बाो देऊन विश्वासरायाकडे रवाना केले मग बाबूराउ फडणीस माघारे घरास आले सबब बकसीगिरी गोविद सिवरामास दिल्ही म्हणून त्यावर आम्ही गोविद सिवराम येक विचारे राहून निजामआलीसी दोन महिने जुजलो रायाची मर्जी राखून मोगलापासून पंचवीसा लाखाची जागीर व नलदुर्ग किला घेतला भेटी जाहालया नानासाहेब संतोषी जाहाले ही चाकरी केली त्यावर भाऊ-साहेबाबरोबर तिसरे वर्षी निजामआलीवर जाऊन साठी लक्षाची जागीर दौलता-

---

१० रेटरेकर, ११ =२७ आगष्ट १७५७

बाद किला विज्यापूर मोलहेर आशेर बुराणपूर घेतले ते वेलेस बुजात भाउजवल चाकरी केली [१२]चंडोल बुडविला सात हती घेऊन मोगल थंडा केला ते वेलेस चाकरी केली बाबा नानाजवल नगरामध्ये होते त्यावर पाणिपतची स्वारी जाहाली चाकरी चुकरी होणार ती जाहाली परंतु ईश्वरीसतेने विश्वासरायाचा प्रकार तसा जाहला फौज मोडडी गारत जाहाली चौथे चौकडे गेले तेव्हा दिलीपासून आलीकडे सरकारची [?] सराई मथुरा आहे तेथे सारी फौज मोडली ती येके जागा होऊन देखील [?] मल्हारजी होलकर मग तिकडे कर्ज वाम काढून तमाम लोकाची उस्तवारी करून भिंडेस आले तेथून ग्वालेरीस येऊन बंदोबस्त फौचेचा करून मल्हारबा आम्ही येक होऊन गुहदकरास दयाव देऊन ठाणी दोन तीन घेतली अबदालीस हि कलले की दक्षणी फौजा सरदार आहेत मग नानासाहेब मालव्यात आले होते त्याणी मदतीस फौजा बाबूजी नाईक सदासीव रामचंद्र वगैरे पाठविले खर्चास पाठविले ग्वालेरीस हे आले भेटी जाहाल्या मग मलरबा [मल्हारबा] हिंदुस्थानात राहिले आम्ही पार्वतीबाईला घेऊन नानासाहेबाजवल बुराणपुरास आले कृपा करून सन्माने भेटले खासा बाजारा बाहेर येऊन भेटले यापुढे श्रीमंत माधवराव कोसभर पुढे आडवे पाठविले होते भेटी जाहाली कृपा च करून गौरऊन हती घोडा चौकडा दिल्हा फौजेचे रवानगीस आडीच लाख रुो दिल्हे रवानगी करून पुण्यास आले

मल्हार जोसी आग्महोत्री राहतात ते घर पूर्वी आने गुमास्ते ठेविले तेव्हा हे घर राहावयासी दिल्हे होते गुमास्तगिरीचे घर ते आसे पुरंधऱ्यानी आम्हास दिल्हे होते असे वडिलानी सांगितले आहे

पानवडीचे कुलकर्ण विसाजीपंतानी व खंडो नारायण यानी केले आहे केवल पानवडी रामचंद्र नारायेण याजकडेसच आहे समाही आपली आहे

आंबोडी समाईक आहे परतु तूर्त चितो माहादेवाकडे खायासी दिल्हा आहे

मौजे मोढवे कााा सासवड हा गाव इसाफती देसमुखास राजरामानी दिल्हा आहे सनदा आहेत परंतु आलीकडे चालत नाही परंतु तो गाव इसाफतीचा आहे

तिमाजी पाटलाची शेरी हे जमीन राजाराम सासवडास आले होते तेव्हा तेथे उभे राहिले ऊस लुटविला तिमाजी पाटील काही बोलले नाहीत हासत उभे राहिले मग राजारामानी संतोष मानून तेच समई इनाम करून दिल्हे परतु गावकऱ्यानी चालू दिल्हे नाही आता पैका देतात परंतु इनाम आहे

शाहू माहाराज नवते राज्यावर आले बालाजी विस्वनाथ याकडे पेशवाई

१२ पिछाडी

नवती तेंव्हा राजाराम ताराबाई व पूर्वी औरंगजेब पातशाहा तुलापुरावर आले होते तेंव्हां व संकराजी नारायेण सचीव होते तेंव्हा आत्रे यास खोटे केले तपसील

पारनेरचे गोत दिल्हे तेथे पुरंधरे हाजीर जाहाले इनसाफास आले नाहीत कलम १

सिहीगडीं संकराजी नारायेण सचीव होते तेंव्हा भिवाजी कासी व बापु भास्कर याचा आपल्या आपल्यात कजिया लागला मग सिहीगडास गावकरीयासी संकराजी नारायेण याणी नेऊन दोघा आत्र्याची पुरसीस करून आमृत्या देव आहे त्याचे देवलात दोघास घातले आणि म्हणाले की तुमचा कोण आहे तो हाती धरून काढा याप्रो संकराजीपंतानी गावकरियासी आज्ञा आत्र्याविसीं केली मग गावकरी व पाढर यानी दोघा आत्र्यास टाकून पुरंधरे हरभट यासी काढले की हा आमचा वतनदार खरा म्हणुन काढले आत्रे टाकून दिल्हे मग संकराजी नारायेण रागे भरले उगेच राहिले याप्रो खरे केले आत्रे टाकले

नारायेणाचे देउली इनसाफ गोत सुपे पुणे शिरवल जुनर हे जमा जाहाले तेंव्हा नारायेणाचे देवलांत पुरंधरे घातले तेंव्हा देशमुख पाटील जगथाप पाा सासवडची याणी देवलातून बोढून गोमाजी विश्वनाथ यांस व आणीक दुसऱ्यास काढले की हा आमचा कुलकर्णी देशपांड्या जोसी याप्रा हाती धरून काढले तेंव्हा आत्रे खोटे जाहाले

कर्यातीचे गावांत बेलसरचा मान व आधी मागून दीये तसरीफ विडा दिवाणातून देणे तरी मान याप्रा आहे

बाबांजीचे वडीलानी वतनाची नागवण येकूण साठ रुो दिल्हे वरकड काही नाही आज पावतो म्हणून भाउनी प्रमाण सागितले

---

(ले. ११९) श्री

*शेवसी गोविद सिवराम साा नमस्कार विज्ञापना श्रीमताचा हेत या काली फार आहे की आपण येथे यावे जवल असावे मजला तीन वेल आज्ञा जाहाली व हाली आता रात्री चिठी आली ती पाठविली आहे तरी खामखा याने शरिरास उपाये करणे अगत्य फार आहे आपण वैद्याजवळून बोखत घेतात म्हणून कलले तरी येथे येऊन उपाय करावा वैद्य फार जमा जाहाले आहेत आपल्या शरिराची फालजी श्रीमतास फार लागली आहे यावेच यावे सेवसी शृत होय हे विज्ञापना

---

(ले. १२०) श. १६८२ फा. व. ६] श्री [इ. स. १७६२ मार्च १६

सेवेसी विज्ञापना येथील कुशल ताा फालगुन वद्य ६ पावेतो स्वामीचे कृपेने येथास्तित असे विशेष आपण कृपा करून राजश्री महिपतराव नारायेण यांच्या

* पत्र नाना पुरंदऱ्यास.

पत्रात लाखोटा पाठविला तो पावला सविस्तर वर्तमान कलोन संतोष जाहाला त्यास साप्रत तिडकेमुले श्रीमत नानास शरीस प्रकृत ठीक नाही याजकरता तो अवघाच प्रकार च्यार रोज तकूब आहे हरी गोपाल व आपले जगोबा बोलण्यात असते ते तूर्त च्यार दिवस राहिलेच आहे मागे तरी कोठपावत अले .म्हणतील तरी अपला येकनिष्ट . चळे व होणे अमके असे काही नाही उगेच डव्हलावे मान इतकाच प्रकार वतनाच्या गोष्टीतील नानानी तेरखेची अड मागे धरली होती तिची अड याजकडून हरी गोपाळ जगोबानी सागोन सोडविली की अखेर साली देशपांडेपणाचा रुमालच तुमचे घरी असेल वडील + + + नाव तुमचे दस्तक सालाचे तुमचे घरी उत्पन्न अणून मग अवानी घ्यावे तेव्हा सर्व गोस्टीस खावंद वडील तुम्ही याप्रो सागितले यानी हो म्हटले याजकडून बरे आणि आता आपले जागा विचार करतात की रुमाल नेहमी त्याचे घरी कसा धावा आपल्या जवळ कसा नसावा देशपांडेपणेचा रुमाल साल दरसाल त्याचे घरी नेऊन धावा तेव्हा कुरकर्ण वरसलीप्रो वरकड भावासारखे आपण करून तितका रुमाल मात्र आपले घरी कोण गोष्ट आसी चर्चा आपले आपल्यास करतात नानाकडे हा जाब-साल गेला नाही परतु खराखुराच आहे त्यातील पचायेत्नाने सागितला आहे याप्रो आहे घडेल ते पाहावे हैदरनाइकाच्या रुप्या[चा] लगाम आधानी आपल्या-कडे लाऊन + + न डौल भरले चिनदुर्ग हरपन्नहली ये + + श्रीमतानी दाहा अकरा लाख रुपये घेतले त्याचे हैदर नाइकाने काही बोलू नये आणि वरकड नवाबाची तुमचा मुलूक सोडोन राहिली. श्वस्ताने आपली खडणी आठवीस लक्ष रुपये करार केले त्यात चवदा लक्ष रुपये रोख द्यावे चवदा लक्ष निशेची चिठी सावकारी देऊन पुण्यात पावेसे करावे याप्रो केले गोपालरायाचा भाऊ सोडावा असे याप्रो केले वरकड पुढील तहरह बारीक मोठा करणे याजविसी हरी गोपाळ हैदर नाईका[क]डें काल पाठविले आहेत दादानी आचास सात हजार रुपयाचा किमतीचा चौकडा दिल्हा कलावे हैदरनाइकाचा घरोबा बराच दिसतो जाहाला प्रकार यात रावसाहेबास तिळ पा[प्रा]य सौख्य नाही परतु चालते चालवणार चाल + + + + या उपरी ल्स्कर लौकर माघारे पि[रले] म्हणजे नानाच्या मनात आहे घरीहून तुम्हास अवघ्यास कोल्हापुरास आणावे आपण इकडून यावे असे येक दोनदा बोलले कलावे नानास आपण येण्याविसी वगैरे कामाकाजाची सवसाराची आपण पत्रे ल्हितात त्यात रुक्ष प्रकार कठोर शब्द अपमा . पत्रे श्वदस्तूरचीच येतात त्याजवरून दिक्माव येथे फार होतो आपण येऊ यास त्यात असे करणे युक्त नसे तात्यास खंडेराव दौलतीस . यास सरकारच्या जासुदा बराबरील पत्र नानानी दाखविले या अन्वये या खेरीज लोक आपल्या करण्यास वरकड प्रकारास येथास्तित सतोणते पावतात आणि हे

गोस्ट येक प्रकार दिसते वरकड गोस्टीस मिळत नाही ही नसावी मे[मी?] आपणास इतके नेटून लेहू नये प्रमाण परंतु तुमचे छायेस आहे शीतळ छयाया असवी इतकाच लोभ आहे राग आपण भरतील तरी सर्वश्वे पदरीच आहे सिक्षा करणार स्वामीखेरीज + + + कोण परतु या उपरी नाना[ची व आ]पली भेटी होय तो पावेतो तीन च्यार पत्रे गुलाब असी लिहावी आणि [त्यां]च्या मनांतील मागल्या पत्राचे आन्वय भरलेत ते जाऊ द्यावे आपण म्हणतील इकडील लिहिणे कसे तरी वडीलपणाखाली पोभले जाते आपले काम हे नव्हे हे विज्ञापना.

राजश्री सखोपंत दाजी व खंडेरावजीस नमस्कार व आसीर्वाद विनती उपरी लिा परिसिजे लोभ कीजे भेट लौकर होईल हे विनती.

(ले.१२१)श. १६८३ आश्वि.व. ११] श्री [इ.स. १७६१ आक्टो १४

[1]हजरत शराइत पन्हां काजी आबदुल रहिमान मामले फोंडा तालुका मर्दनगड दाममोहबतहू

छ सु॥ इसने सितैन मयां व अलफ तुम्ही धारवाडचे मुकामीं हुजूर येऊन विनंति केली जे पेशजी सरकारचा आमल मर्दनगडास असता आपलीं ठिकाणे आठ जांबोली पंचमाहाल येथे आहेत ती चालत होती त्याजवरी सोंधेकरांचा आमल किलेमजकुरी जाहालियावरी ठिकाणें सरकारांत ठेऊन पैका सुभांतून देत होते हाली सन सबां खमसैनात पुन्हा किले मजकुरीं सरकारचा आमल जाहाला त्यापासून ठिकाणांचा पैका आपणास पावला नाही तरी साहेबीं कृपाळू होऊन सदरहु ठिकाणें आपणाकडे चालवावीं पांच सालां पैका ठिकाणाचा आकाराबरहुकुम देवावा म्हणौन त्याजवरून बराय अर्ज खातरेस आणुन पेशजीचा भोगवटा व सनदां पत्रें पाहून तीन साला ठिकाणांचा वसूल सरकारांत आला तो नजरेदाखल घेऊन सालमजकुरी सन इसने सितैन सालापासून जांबोली प्रांताची इनाम ठिकाणे चितपसील रुपये

९४८– ता चंद्रवाडी

१ ठिकाण मौजे आवडेपैकी बाग लंगर

१ ठिकाण मौजे चिकसेलवणपैकीतले जमीन

२ मौजे आसोलड पैकी ठिकाणे

१ ठिकाण बाग बोत कातर

१ ठिकाण सेत सोड फातर

२

१ ठिकाण मौजे शेलवडे पैकीं फातराड

५ आकार रुपये

[1] फोंड्याच्या काजीकडील. संपादक द. वि. आपटे, संग्रह भा. इ. सं.मंडळ पुणें. पु.द. १२

| | |
|---|---|
| | ८५८≡ मौजे काकोडे ता मा पैकी |
| श्री० | १ ठिकाण सोनार सेत |
| व्यकटेशप– | १ ठिकाण तार्बीट सेत |
| दांभोज व्यंकटेश त | १ ठिकाण पीडा सेत |
| नूभुवः । नारायण– | — |
| स्य...स्य मुद्रा ज | २ (?) |
| यति सर्वदा | आकार रुपये |
| —— | ठिकाणे आठ |
| १७९। | ८ |

येणेप्रमाणे ठिकाणें आठ येकून आकार येकसें सवा येकुण आइसी याचा इनाम करार करून दिल्हा आसे तरी पुरातन भोगवटा चालत आल्याप्रमाणे सदरहू आठ ठिकाणें तुम्ही व तुमची आवलाद व आफलाद आनभऊन सुखरूप राहाणें जाणिजे छ २४ रबिलोवल मुकाम धारवाड

लेखन सीमा

---

(ले.१२२) श.१६८३ कार्ति.शु. १०] श्री [इ.स.१७६१आक्टो.२८

मा। जनाम देशमूख व मोकदम देसपाडे कसबे सासवड को। मजकूर यास माधवराव बलाल प्रधान सुहूर सन इसने सितैन मया व अलफ मलोपा वाणी नातिपुतेकर को। मजकुरी दाणे विकायासी घेऊन आला याचा बैल चोराने नेला म्हणोन हुजूर विदीत जाले ऐसीयास गावचे रखवालीस बेरड ठेऊन बदोबस्त करावा तो करीत नाही चोऱ्या चपाट्या होतात हे गोस्ट कार्याची नाही तरी तलाश करून वाणीयाचे बैलचे ठिकाण लाऊन देणे पुढे बेरड दोघे रखवालीस ठेऊन चोरांचा बदोबस्त करणे येविसींचा फिरोन बोभट येऊ न देणे वाणियाचा बैल ठिकाणी न लागते तरी बैलाचे लिगाड वारून देणे जाणिजे छ २९ रावल

[शि. ले. सि.]

---

(ले. १२३) श्री

राजश्री मोकदम मौजे चांबली गोसावी यासी

श्री मोकदम मौजे बोपगाव राम राम विनति उपरी आमचे गावची सुडी चोराने नेली ह्याचा तुम्ही व आम्ही व रामोसी सरकारात गेलो तेथे तुमच्या व आमच्या विचारे ठरले की दोघा रामोसीयानी चोरी भरून द्यावी ह्यावरून तुमचा रामोसी आमच्या गावास यावयाचा करार केला तो आद्याप आला नाही

त्यास कुणबी सुडी मलित नाही तरी रामोसी पाठऊन द्यावा आणि फडश्या करावा बहुत काय लिहिणे हे विनती

---

(ले.१२४) श. १६८३ पौ. शु. २] श्री [इ. स. १७६१ दि०२८

मा अनाम देशमूख मोकदम का सासवड यासि माधव[मा. ब. मु. शि.]राव बलाल प्रधान सुा इसने सितैन मया व अलफ का मजकूरच्या रयेतीस तुम्ही मनमाने तसा उपद्रव देता म्हणोन हुजूर विदित जाले त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी आपला आपला हक खाऊन असणे रयेतीस जाजती उपद्रव करून तजावजा केल्यास कार्यास येणार नाही पष्ठ समजोन वर्तणूक करणे जाणिजे छ १ जमादिलाखर आज्ञाप्रमाण (लेखन सिमा)

---

(ले.१२५) श.१६८४ पौष. शु॥१३] श्री [इ. स. १७६२ दिजें.२९

श्रीमंत् राजश्री आपा स्वामींचे

सेवेसी विनंती सेवक गणेश केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा छ १३ जमादिलाखरपर्यंत स्वामींचे कृपेकरून येथास्थित असे विशेष स्वामीचा निरोप घेऊन निघाले ते सातारियासी सुखरूप पावलो श्रीमत सातारियासी येऊन दोनच्यार दिवस जाहाले मग राजश्रीचा निरोप घेऊन मिरजेस गेले सातारकर कारकून व चौकीदार वगैरे याची यादी घेऊन लस्करांत पुसेसावलीपर्यंत च्यार मुक्काम बराबर गेलो यादी श्रीमंतानी पाहून श्रीमंत राजश्री आबा व (राजश्री) बापू......दुसरे दिवसी यादी आबानी सखाराम बापू याजकडेस पाठऊन दिल्हा त्याणी विसाजीपंत लेलेयासी आबाकडेस पाठऊन दिल्हे आणि आबानी व विसाजीपंती यादीवरी मखलासी करून दिल्ही पंनास चौकीदारपैकी चालीस माणूस करार करून दिल्हे व जासूद दाहा आसामी करार केले माली आसामी २० वीस होते त्याजपैकी दाहा माली करार केले वरकड कारकून आबाची व नाना + + + स्वामीची वरकड नारो भास्कर व बालाजी माणकेश्वर व माझी अनंदराऊ व भिकाजी प्रभूची यैसा करार करून दिल्हा वरकड कोठीस कारकून नारो बलाल व बालाजी विठल गोविद कासी व गोविद बाबाजी वेकाजी राम (याणी) हुजूर चाकरीस यावे म्हणौन सागितले आहे इतकी मखलासी करून दिल्ही आहे आद्यापि रोजमरा कोणास दिल्हा नाही व कारभाराचेहि डौल चागलेसे पडिले नाही वेकाजी माणकेश्वर राजश्री नानाचे वाड्यात येऊन राहिले आहेत आम्ही स्वामीच्याच वाड्यात आहो सिदोजी बोरकर पिपलेचे कागद घेऊन आला राजश्रीपासी उभा राहिला की येक चावर जमीन आईसाबी इनाम दिल्ही आहे तिची राजपत्रे करून द्यावी येवीसीची स्वामीची आज्ञा [एक ओळ फाटली] याणी स्वामीच्या पत्राचा उजूर धरिला आहे येविसी वेकाजीपंती स्वामीस पत्र लिहिले आहे त्याजवरून कलेल स्वामीची

फडनिसीची वस्त्रे श्रीमत राजश्री आबानी घेतली आहेत आद्यापि कोणी नवा फडनिस आला नाही राजश्रीचा प्रकार (स्वामीस) कळतच आहे वरकड येथील वर्तमान सिदोजी घोरकर सागता कलो येईल लोकाची हजरी येका दो दिवसी जाहालीयावरी तपसिलवार वर्तमान सेवेसी लिहून पाठवितो विदित जाहाले पाहिजे कारकून श्रीमतानी दूर केले म्हणवून श्रीमत् राजश्री नाना मजवर रागे आले मजला पुसिले की तू चाकर आबाचा की आपाचा मग मी सागितले की मी चाकर राजश्री आपाचा त्याणी दूर केले तर जासील की काये मग मी नाना यासी सागितले की त्याचा चाकर त्या + दूर केले तरी सुखरूप आपले घरास + + + काही बोलले नाही विदित जाहाले पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

(ले.१२६) श. १६८७ ज्ये. शुा ४] श्री [इ.स. १७६५ मे २३

० श्री ०
मार्तंड चर-
णी तत्पर श्रीनि-
वास शामराज
निरंतर

आज्ञापत्र राजश्री श्रीनिवास शामराव ता मोकदमानी मौजे कुमठे पाो खटाव सुा खमस सितैन मया व अलफ मौजे आबवडे का निमसाडे येथे चोरी जाली त्याचा माग मौजे मारास आला तो तुम्ही पदरी घेऊन चोरीचा फडशा करून देऊ म्हणोन कबूल कतबा लेहून दिल्हा असता आद्याप चोरीचा फडशा होत नाही म्हणोन विदीत जाले त्यावरून हे आज्ञापत्र सादर केले असे तरी सदरहू चोरीचा फडशा करून यास जलद मसूरचे मुा येणे या कामास लोक दिमत तुकोजी नाईक पाो यास मसाला रुा ५ पाच देणे जाणिजे छ २ जिल्हेज मोर्तबसुद

(ले.१२७) श. १६८७ आषाढ वा ३] श्री [इ. १७६५ जुलै ५

पौ श्रावण शुध १५

श्रीयाविराजित राजमान्य राजश्री अताजीपत नीळकंठ दादास्वामी गोसावी

यासी सो रामाजी खुवाफली [?] मुा आवरया कृतानेक सा नमस्कार विनती उपर येथील वर्तमान आस्याड वदी ३ पावेतो येयास्थित आसे स्वकी कुशळ लेखकास आज्ञा केली पाहिजे विसेसू स्वामीजीची आज्ञा घेऊन स्वार जालो ते आवरयास सुखरूप पोहचलो काही चिंता न करने येथील वर्तमान तर या प्रातामधे तीन फौजा फिरल्यात ता रा मल्हारजी होळकर यानी पार धूम केली इटावा लुटून पस्त केला कुराजाहानाबाद लुटून पस्त केली काल्पी ता लुटून मुलूख खराब केला तो काही बोलता येत नाही काल्पीवर फिरगी आले त्याचे भयास्तव

होळकराची फौज फिरून झासीच्या मुलकात गेला दुसरी आवरया लुटावयाच्या फिकीरीत होता परंतु रा बालाजी गंगाधरपंतानी आपल्या जोरान आवरया बाचवली वरवट फर्फुंदसुधा लुटून पस्त केली तितक्यात रोहेल्याची फऊज हापीस साठ सतर हजार घोडा घेऊन आला त्याकरिता होळकर निघून गेला आवरयात ठान रोहेल्याच जाल बारा रोज उमरगडासी मार जाला उमरगड रोहेल्यानी घेतला गढी खानून जागा विध्वस्त केली रा गोविंदपंताचे पुत्र येमुनेपार रायेपुरात बसले आहेत पैलपार आमल रोहेल्याचा जाला याकरिता येथ आखील त्याहाचे मांडीवर बसले आसू मोठी विपत आहे ते लिहिता पुरवत नाही त्याहाचे मानूस सव घेतो तेंव्हा दिली कड जातो ईस्वर आब्र ठेवील तर उतम आहे नाहीतर जे प्राक्तनी आसले ते होईल दुसर येथ आजपावेतो याहाचे समागम पळन सोसली आतां आवरयात आसू येथ जोरजरब करता बनत नाही त्याहीमधी आपन याहासी धरन धुरन केले दोन उपोशन आहां केली आनी दोन उपवास त्याही केले आस्नात राहिलो तेंव्हा येथ चौधवानी मिळून पंचाईत केली जे येकसरसे रुपये कसे मिळतील त्यास तुम्ही मुदल रुपयाच्या किस्ता करून दरसाल नागपूरचे दुकानावर किस्त आपली घेत जान [ अपूर्ण ]

---

(ले.१२८) श.१६८७ आश्वि. व॥१३] श्री [इ.स. १७६५ आक्टो.१२

चिरंजीव राजश्री बजूस प्रति त्रिंबक सदासिव आसीर्वाद उपर येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेप तुम्ही पत्र सोळावे रबिलाखरचे गोपालराव दादाचे माणसाबरो पाठविले ते नुस्ते मोघम पाठविले हैबती भाउला सुभाना जोरायाबा सर्व लिहिले आहे म्हणून लिहिले त्यास ते काही आद्यापि आले नाहीत येतील तेंव्हा कलेल परंतु सनगे या माणसाबरावर पाठविली त्याचा जाबहि लिहिला नाही हे काय तरी चागले समजस लिहीत जावे तुम्ही पत्रे येथील ग्रहस्तास पाठविली ती आम्ही पाहून ठेविली ज्याची त्यास दिल्ही नाहीत का की पत्रे दाडगीवोसेपणे लिहिली कोणास कसे ल्याहावे कोणास आपले हाते लाबलचक गोड ल्याहावे कोणास दुटप्पी ल्याहावी हे पधत आद्यापि तुम्हास उमजेना काय म्हणावे मोरोबा दादा बालकोबा रामचद्र गणेश यास पुर्ता कागद लिहीत जावा आपले हाते सारे लिहीत जावे विनंती उपरी इतके मात्र लिहिले होते त्यास पुर्ते लेहून विशेप म्हणून मग पुढे मार गोड लिहीत जावा या उपरी लिहिल्याप्रो पत्रे पाठवीत जाणे गोपालराव दादा यास तीर्थस्वरूप म्हणून लिहीत जावे याचप्रो गोविंद सिवराम तात्यास लिहीत जावे गोपालरायास पत्र पाठवीत जा थैसे सागितले आसतां पत्रे का पाठवीत नाही हे उतम नाही तरी पत्रे पाठवणे जगोबा कधी येईल तेंव्हा येउ खेनटथल कराडाच्या मल्याचे तुम्ही सखोबा फारच चुकला त्यास हरबासी बोलावे की आम्ही समजोन केले नाही त्यास कराड्याचा मला व भिवडीची शेरी सगली

आम्हाकडे बाबानी दिल्ही होती खेनटथल चागले व जमीन जाजती बाबानी घेतली आम्ही मान्य करून इतके दिवस चालो आता आबा आसे करितात तरी सगले खेनटथल आम्हास द्यावे कराडयाचा मला सगला व भिवडीची शेरी आबानी घ्यावी हा येक प्रकार आथवा बानानी केले तसे चालू द्यावे नाहीतर पाणी द्यावे निमेनिम घेउ पाणी देत नाही तरी आम्हास कामास नये नाना येतील मग होणे ते होईल तूर्त कराडयाचा मला सगला आम्हाकडे आहे तसा आसू द्या येैसे बोलणे आणि लिहिल्या प्रकारातून येक करणे तसेच वतनाच्या तोड जोडी दोन तीन नरोजी जासुदाबा लेहून पाठविल्या आहेत त्याप्रो झाले तरी करणे नाहीतर नारो आपाजीचे विद्यमानचे येक वर्ष ते व येक वर्ष आम्ही ते करणे गराडयाचे पाटीलकीचे दस्त्याचे मानपान तुम्ही काये काये घेतले हे लिहिणे पिराजी भुजाजी आपाजी याचे परस्पर कसे हे लिहिणे पिराजी देसमुखाकडील कर्ज सो उगऊ घेणे वरकड बारीक मोठे वरच्यावर लिहीत जाणे रा। आश्विन वद्य त्रयोदसी मु॥ धारवाड हे आसीर्वाद + + + पतास जागा बोलतील देणे हे असीर्वाद पौ छ ७ जावल

---

(ले.१२९)श.१६८८माघ व.१३] श्रीमार्तंडप्रसन्न [इ.स.१७६७फेब्रु२६

छ ४ रविलाखर (१)

तीर्थरूप राजश्री नाना वडिलाचे शेवसी—

आपत्ये बजूने चरणावर मस्तक ठेऊन सा। नमस्कार विनंती येथील वर्तमान माघ वद्य त्रयोदसी मु॥ सिरे येथे सुखरूप आसो विशेष..... मान तरी सिरेकर मिरजा + + + श्रीमंतास भेटला हाजार गाडदी व हाजार स्वारानिसी चाकरीस ठेवावा याप्रमाणे करार जाहाला कलावे सविस्तर वर्तमान फाल सेटी खिजमतगार याजबरोबर सेवेसी लिहिले आहे. त्यावरून कलो येईल आम्ही खुशाल आहो आपण चिंता न करावी सेवेसी शृत होय हे विज्ञापना

सेवेसी बालाजी कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनती श्रीमताचे दैव थोर तेणेकरून महत्कार्य सिधीस गेले किल्यामध्ये लडाईचे माणूस पाच सात हजार पाचसे पठाण दोनसे तीनसे पिरंगी दा + + सख्या नाही याप्रो होते परंतु पहिले दिवशी निकड जाली आणि मेरे ठासलें हिरमोड केले तोफा घेतल्या तेणेकरून अवसान खता जालें त्याणीहि मारगिरी तोफाची वगैरे बहुत केली परंतु ...... घरून आपली सर्व मंडळी खैर आहे मिर ...... हेहि मोठे कामकाज जाले याजकडे दाहा पधरा स्थले मुरारराव वगैरे मिलोन आहेत हैदरनाइकास बरी जरब बसली परंतु तो कोटगा आहे केवल इतक्यावरच समजोन काही मनसमा करीलसे वाटत नाही न केल्यास पजित पावेल आमचे काये गेले असो प्रस्तुत स्वामीचे वियोग·

जनित चित सचित आहे राजश्री बज्याबाहि स्वामीचे आज्ञेप्रो कृपा करितात आपली भेटी होऊन अमृततुल भाषणें कर्णं तृप्त होईल तो दिवसी सुवर्णांचा आहे स्वामी सर्व जाण आहेत शरीर अशक्त परंतु पोटाकरितां जिलीबींत धावावें लागतें बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनती

---

(ले.१३०) श. १६८९ ज्ये.व. १२] श्री [इ. स. १७६७ जून २३

चिरंजीव राजश्री नाना यासी माधवराऊ बलाल प्रधान आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीणे विशेष खासा स्वारी आज मंगलवारी वानोडीचे मुकामी दाखल जाली उदईक पुण्यास जाऊ तुम्ही यावे भेटीनंतर सविस्तर कलेल रा। छ २५ मोहरम हे आसिर्वाद

पौ छ २६ मोहरम सु॥ समान सितैन

---

(ले.१३१) श. १६८९ भा.व.१] श्री [ इ. स. १७६७ सपटं० ९

[3]पुरवणी भारी पडतो चाकरीस लावावी तर कोण ठेवितो दरबारचे वर्तमान तरी राहुरीचे मुकामी तात्या व चितो आनंत आले तेव्हां त्याची याची भेट व्हावयाचा निश्चय केला प्रतिपदा बुधवारी भेटावे त्याणी पंनास रावतानसी यावे याणी तसे जावे येणेप्रो करार ठरून बुनगे व लोक सर्व ठेऊन कवठ्याहून पुढे गेले ते कटोऱ्यानजिक आहेत भेटी होतील मी बुनग्यात आहे राहवयास सांगितले उदईक जाऊ होईल ते लेहू बज्याबा गेले आहेत शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

(ले.१३२) श.१६८९ माघ शु.१२] श्री [इ.स. १७६८ जाने. ३०

[ शि. म. व. ]

आज्ञापत्र राजश्री पंत प्रधन ता। मोकदम मौजे आबोडी ता। करे पठार प्रांत पुणें सु॥ समान सितैन मया व अलफ मौजे मजकुरास हाजीर बेगारीचा उपसर्ग लागतो याजकरिता हे आज्ञापत्र सादर केले असे तर सरकारचे दस्तकासिवाये हाजीरचे वगैरे ओझे चालो न देणे बलेच कोणी तसदी देईल तर धरून हुजूर पाठऊन देणे *जाणिजे छ ९ रमजान पा। हुजूर (लेखन सीमा)

---

(ले.१३३) श. १६९२ कार्ति. शु.५] श्री [इ.स. १७७० आक्टो. २३

आपत्ये दादाने चरणावर मस्त[क] ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता। छ ३ माहे रजब परियेत सुखरूप आसो विशेष आपण माणकू + लबद

---

* अक्षर निराळें

याजबरोबर पत्र पाठविले ते पावले पत्री आ[ज्ञा] [की] आज श्रीमताचे कूच होऊन (लो) णीस जाणार उपरातिक राजेवाडीस तेथून जेजोरीस तेथून मोरगावास व कुरकुंबास मग वाईकडे जाऊन पुणियास येणार ऐसे वर्तमान आहे तरी जेजोरीचे मुकामी जाऊन भेट घेणे उपरातिक भेटल्यावर श्रीमतानी बरोबर चला म्हटले तर समागमे जाणे काहीच न बोलले तर निरोप मागून मोहूर्त पाहून सेवेसी येतो याप्रमाण करणे व कुरणाचा बदोबस्त उतम प्रकार करणे म्हणून लिहिले त्यास श्रीमत राजेवाडीचे मुका[मी]हून जेजोरीस जाऊन द[र्शन] घेऊन मोरगावी मुकाम [केला] मग तेच दिवसी मारगावास जाऊन श्रीमताची भेट घेतली साईकाली सधेचे समई दरशन जाहाले नमस्कार करताच पुसिले की तुमचे गाव येथून किती कोस आहे तीन कोस आहे म्हणून सागितले मग उगच राहिले उपरातिक बोलिले जे आपा कोठे आहेत प्रति उत्तर केले जे पुणियातच आहेत याप्रमाणे मात्र विचारले मग सध्या करावयास लागले कुरणाचा बदोबस्त करावयास्तव पाचा स्वाराची विनती केली त्यास श्रीम[ता]नी इछारामपतास आज्ञा [केली] की पाच श्वार हुजूर पागेपैकी ताकिदीस देणे त्यास मारनिले यानी तीन स्वार दिल्हे ते सेरीस ठेविले कुरणास व मल्या सेतास उपद्रव किमपि जाहाला नाही उदईक कूच जाहाले ते आहिरे मोरवे या मुकामास गेले मोरगावी मुकाम जाहाला नाही यामुळे उपद्रव काहीच लागला नाही श्रीसोमेश्वरचे वाटेने गेले यास्तव सेरीस ताकीदार ठेविले होते उपद्रव किमपि जाहाला नाही आपल्या आज्ञेवरून श्रीमतास विनती केली की मला आज्ञा स्वारीबरोबर + + समई यावयाची जाली तर येईन नाहीतर मुहूर्त पाहून सेवेसी येईन त्यास श्रीमतानी आज्ञा केली जे मुहूर्त पाहून मागाहून येणे याप्रमाणे बोलिले मग आज्ञा घेऊन घरास आलो कळले पाहिजे दुसरे दिवसी मोरगावीहून कूच करून खासा स्वारी मुरटीसेनारून दोन्ही गाव उजवे घाटून माल्याच्या मल्यातून श्रीसोमयाचे मार्गे गेले मुकामाहून स्वारी निघाली तेव्हा आम्ही उभयेता कासभर आडवे गेलो + + नमस्कार करून बरोबर हाती (?) चालले काही बोलले नाहीत [मु]र्टीच्या पलीकडे स्वारी हाती तेव्हाच श्रीमताना आबारीत निद्रा केली ते सोमयाच्या जवळ माल आहे तेथे येऊन मग उठले मग श्रीमताची आज्ञा घेऊन घरास आलो काही बोलिले नाहीत वाड्याचे वर्तमान किमपि विचारले नाही श्रीमत आपल्या आपण वाड्यात येते तर उपाये नाही याजकरिता वाडा झाडून + नीट करून ठेविला होता बसावयास घालून त[यार] जागा करून ठेविली होती परतु श्रीमत आले नाहीत आणि [वा]ड्यात यावयाविसीहि वि + + केली नाही कलावे मोरगावचे मुकामी भेटीत गेलो तेव्हा दोन नारेल व गाजे जिनस घेऊन गेलो ते पुढे नेऊन ठेविले भाजीपाले पाहिले सतोष जाहाले वाग्याची भाजी व घेवड्या सेगाची ऐशा दोन भाज्या तेच समई कराविल्या

कळावे धाकटे श्रीमंत यानी रो घोडोचा नाना आठवले यास विचारले की हा वाडा कोणाचा आहे मारनिले यानी सांगितले जे वाडा आपाचा आहे मला विचारले की तुमच्या गावापासोन श्रीसोमेश्वर किती कोस आहे त्यास दोन आडीच कोस आहे म्हणून सागि[तले] येणेप्रमाणे जाहाले कलले पाहिजे घोडयाचे वर्तमान व वागजेचे मलबानी लिहिले आहे त्याजवरून विदित होईल उटे राहूटी वगैरे बैल हलालखोराचा बैल ऐसे पाठविले ते यादीप्रमाणे पावले श्रीपती आच्यारी व त्याची बहीण पाठविली ती पावली तिजला मखमलीचे घरी जागा देणे त्याजवरून मखमलीचे घर दिल्हे आहे जानाईच्या देवळाचे वर्तमान तर देवळास दा + व पाने करवणे म्हणोन आज्ञा त्याजवरून सूर्याजी पाथरवटास सांगितले मारनिले सेवेसी आला आहे तो सर्व वर्तमान निवेदन करील देवलाच्या कामात रुपये दोनसे च्यार पावले आहेत आणखी रुपये मागा आसी निकड लाविली आहे तर यास काये आज्ञा करणे ती करावी हे विज्ञापना

---

## (ले. १३४) श. १६९५ आषाढ व. ११] श्री [इ. १७७३ जुलई १५

[1]नकल असल प्रो

यादी श्रीमंत् माहाराज राजश्री सिव छत्रपती सुहूरसन आर्बा सबैन मया व अलफ राजश्री नारायणराव पंडित प्रधान याजपासून कलमें करार करून घ्यावयाची

साल गुदस्ता सन सलास सबैनात मातुश्री आईसाहेब वर्तमान असतां राजश्री जिवाजी भोसले व माहादेव शास्त्री व आकोजी नेवरे व आपाजी शामराव यांचे विद्यमाने करार मदाराच्या यादी ठरल्या आहेत त्यामधी काडीमात्र अंतर न होता निभावावे कलम १

येणे प्रो करार

पेशवाईचे पद तुम्हांस दिल्हे त्याची वस्त्रे व सिक्केकटार तुम्हाकडे पाठविली असे घेऊन सिकेकटार येथे पाठऊन द्यावी कलम १

स्वामीनी कृपा करून सेवकास पेशवाईचे पद देऊन वस्त्रे व सिकेकटार पाठविली तीं वस्त्रे घेऊन सिकेलटार

साल गु॥ चिकोडी मनोली तालुका माहाराजास नजर केला आहे त्यास याउपरी तुम्ही कोणेहि अर्थे माहाराजाचे तालु[की] यात बिघाभर जमीनीचा किंवा पैशाचा लोभ धरू नये कितेकांनी कितेक अर्थे कल्पना चितांत घातल्या तर आणू नये कलम १

येणेप्रो करार

पेशवाईचा गुमस्ता तुम्हाकडील हुजूर पाठवण्याविसी मागे पुढे आग्रह धरूं नये कलम १

माहाराजानी आज्ञा केली त्यास आज्ञे

---

१ नकल हरीपंत फडक्यांच्या हातची असावीसी वाटतें.

ठेविली आणि येथून मुतालकीची सिके-कटार राजश्री येशवंतराव सिंदे याजकडे पाठविली आहे त्याचे हातून माहाराजानी सेवा घ्यावी करार

प्रो गुमस्ता पाठवावयाचा आग्रह धरणार नाहीं करार

येणेप्रो चार कलमे करार केली असेत त्यास हाली करार जाहाला आहे त्याप्रो सेवकाचे लक्ष धरावे कोणासी राजकारण व आम्हांस विरुध ते करू नये सेवकाकडूनहि केल्या करारांत अंतर पडणार नाही परस्पर लाहान साहान गोष्टीची दिकत पडल्यास बोलून नीट करावे येविसी कुलस्वामीची शफत असे येणेप्रो करार

छ २४ शाबर आषाढ सन आर्बा सबैन मया व अल्फ

---

(ले.१३५) श्री

[1] संध्याकाल जाहाला म्हणजे बसत जावे मातबार माणूस येत सचीवपंत वगैरे त्यांची जसी योग्यता तशी ताजीम घेत जावी गोष्ट उतम बोलावी दुसऱ्या माणस आपणहुन बोलवावे हे उतम

[2] सायकाली दोन घटिका तिरंदाजी होते तदोतर बसतो मला सचीव आलेचे आतले कलले नवते

---

(ले.१३६) श्री

[3] हे नाथ करुणा सिंधे दि + + + + कृपा

राज्यातील स्वपक्ष दुरापक्ष हे आता कोणी चितात न आणावे जेणेकरून स्वामकार्यावर सर्वांही लक्ष देऊन उदित कार्येयास पावे

भवानीस दाहा रु॥ देणे परंतु त्यास सागणे कोणास न सागणे मडलीस देखील

---

(ले. १३७) श्री

श्रीमंत राजश्री पाटीलबावा स्वामीचे सेवसी

आज्ञाधारक मल्हार शामराज सिर साष्टांग नमस्कार विज्ञापना येसी जे

---

१ हा मजकूर बज्याबा पुरंदरे याच्या हातचा.

२ हें उतर नारायणराव पेशव्यांच्या हातचें.

३ हा मजकूर खुद्द बज्याबाच्या हातचा असून एका सौवराव दाभाडयानी लिहिलेल्या पत्राच्या चिठोऱ्यावर लिहिला आहे.

स्वामीनी कृपा करून हस्तआक्षरेचे पत्र पाठविले ते उतम समई पावोन परम समाधान जाहाले तर स्वामीनी थैसेच निरतर पत्री सेवकास साभालीत जावे तेणेकरून सेवकाचा साभाल होईल वागजेहून दाणे आणविती म्हणून लिा त्यास सर्व फिकीर आपणासच आहे म्या ल्यावे थैसा आर्थ नाही आपण आहेत तेथे फिकीर करावी थैसे नाही व सिगरे चालवीत आसतो म्हणून लिा त्यास उतम फरितां कटमाल घोडी तुम्हच्या उपयोगी पडे थैसे करावी लागती ते दसरा जाहालीयावर आम्हीहि येऊ मग फेरीत जाऊ तुम्हाकडूनच पेरऊ व नरमंदेचे फराचे व पायाचे वर्तमान कैसे आहे हे कलत नाही तर तपसिलवार ल्यावयास आज्ञा फरावी व येथील वर्तमान तर श्रीमताची मर्जी तुम्हावर उतम आहे आम्ही आलिया तागाईत यासी काही रागे भरले नाहीत व वरकडहि ग [ग्र] हस्त आवतर येतात ते आपलेविसी उतमच गोष्टी सागतात तेणेकरून मर्जी उतम आसे काही चिता न करावी व दरबारचे वर्तमान तर आज मोगलाकडील वकील येथे येणार श्रीमताच्या भेटी होणार आहेत व वानवडीवरून दसरा जाहालीयावर कूच करणार आहेत येणेप्रमाणे राजकी मजकूर आहे व घराव वर्तमान तर तमाम श्रीमतानी मुसदी लोकाचा सरजाम झाडून लेहोन आणविला आहे त्यास आमचाहि ल्याहोन नेला त्याचा शोध मनास आणला तो ज्याजा आधिक असल त्याचा दूर करावा अथवा थोडा असल त्यास द्यावा थैसे वर्तमान आहे त्यास यापूर्वी रो गोपाळराव व हरी गोपाळ याजपासी श्रीमंत बोलले होते त्याचा उगम काहीसा दिसोन येतो थैसे भासते काही आपले नावे होवे थैसे आहे इतकीयावर ईस्वरसता प्रमाण पुढे काये वर्तमान होईल ते सेवसी लेहून पाठवितो आम्हास निजध्यास सर्वसे लागला आहे यात काये होईल पाहावे वरकड वारीक मोठे वर्तमान भेटीआती निवेदन होईल सारावंश जे सेवकावर कृपा पूर्ण असो द्यावी बहुत काय लिहिणे हे विज्ञापना हेच रा जानराव उघडे याचे रामराम ताजाकलम दादाकडून माणकूचे लिा आले आम्ही ठेऊन घेतला म्हणून लिा म्हणजे दूर होत नाही नाही तर दूर करितात.

---

(ले.१३८) श.१६८७ आश्वि.व.१२] श्री [इ.स.१७६५ आक्टो० ११

नकल

कौलनामा राजश्री सकाराम भगवंत ता जागोजी व भवाणजी व
सकोजी मल्हारजी व माहादजी लक्षुमण बीन दमाजी साली मातेकर
सेठे सुा सीत सीतैन मया अलफ

सेके १६८७ पार्थीवनाम सवछरे तुम्ही येऊन विनति केली की मौजे हिवर तरफ कडेपठार प्रां पुनं येथ आपण घर बाधोन पेठ भरवितो: साहेबी जागा नेमून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे आपण कुल घेऊन येतो आणि घर बांधोन राहातो

बाजारामुळे मामलतीस तोटा येतो याजकरिता लिहिले असे बहुत काय लिहिणे हे विनति

---

(ले.१४१)श.१६९४ कार्ति.शु॥७] श्री [इ.स.१७७२ नोव्हेंबर नकल

राजश्री मोकदम मौजे हिवरे गोसावी यासी श्री समस्त माहार मौजे मार कारणे लेहून दिल्हे ऐसे जे श्रीमंत बापूसाहेब यानी पेठ भरविली आणि गावकुसू बांधले सबब बाजारचे पेठ भरवावयाकरिता तुम्हापासी जमीन मागितली त्यावरून आमची सेताची जमीन सरकारात बाजार भरवावयासी तुम्हीं दिल्ही त्याचा बदल जमीन तुम्ही आम्हास दिल्ही आणि आम्हास माहरवडा बाधावयासी जागा वेताळाजवळ नदीचे काठी दिल्ही तेथे आम्ही घरे बाधून राहू हे लिहिले सही मि॥ शके १६९४ कार्तिक शु॥ ७ 12897.

बि॥ नारो बाबुराव वोकील जोसी कुलकर्णी मौजे मार

१ सुभानजी बीन मधाजी बिा पा गा १ म्हसासी बीन बोलाजी पा कुदले

---

(ले.१४२) श्री

सकल गुणालकरणं अखंडितलक्ष्मी आलकृत राजमान्य राजश्री सदासीव पंडीत स्वामी गोसावी यांस

पोष्य माधवराव बलाल नमस्कार विनति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष मौजे हिवर ता करेपठार पा पुणे हा गाव राजश्री सखाराम भगवत याजकडे इनाम आहे त्यास त्या गावी मारनिलेनी पाच साला वाण्यास कौल देऊन पेठ बाजार भरवणार येविसी वाणी उदमी यास ताकीद जाहली पाहिजे म्हणौन मारनिलेनी विनति केली त्यावरून पत्र लिहिले असें तर आपण आपले ताळुकीयातून वाणी मौजे मारी येतील त्यास पाच साला जकातीचा तगादा न लागे ते करावे रा छ २ जमादिलावल बहुत *काये लिहिणे हे विनति

---

(ले.१४३) श.१६९५ माघ शु.५] श्री [इ. स. १७७४ जाने० १७

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री नारो सिवराम गोसावी

सेवक सदासिव चिमणाजी सचीव नमस्कार सु॥ अर्बा सबैन मया व अलफ मौजे हिवरे ता करेपठार प्रा पुणे हा गाव राजश्री सखाराम भगवत याजकडे इनाम आहे तेथे वाणी उदमी व बेपारी आणून पेठ बाजा भरावयासी पेशजी सन सबासितैनात राजश्री पतप्रधान याणी पाच साला कौल दिल्हा होता त्या प्रा

पाच साले भरली परतु पुर्ती अमदानी जाली नाही यास्तव आणखी सात साला कौल राजश्री पंतप्रधान याजकडील घेतला आहे त्यास मौजे मजकूरच्या बाजारास वाणी व उदमी व बेपारी हर जिनस घेऊन येतील व मौजे मजकूरचे सेटे व माहाजन वगैरे पेठकरी हरएक जागा जिनस खरिदी करून आणतील त्या जवळ जकात न घ्यावी म्हणौन मशार निलेनी हुजूरविदीत केले त्यावरून हे पत्र तुम्हास सादर केले असे तरी मौजे मजकुरी बुधवारच्या बाजारास वाणी उदमी व बेपारी जातील त्याजवल हडप घेऊन जाऊ देणे बाजार करून मशारनिलेची चिठी घेऊन येतील तेव्हा हडप देत जाणे या पत्राची नकल करून ठेवणे आणि हे पत्र सेटे व माहाजन हिरवेकर याजल देणे जाणिजे छ ४ जिलकाद पा हुजूर

बार सुरू सुद बार

पा छ २४ राखर सुा खमस सबैन मया व अलफ बार जानोजी म्हातेकर शेटे साली मौजे हिवरे मजकूर

---

(ले.१४४) श.१६९७ श्रा वा१०] श्री [इ.स. १७७५ आगस्ट २०

राजमान्य राजश्री लक्ष्मण गोपाळ का जकात राजूर माहल गोसावी यास

सेवक भिकाजी विश्वनाथ कमाविसदार जकाती प्रात पुणे व जुनर नमस्कार सुा सीत सबैन मया व अलफ मौजे हिवरे तो करेपठार येथील उदमी व भोवर-गावचे हर जिनस घेऊन मौजे मजकुरी बाजारास येतील त्यास जकातीचा तगादा न करणे म्हणोन सरकारची सनद छ १६ सवाल सन आर्बा सबैनची सादर जाहली त्याप्रो उदमीयासी तगादा न करणे हडपे ठेऊन पेठेहून चिठी जाईल त्याप्रो चिठी ठेऊन हडप देवणे रा छ २२ माहे जमाखर बहुत काये लिहिणे

(अस्पष्ट)

---

(ले.१४५) श.१७०६ कार्ति.व॥ ४] श्री [इ.स.१७८४ नोव्हे. १

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्य राजश्री सकराजी निंबाजी व सिवाजी बाजी गोसावी यासी

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सुा खमस समानीन मया व अलफ मौजे हिवरें ता करेपठार प्रा पुणे येथील बाजाराचा व पेठेचा भोगवटा पेशजीपासून सखाराम भगवत याजकडे चालत आला आहे व बाजार वसवावयास खर्चवेच जाहला तो मारनिलेकडून जाहाला असता हल्ली तुम्ही वाटा मागता म्हणोन हुजूर विदीत जाले त्याजवरून हें पत्र तुम्हास सादर केले असे तरी बाजार वसवावयास खर्चवेच त्याचकडून जाहाला आहे याजकरिता पेशजी चालत आल्या-

प्रों मारनिलेची स्त्री जिऊबाई बोकील यांजकडे बाजारचे उत्पन्न चालेल तुम्ही दिकत न करणें येविसी फिरोन बोभाट येऊं न देणें जाणिजे छ १७ जिल्हेज आज्ञा प्रमाण [लेखन सीमा]

---

(ले.१४६) श.१७०८ चैत्र शु॥२] श्री [इ.स. १७८६ मार्च ३१

तां जानोजी बीन भवानजी म्हातेकर शेव्या पेठ मौजे कोढीत ता करेपठार यास बाबुराव विश्वनाथ सुा सीत समानीन मया व अलफ मौजे मारी मंगलवारचा बाजार भरविला आहे त्याबाा कलमे

बाजारांत मापास आधोली व पांसरी वजनी मापास
१ आधोली जोरी केली येकूण बतीसी
८८१
वजनाने वजन पके साडेच्यार सेर
८८४॥ ९
आदपाव
१ पांसरी बतीसी घेण्यादेण्यास
—
२

सदरहुप्रों आधोली व पांसरी सरकारातून करार करून दिल्ही आहे याप्रों आधोल्या व पासऱ्या बांधून देऊन बाजारात चालवणे

बाजारात कुणबी वाणी उदमी येतील जिनस विकतील त्याचा रुपया घेणे देणे तो इटांव प्रत दौलताबाद प्रत घ्यावा द्यावा सदरहु प्रतीहुन निरस रुपया असल्यास चोकसीने वाजिबी बटा पडेल तो घ्यावा याप्रों सराफास ताकीद करणे कलम१

सदरहुप्रों दोन कलमे करार केली आहेत याप्रों पेठ मारी वैवाट करीत जाणे बाजारास उदमी व्यापारी येतील त्यांस कोणेविसी जलाल होऊं न देणे अभय असे जाणिजे छ ३० जावाल मोर्तब सुद

---

## स्मरणें

(ले.१४७) माघ सुध [श. १७४८ ? ]

देवाजीपंताचा धाकटा पुत्र त्रिंबक याची मुज जाली असे

माघ वद्य १ प्रतिपदा बुधवारी देवाजीपंताच्या पुत्रास राघोबास आपाजी मलार धडफले याणी आपली लेक जिऊ दिल्ही लग्न जाले १

माघ वद्य त्रितियेस मुंजी जाल्या असेत

१ शामराउ अंबाजी बापूजीपंत नानाचे भाचे याचा पुत्र तात्या त्याची माचीस जाली असे

१ बाजी हरी सुभेदार सुपियात त्याच्या मुलाची मुज जाली असे

१ खडो रघुनाय याचा मूल रघुनाथ याची पुणियात जाली असे १

—

३

माघ वद्ये द्वितीयेस श्रीदेव चिंचवड मोरेश्वरचे यात्रेहून थेऊरावरून पुणियास अले राजश्री सदाशिव चिमणाजी पुढे सामोरे गेले होते त्रितियेस पलीकडे बिबिसैदानीपासी राहिले होते तेथेच राहिले चतोर्थीस चिंचवडास गेले.

---

श्री [ इ. स. १७५१ मे ११

स्मरण रूपगीर गोसावी गणेशखिडीपासी होता त्यास बर वाटत नव्हते त्यामुळे त्याचा गुरू सुसामधे समाध आहे तेथे गेला होता तेथे च्यार पाच रोज जाले काही उतार नाही यामुळे उठोन सोमेश्वरी येऊन वोवरीत निजेला वाखा फार जाला त्यामुळे त्याणे काही तीन रोज पाणीदेखील तोडाकडे नेले नाही वाखाही जाला होता तोही + + तारा खाले आला मग म्हणो लागला + + + + जीत समाध देणे त्यांस फार + + + ये करू लागला मग सिवराम बावाचे कारभारी त्रिंबकपंत पुणियात होते त्यास बोलाऊन सोमेश्वरी आणिले आणि यास सांगितले की मजला समाध जीत देणे त्याणीहि आग्रह फार केला परंतु येकना + + जीत समाधाचे साहित्य करून (वै)शाख वधे १३ मंदवारी साईकाली समाध जीत घेतसी सन ११६० सके १६७३ प्रज्यापती नाम सवछरे तेरीख २५ जमादिलाखर.

---

शके १६८१ सन ११६९] प्रमाथीनाम सवसरे [इ.स. १७५९ सपटं० २१

भाद्रपद वद्य आमावाशा मंदवारी परवतीस श्रीमंतानी पक्षाची दक्षणा दर आसामीस येक रुपयाप्रमाणे द्यावयास ब्राह्मणास कारकून पा दक्षणा मध्यरात्रपर्यंत दिल्ही सात आठ हजार ब्राह्मण जाले मध्यरात्री सोडिले ते येताना आंबीळ वोहळेस पाणीयाचा लोढा येऊन च्यार पाचसे ब्राह्मण वाहून गेले दुसरे दिवसी मुरदे श्रीमतानी उमगविले से दोनसे सापडले त्यावर नदीने लांब वाहून गेले जागाजागा सापडले तेथे मूठमाती देविली त्यामधे फुरसगीचा कुळकर्णी चितोबा राहाणा वाहवला व विठोबा फावळा कुळकर्णी मौजे उरली ता हवेली याचा लेक जेष्ट होता लग्न जाले नव्हते तोहि वाहवला आसे ब्राह्मण सात आठसेपावेतो बुडाले आसेत श्रीमंत फार श्रमी जाले मोठे आरिष्ट जाले

---

श.१६८२सन ११६९] प्रमाथीनाम सवछरे [इ.स. १७६० मार्च १८

चैत्र शुध प्रतिपदा श्रीमंत भाऊसाहेब व विस्वासराऊ गिल्च्यावर रवाना केले

इ. स. १७६० दिसें०] विक्रमनाम सवछरे [शके १६८२स.११७०

स्मरण

फतेसिंग भोसले कार्तिक वद्य                मृत्य पावले समागमे दोघी स्त्रियानी सयागमन केले १

संभाजी राजे यास मार्गेसीर्ष शुध                देवआज्ञा जाली १

मार्गेसीर्ष शुध १३ मंदवारी निरजीव चहिरोचा वेगळे निघाले १

मार्गेस्वर वद्य                माहादाजी खंडेराऊ देसपांडिये कोल्हापुरास गेले होते तिकडून येताना सनिपात होऊन                येथील मुकामी मृत्य पावले त्याची क्रिया                याणे माहोलीसंगमी केली निबक खंडेराऊ करावयास गेले होते त्यानी करू दिल्ही नाही

श्रीमंत राजश्री नानासाहेब याणी दुसरे लग्न राक्षसभुवनाचे अलीकडे कोसावर गाव आहे तेथे केले वधू देशस्त                बाबरा सराफ पैठणकर याची कन्या आठा वरसाची होती ते केली मार्गेश्वर वद्य ८ सोमवारी लग्न लागले आसे

मार्गेश्वर वद्य आस्टमीस विठोजी नाईक व मैनाबाई देसमूख निराळी निघोन खानवटीयास गेली

---

] श्री [ इ. स. १७६१ जुलै १९

स्मरण अशाढ वद्य २ सह त्रितिया रविवार शके १६८३ वृशानाम संवछरे छ १५ जिल्हेज सन ११७१ सहूर सन इसने सितेन मया व आलफ ते दिवसी राजश्री माधवराऊ बलाल यांजला मातुश्री ताराआऊसाहेब याणी पेसवाईची वस्त्रे दिल्ही सिका शाहू महाराज याचे नाव घालून करून दिल्हा नाना पुरंधरे व आबा पुरंधरे याजला बरावर वस्त्रे दिल्ही नानाचा मजुरा मुतालीक म्हणून देविला रघुनाथ बाजीराव यासहि वस्त्रे दिल्ही सोमवारीं कूच करून भुईजेवर राहिले बुधवार तिसरा प्रहरा पर्वतीस आले पाचा घटका रात्री घरास आले याप्रो जाले आसे

श्रावण वद्य ११ येकादसी वार [ पुढें कोरी जागा ]

शके १६८३ वृशानाम सवछरे छ ९ मोहरम सन हजार ११७१ ते दिवसी प्रातःकाळी आबा मजमदार आयाबाचा पुत्र मृत्य पावला [इ.स. १७६१ आगष्ट १०]

---

चित्रभान सवसरे [सके १६८४ सन ११७१

स्मरण चैत्र मास

श्रीमत रा रघुनाथपत दादा याचे पुत्राचे बारसे वडगाव नेबरज येथे जाले सुध द्वितीयेस नाव भास्करराव ठेविले आसे [इ. १७६२ मार्च २७]

नारो आपाजी याणी रामनवमीचा उत्छहास आरभ केला तुलसीबागा-सेजारी धर्मशाला केली तेथे उत्छह केला [इ. स. १७६२ एप्रिल ३]

वैशाख वद्य शष्टीस बहिरोबाचा पुत्र बापू याचे लग्न वाडे गव्हाणी दिवसाचे लागले

वैशाख वद्य आमावाशेस चिरजीव सौभाग्यवती सईस न्हाण आले.

जेष्ट सुध पचमी रा नारायेणराऊ पेसवीयाचे पुत्र याचे मुजीचे लग्न लागले [इ. स. १७६२ मे २८]

*पेशवे गेले उपरी। चित्रभानु सवत्सरी। कळ निघाली घरी. ॥जी॥ बापू (घू?) फडणिस आखत्यारी। त्रिंबक मामा फितुरी। मिर्था गोपाल हरी [गोविंद] ॥ जी ॥ तिघाजणाची गट्टी। करणी विचारली खोटी। त्यात गोपिका सुदरी ॥ जी ॥ दादासाहेब धरावा। धरून कैद करावा। नेऊन घालावा गडावरी। विश्वासराव लहान थोर आपल्या आध्यान। राज करू चौघेजण ॥ श्रीमत भाऊ-साहेब गेला। दक्ष[ण]देशी काळ आला। भले लोक ऐका चित्त देऊन ॥ १ ॥

[एका अप्रकाशित बखरींतील हा प्रसग पुढीलप्रो वर्णिलेला आढळतो मो. वही पृ. ६१]

"दादासाहेब राज्य करू लागले हे गोपिकाबाईस न साहे म्हणौन गोपालराव हरी [गोविंद पाहिजे] मिरजवाले यासी विच्यार करून दादास कैद करावे आणि राज्य रावसाहेब याणी करावे हा विचार केला तो पार्वतीबाईस कलला तेव्हा दादाकडे येऊन सागितले की कराग्रहात पड [पडाल] तर विचार करावा ऐसे सागितले तेव्हा दादासाहेब स्नानसध्या करीत होते ती आटपून पागेत येऊन उपलाणी घोड्यावर बसोन वडगावास आले मागून जिलब वगैरे घोडे हती दादाचे निसबतीस होते ते आले च्यार पाच हजार फौज घेऊन पुणताब्यास गंगा-तिरास गेले"

स्मरण सके १६८४ चित्रभाननाम सवछरे जेस्ट सुध त्रयोदसीस मृग निघाला सन ११७२ सुहूरसन सलास सितैन मया आल्फ [इ. स. १७६२ जून ४]

---

* हा पोवाड्याचा त्रुटित चरण तुकाराम रगनाथ गोसावी रा. मौजे घोणीत ता इगतपुरी जिा नाशिक याच्या तोंडून ऐकावयास मिळाला. तुकाराम हा जातीचा गोंधळी असून त्याच्या घरच्या बाडात हा सबध पोवाडा आहे असें तो म्हणतो.

जेष्ट वद्य पंचमीस मल्हारजी होळकर पुणियास आले [ इ. १७६२ जून ११

जेष्ट वद्य सप्तमीस श्रीमंत राजश्री माधवराव स्वारीहून रात्रौ घरास आले [ इ. १७६२ जून १३ ]

सर्वधारीनाम संवछरे जेस्ट वद्य द्वितिया शुक्रवार मिती शके १६९० [ इ. १७६८ जून ३ ] ते दिवसी श्रीमंत राजश्री दादासाहेब व श्रीमंत राजश्री माधवराव पंत प्रधान नजीक घोडप किल्ला मेणे तिकडून दादासाहेब जमीयतसुधा आले व इकडून पुण्याहून रावसाहेब जमावसुधा फौज वीस हजारपर्यंत होती सरदार गोपाळराव व नारो शंकर व रास्ते व माहादजी सिंदे वगैरेज खासगीचे लोक येैस मिळोन झुंझाचा दिवस जेष्ट वद्य द्वितीया शुक्रवारीं पूर्व प्रहरीं लढाईचा मजकूर फौजेने निकाल काढून मग दादासाहेब घोडप किल्यावर गेले त्यालून तोफेचा गोला दादा यारा हातावर गेला वडिलाच्या मनात ममता उपजोन खालते भेटीस आले प्रथम केदारजी सिंदास रावांपासून सोडविला तारांश जेष्ट वद्य ५ पंचमी रविवारी उभयेतांच्या भेटी होऊन दादांकडील दिवानकारभार चिंतो विठल फडीत होता त्याने थोडेसें लढाईचे प्रसंगास फौजसहवर्तमान लागू जाला होता तो धरला गेला जखमहि लागली त्याचा भाऊ मोरो विठल विल्हे लागला गंगोबा होळकरांचा यास आमदानगरचे किल्यावर ठेऊन मजल दर मजल फिरोन पुण्यास दाखल जेष्ट [ आषाढ ? ] शुध आस्टमी बुधवारीं सा घटका रात्रीस खासा आपण श्रीमंत दादा साहेबाचे उजवे बाजूस येका आंबारींत बैसोन बहुत आनंदमये आवध्यां मुदसदेसहवर्तमान आनंदमये घरास पोंहचले आगदी तोफांचे बार जाले नळे चांदजोती गणती लागल्या आसे पर्वतीपासून च्यार घटका गुजरोन सुमुहूर्ते सावें घटकेस दाखल जाले आसेत *श्रीमत रावसाहेबाची पेठ जाहाली तो दिवस

---

श्री

स्मरण सके १६९० सर्वधावीनाम सवसरे मार्गेश्वर सुध ५ बुधवार ते दिवसी इशामतुला पीरजादे नि॥ पीरसैद काजी प्रा पुणे दोन महिने दुखण्या पडिले होते आरशाची वेथा होती रोज मारी तिसरा प्रहरा मृत्य पावले सन ११७८ सुहूरसन तिसा सितैन मया आलफ छ ५ साबान [ इ. १७६८ दिजे० १४ ]

मार्गेसीर्ष शुध्ध ३ सोमवार ते दिवसी त्रिंबक सदासिव ऊर्फ नाना पुरधरे कर्यात सासवड यास क्षेयाची वेथा जाली होती त्यास कोलापुरास जावयास निघोन जात होते............[ इ. १७६८ दि० १२ ]

कार्तिक वद्य ३० शके १६९० ते दिवसी मौजे आलंदी येथील श्री ज्ञाने-

* येथून पुढील मजकूर मागाहून बज्याबा पुरंदऱ्यानें स्व-दस्तुरनें लिहिला.

श्वराचे देवलीवर ध्वजा होती ती मध्येंच जळून दोन तुकडे जाले ते वेलेस बाहेर मोठीयाने शखनाद जाला कोणी शख केला त्याची चौकशी केली परतु ठिकाण लागले नाही यैसे सिवचा परभू चन्होलीहून आला त्याणे सागितले

[ इ. १७६८ दिजे० ९ ]

सप्तशृगी दाहा हजार रुा वाटावयास श्रीमतानी कारकून श्रावण मासी पाठविला होता त्यास कारकून देवीची पूजा करिता कुकू लाविते वेलेस देवीची सिंदुराची खोल झाडून पडिली म्हणौन तेथील ब्राह्मणानें सागितले [ इ.१७६८आगष्ट ]

कार्तिक मासी शंभुमाहादेव याची दिपमाल बसापा खोप्या याणे बाधली होती ती वीज पडून झाडून पडली [ इ. १७६८ नव०–दिजे० ]

आताजी गणेश देशपाडे यास पौश वद्य ३ मगलवारी प्रातःकाली देवआज्ञा जाली [ इ. १७६९ जाने० २५ ]

माघ शुध सप्तमी सोमवारी राधाबाई सितोळी देसमूख याजला पुणियात देवज्ञा जाली बाबुरायाचा व निबकरायाचा कलह पाणी पाजावयाचा जाला तीन प्रहर मढे पडिले होते सेवटी आवघ्या भावानी बळ धरून बाबूरायापासून पाणी पाजविले मोरया वडील नासिका होता तो मालोजी नाईकाचे स्वाधीन केला याप्रा वर्तमान जाले आसे. [ इ. १७६९ फे. १३ ]

---

श्री [ इ. १७७० फे. ९

स्मरण मौजे पासणे ताा हवेली कर्यात मावल येथे सिवराममट चिनाव याणी नवी सालोखा करून बाण स्थापना केली होती त्यास सालमारी सके १६९१ विरोधीनाम सवछरे माघ वद्य च्यर्तोदसी सोमवारी दो प्रहरा दिवसा यात्रेची दाटी फार जाली येक बायेकोचे हातची मिठी बाणास पडून बाण उपटला त्याचे दोन धपले चौपदरी कागदा इतके पातल आणि ती बोटा इतक लाबरुद निघाले सालोखा फुटली यैसाहि लौकिक जाला त्यावर बाण स्थापना करावी तो आस्त होता म्हणून राहिले सिवराम भटाचे पुत्र कृष्णभट याणी बालाजी जनार्दन फडणिस निाा श्रीमत राजश्री पंतप्रधान याजपासी सालोखा व बाण मागावयास गेले त्याणी सागितले की आम्ही तयार करून देतो त्यावर फडणिसानी चौकसी केली की स्वंभूलिंग आहे त्याचे आछादन करून वरता बाण स्थापावा की काये पंडित मेलऊन शास्त्रार्थ रामशास्त्री माहुलीकर यास मनास आणावयास सागितले त्याणी आवघे ब्राह्मण सभ्य जमा करून त्यास पुसिले पुस्तके पाहिली त्याचे विचारे करूं नये यैसे जाले त्यावर सिवराममटानी स्थापना केली ते वेलेचे नन्हरभट पढरपुरे चिचवडी होते त्यास आणून पुसिले की तुम्ही येथाशास्त्र केले की कैसे केले त्याणी सागितले की आम्ही सिवराममटास म्हणत होतो की हे येथाशास्त्र होत नाही करू नये

ते आग्रहही होते त्याचा आग्रह पाहून आम्ही स्थापना केली तेव्हा सर्वांचे मते जाले की पहिले सिवाजी माहाराज याणी केले होते तैसे करावे आलीकडील काढावे यैसे जाले त्यावरून सके १६९२ विकृतीनाम सवसरे जेष्ट शुध आस्टमी मंदवारी रामशास्त्री पासणीयास जाऊन सिवरामभटानी सालोखा स्थापिली होती तिचे उद्वासन संक्लप करून काढली त्या संक्लपास कृष्णभट चित्राव यास बोलाविले त्याणी लेहून पाठविले की आमचे तीर्थरूपी केले ते मोडते यास्तव आम्हास नेऊ नये आपणच करावे त्याज[व]रून त्याणीच केले उपाध्यपण जाले ते सरकारांत नेले त्यावर देव काढिला तो मुख्य लिंगावर घाण सुटली गाळ व खपरे बैसले होते ते काढले लिंगे त्याच्या ध्यानास आली नाहीत लिग नाहीत यैसे म्हणो लागले त्यावर सुध येकादसी सोमवार लक्षुमण चिंतामण यास रामशास्त्री घेऊन गेले लिंगाचे शोध घेतला धुऊन पाहिले लिंगे पूर्ववतप्रमाण आहेतसीजाली त्यास दाखविली त्यावर सिधांत जाला की सिवरामभटानी सालोंखा बैसविली ती फुटली नाही बाण फुटला तो स्वभू आहे त्यास फुटला म्हणो नये याची स्थापना केली पा त्यास वोंवरींत येके दो जागा स्थळ पाहिले ते उतम नाही तेव्हा लक्षुमणपंती आपल्या वाड्यात देवलाच्या दाराचे उतरेस गणपती व विठोबाची मूर्ति स्थापली होती तिची चर(?) प्रतिष्टा होती ते स्थल घ्यावे तेथे सालोखा स्थापावी दक्षणेस ह्या मूर्ति स्थापाव्या याप्रो म्हटले ते आवध्याच्या चितास येऊन तो चौत्रा थरे करून तेथे तोच बाण व ती सालोखा पुनः प्रतिष्टा करून सरकारांतून स्थापिली जेष्ट सुध त्रयोदसी बुधवारी स्थापना केली त्यावर देवलातील मुख्य स्थल होते तेथे चहू-कडून चिरे लाऊन पाणी सांचत होते ते थोडेसे टांकीने फोडून चांगले केले आणि त्याजवर पहिल्याप्रो पातल सालोंखा व धोंडयाची पिंड उचलावयाजोगी करून जेष्ट वद्य सतमी गुरुवारी आर्च्या सुधीस आरंभ करून दुसरे दिवसी समास केली सरकारातून केली उपाधिक सरकारच्या भटानी नेले चित्रावांचे कोण्ही आले नवते ते श्रमीच होते याप्रो जाले आसे

---

इ. १७७२ आगष्ट ४ ] स्मरण सुहूर सन [शके ९४ (?) सन ११८२

स्मरण सुहूर सन

सलाम सबैन मया आलफ माहे जमादिलावल श्रावण मास

छ ४ रोज सुध शष्टी भोमवार बाबुराव राम फडणिस निा रा पंतप्रधान याच्या नाकात फोडी आली होती चार दिवस हैराण होते 'रोज मारी दोन घटका दिवस आलियावर मृत्य पावले काल संध्याकालचा च्यार घटका दिवस आला तेव्हा आसावध जाले बायेकोने सहगमन केले वोंकारापासी दहन केले आसे १

सुध सतमी बुधवार ब्राह्मणास देकार जाला साडेपस्तीस हजार जाले आसेत

---

श्री　　　　　[ इ. १७७३ मार्च ३

स्मरण सके १६९३ खरनाम सवसरे फाल्गुण वद्ये नवमी सुक्रवार सन ११८१ ते दिवसी राजश्री रघुनाथ बाजिराव याणी श्री सोमेश्वर मौजे पासिणे याचे स्वयेंभू लिंग आहे ते मोकले होते पहिले सिवरामभट ,चिनाव याणी बाण सालोखा त्याजवरी स्थापिली होती ते काढून बाहेर मंडपात ठेविली होती ते मागती नेऊन स्वयेंभूवर ठेविली दुसरे दिसी ब्राह्मण पाठऊन पुनः प्रतिष्ठा केली मंत्रपुस्पांजलीचे समई आपण आले भोजन येथेच केले सहश्र ब्राह्मण अगांतुक जमा जाले होते त्यास येकेक रुपया दिल्हा याप्रो जाले आसे आगोधर गुरुवारी तीन चिठ्या लेहून देवापुढे टाकिल्या येके चिठीत आहे तसे आसो द्यावे दुसरीत बाहेरील लिंग नेऊन मांडावे तिसरीत नवे माडावे याप्रो टाकिल्या त्यात प्रथम कुमारीने दो चिठ्यावर हात ठेविला आहे तसे आसो द्यावे बाहेरील मांडावे याजकरिता सवशये जाला म्हणून मागती टाकिल्या तेव्हा आहे तसे आसो द्यावे याप्रा चिठी आली त्यावर सदरहूप्रो केले पासणीयांतील बाग सरकारचा होता तो सखारामपंताकडे होता तो आपल्याकडे घेतला याप्रा जाले आसे छ २२ (?) जिल्हेज

मौजे वाल्हे ता। निरथडी येथील पाटील की फलटणकर निंबालकर यांजकडे होती त्यासी वाल्हेकर आपली म्हणून भांडतात सालमारी थेऊरचे मुकामी श्रीमंत राजश्री माधवराव प्रधान यांजपासी मार पडिला सोयेराजी नाईक निंबालकर होते त्याजला जिल्हेस नारो आपाजीकडे जाऊन जाबसाल करा म्हटले परंतु ते जाउनात नारोपंतानी च्यार बोलावणी पाठविली परतु गेले नाहीत त्यावर पाटीलकी आंमानत करून होळीची पोळी देवाची लाविली रास्ते याकडे गाव आहे त्याचा कारकून सदासिवपंत होता त्याणे होळीची पोळी लावली पाटीलकी त्याणेच करावी निंबालकराकडील गुमास्तीयानी करू नये ऐसे जाले आसे वाल्हेकर बापुराव याचा लेक व आणीकहि वाल्हेकर होते परसोजी वाल्हेकराचा पण(?) गोपाळजीहि होता जुने कागदपत्र नारोपंती पाहून केले आसे छ २३ जिल्हेज

---

श्री

स्मरण सके १६९४ नंदननाम सवसरे जेष्ट सुध द्वितीया बुधवारी प्रायः-कालीची आघरा घटक रात्र राहिली ते समई मृग निघाला आवल साल तेरीख १ रबिलावल सुरूसन सलाम सबैन मयां व अलफ ११८२ [ इ. १७७२ जून ३]

छ ५ रोज जेष्ट सुध सतमी सोमवारी तिसरा प्रहरा सखाराम भगवत बोकील याजला श्रीमंत राजश्री माधवराव प्रधान याणी दिवाणगिरीचा कारभार करावयास सागितला धाकटे भाऊ नारायेणराव त्याचे हाती दिल्हे आपण शरीरी स्वस्थ

नवते म्हणून आवघा नारायेणरायानी सखारामपंताचे विचारे करावे ऐसे जाले मोरो बाबुराव फडणीस करीत होते ते घरी बसले आसेत [इ. १७७२ जून ८]

छ १० रोज बुध १२ पुण्यास सुभ्याच्या खंडण्यास प्रारंभ [जाह]ला आवघ्या परगणीयांची मोजणी केली होती जिल्हेकडील गावची त्याचा आजमास पाहून बि तो उमजून देता खंडणी केली जमीदाराची नेमणूक फारच हलकी केली आसे [इ. १७७२ जून १२]

तिसा सबैन

हजार ११८८ या सालात बज्याबा पुरंधरे व मोरोबा फडणीस धरिले

२ अशाढ मासी

१ बज्याबा वंदनगडास पाठविले

१ मोरोबा नगरच्या किल्यास पाठविले [इ. १७७८ जून–जुलै]

१ सखारामपंत बोकील धरून सिहीगडास पाठाविले माघ मासी शके १७०१ विकारी संवछर [इ. १७८०:फे०]

---

श॰ १७११ आषाढ शु॥ ९) श्री [इ॰ १७८० जून

मिर्जा मुजाफर हात्प शाहाजादे पादशाहा दिलीहून भागानगरास आला भागानगराहून गारदौडास आला नंतर श्रीमंत पंतप्रधान यानी आपल्याकडील माधवराव रामचंद्र व तिमाराव पारसनीस याजबराबर फौज तीनसे लोक देऊन सामारे गारदौडास पा गारदौडेहून घेऊन हाडपसरास आले नंतर श्रीमत पत-प्रधान छ ७ सवाल सु॥ तिसैन मया व अलफ ते दिवसी मुजदी व सरदार व मानकरी सुधा भेटीस गेले भेटी जाल्या श्रीमंतास भरजरी पोशाख व तरवार यकवा (दं ?) त व तुरा मोत्याचा दिल्हा व बालाजी जनार्दन व हरि बलाल यास पोशाख चिलेदाजी दिल्हे रावसाहेब गेले ते वेलस पातशाहाजादे बोलले की, तुम्हारी खुदा तिलाने मिलाफ कर दिया रावसाहेबानी उतर केले की हजरत सच हय नजरा भेटीचे समई खिचड्या होन मोहरा पुतल्या योग्यतनसार हतावर रुमाल घालून पुढे गेले कुरनिशा केला तेच पाउली मागती माघारे येऊन पाठी-मागे न पाहाता रावसाहेब व बालाजी जनार्दन व माधवराव नीलकठ बसले वरकड उभे राहिले वरकड हात जोडून उभे राहिले मानकरी आत गेले नाही तेथून येऊन श्रीमंतास मुजद्यानी व सरदारानी नजरा केल्या पातशाहाच्या भेटी जाहाल्या म्हणोन शके १७११ सौम्यानाम सवछरे सन हजर ११९९

---

# (ले.१४८) शिवापूरकर देशपांडे शकावली



[ आमच्या संग्रहीं शिवापूरकर देशपांडे वहीची, अत्रे यानीं शके १७४५ सालीं केलेली नकल आहे. तींत पृ. ७८ पासून एक पेशवे शकावली सुरू होते. ही शकावली, आजपर्यंत पेशव्याच्या ज्या शकावल्या उपलब्ध आहेत त्या सर्वात, जास्त विश्वसनीय व तपशिलवार अशी आहे. तींपैकीं या खंडात ज्या कालखंडातील विशेष पत्रव्यवहार छापला गेला आहे तेवढ्यापुरता उतारा घेतला आहे.]

१ शके १६८२ विक्रमनाम सवछरे ईहींदे सितैन मया व आलफ सन ११७० विक्रम सवत १८१७ या सवत्छरी श्रावणात तेरा दिवसाचा पक्ष जाहला

१ श्रीमत भाऊसाहेब हिंदुस्थानात दिलीचे ठाणे बसऊन आलीगोहार पातशाची स्थापना करून नारो शकर तेथे बदोबस्तास ठेऊन मुलुखात इब्रामखरावसहित आहेत तमाम सुज्यातदौला व रोहिले व राजेरजवाडे येऊन भेटले आवदआली दिलीस आला होता तो येमुनेपार गेला ठाणेजात फिल्यास त्याचे लोक हादीत रहिमखान व दोदेखान होते पानपती त्यास त्यास धरून घेउन शासन क्रूर केले दाब मोठा बसविला फौज फिरती राखावी ती खदत खाणून जगी सामानाचे भरविसियावर एक जागा उथावणी राहिले ही बातमी अली ह्या चैत्र शुा १ शके १६८२ ताा पौष शुध्ध पानपती आहेत

१ खासा स्वारी पुणियात होती

१ भाद्रपद मासीं चिंचवडचे देव धरणीधरमाहराज मोरगावीहून आले श्रीमत मोतीबागात आसता गैररावतामुळे खबर पावली नाही यामुळे श्रीमत अतर माहालात आसता धरणीधरमाहराज रुसून नदीपलीकडे न उतरता सवस्थानी चिंचवडी जाऊन पावले नतर श्रीमतास खबर लागली तेव्हा श्रीस व्यापले हाते पत्र लेहून कोन्हेर त्रिंबक येकबोटे यास पाठविले त्याणी जाऊन सवस्थानास समारभसहित देवास घेऊन आले श्रीमती नदीपलीकडे डेरे देऊन साहित्य पावते केले माहाराज आले श्रीमती रुप्याचा देव्हारा दिल्हा व हाती देऊन त्याचे खर्चास मौजे माणेरे ताा हवेली हा गाव इनाम करून दिल्हा सतोष करून वाटे लाविले

१ माहादाजी आबाजी पुरंधरे याचा काल कार्तिकमासी जाहाला

१ खासा स्वारी माऊसाहेबाचे मदतीस फौजसुध्धा निघाले जानोजी भोसले नागपूरकर स्वारीबरोबर घेतले

१ श्रीमंत रघुनाथ बाजिराव निराले स्वारी मेदकाकडे रवाना केले ते मुलकात खंडणी घेउन स्वारी करितात

—

४

१ खासा श्रीमंत पुत्र माधवराव व नारायणराव व स्त्री गोपिकाबाई फौजशुध्धा नगरावरून पैठणास गेले तेथे वाखरे देशस्त सावकार याची कन्या नवरी पाहून त्रिंबकरावमामाचे विद्यमाने श्रीमंती लग्न करून मार्गसिर्ष मासी कूच दरकूच निघाले ते नर्मदातीरी गेले तेथे पौष शुा। १३ पानपतचा कासीद सावकारी औरंगाबादेस नवा दिवसानी पावावे म्हणौन आला होता तो भेटला पानपत सोडून आज सहावा दिवस आहे म्हणौन नरमदातीरी दक्षणभागी श्रीमंत बसले आहेत लस्कर उतरतीरास उतरत आहे तो सागितले की आबद-आलीची व दक्षण फौजेची लढाई जाहली फौज बुडाली तेव्हा त्याजवळचा कागद पाहिला त्यात मजकूर दोन मोती गलत दसबीस असेर फितफरकात खुर्देकू रुपयाको गणीत नाही इतका मजकूर चिठीत नाव माना पत्रात नाही ऐसी चिठी होती ती श्रीमंत पाहून नरमदा उतरतीरास येउन कूच दरकूच खेचीवाड्यात राघोगडानजीक टक किल्यास जाऊन पावले बारा हजार जानोजी भोसले व हुजरात मिळोन पस्तीस हजार फौज होती तो वर्तमान आले की श्रीमंत भाऊसाहेब व विश्वासराव याणी दिली प्रांतीचा बंदोबस्त करून आलीगोहर पातशाहा दिलीस स्थापून आबदालीने ठाणी घेतली होती ती घेऊन शासन क्रर करून राजेरजवाडे सुज्यायेतदौला व रोहिले वगैरे मिळऊन घेऊन मल्हारजी होलकर व जनकोजी सिंदे व तुकोजी सिंदे जवल होते दताजी सिंदे भागीरथीचे लढाईत गोळी लागून ठार जाहले मोव्या फौजने अबदाली येमुनापार आणि हे आर पानपतावर छयावणी करून राहिले खंदक लस्करा-भोवता खाणिला तोफखाना भोवता पसरून इभ्राईमखान गारदी जंगी सामान भोवते पसरून राहिले होते यमुनेचे पाणी उतरू लागले शाहची फौज अैल-तिरी उतरून येणार म्हणऊन जागा जागा घाटावर फौजा पाठविल्या गोविंदराव बलाल सागरकर यास दाहा हजार फौजेनसी पाठविले त्याचे डोके शाहने कापून नेले रस्त येईनासी जाहली माहगाई हून लस्कर खराबीस आले तहाची बोलणी लागली ती मल्हारजी होलकर याचे बोलण्याप्रमाणे श्रीमंत ऐकेनात यामुळे सुज्यातदौला वगैरे हिंदुस्थानी राजे निघोन गेले आबदाली येमुना उतरून आला जाग्यावर खंदकाआत राहून तोफखान्याची लढाई होऊ लागली कृष्ण जोशी याचे डोके उडाले बलवंतराव गणपत ठार जाहले विश्वासराव याची लढाई मोठी हातघाईची होत आसतां गोली लागून श्रीमंत ठार जाहले हे वर्तमान भाऊसाहेबास कलले लस्करचा मोड

पु.द.१५

जाहला फौज निघाली भाऊसाहेब उभे होते त्याजवळ तुकोजी सिंदे व जयापाचे लेक जनकोजी सिंदे आसतां आबदालीची फौज बुणग्यावर चालून आली तेव्हां सौ पार्वतीबाई भाऊसाहेबाची स्त्री निघाली तळावर शाहाची फौज गेली त्यारीकडे खंदक होता त्यांत लोक पडून खंदक बुजाला वरोन माणसे पडली न निघाली भाऊसाहेब व जनकोजी सिंदे व तुकोजी सिंदे विस्वासराव मृत्य पावले आथःपर वाचणे काय म्हणौन उभे असतां तिघाचा ठिकाण नाही मल्हारजी होलकर वाट पाडून निघाले व लस्करचा पळ निघाला त्यात पौष शु॥ ६ सह सप्तमी विस्वासराव गोली लागून ठार जाले भाऊसाहेबाचा ठिकाण नाही त्या दिवसात भाऊसाहेब उंबर वर्षे २८(?) आठावीस विस्वासराव उंबर वर्षे १८ आठरा फौज मोडली ही खबर आली टक किल्यावर नीलकंठ माहादेव पुरंदरे पाठविले त्याजबराबर माहादजी सितोले व नारोजी सितोले आभिमानजी जखताप व नारो कोन्हेर व रंगो कोन्हेर होते नारायेणजी सितोले यास सांग लागली बरफडाचे घोडयावर जखमा लागल्या मोर्चे उधळून देऊन किल्यास जाऊन लागले सरकार फौजेचा मुकबला जाहला दुसरे दिवसीं किला लोकास आला त्याचा तह केला तो आबदालीकडील वकील आला की ईश्वरसत्येस इलाज नाही तेव्हां त्याची भेट घेऊन त्याबराबर हुशसभाई मोतदार यास पालखी देऊन रवाना करून श्रीमंत निघोन बऱ्हाणपुरावर अले तो नाना पुरंदरे व बालाजी जनार्दन फडणिस व त्यांची स्त्री व श्रीमंताची स्त्री सौ पार्वतीबाई व लोक पानपतचा पळ आला तो येऊन भेटला श्रीमंत निघोन वैशाखमासी घरास अले नडगेमोडीस लाकडीपूल बांधावयास काम लाविले नित्य पुलाचे कामावर स्वारी जात असतां तिसा दिवसात पूल तयार केला भाऊसाहेबांचे ठिकाण लागावें येविसी कागद पाठवीत होते इस्वासराव मृत्य पावले हा शोक मोठा जाहाला तेणेकरून शरीरीं असस्त जाले वाडियात असतां श्रीमंत रघुनाथ बाजिराव भेदकाकडून स्वारीहून अले त्यास व श्रीमत माधवराव बलाल यास आणखी सखाराम भगवंत बोकील व नीलकंठ माहादेव पुरंदरे यास येकामेकाचे हातात हात घालून राज्य राखा म्हणौन सांगून कोन्हेर त्रिंबक येकबोटे व कृष्णराव पारसनिस यास बराबर घेऊन आपण परवतीस गेले जेष्ठ व॥ १ देवाजवळ वाडियात राहिले

येणेप्रों सन मारी जाले

१. शके १६८३ वृषानाम संवत्छरे सुा इसने सितैन मया व [आल्फ] सन ११७१ विक्रम शके १८१८ राजे भोसले सिवाजीराजे छत्रपती जाले त्या सवत्छरापासोन राजशक राजश्री[ना] चालतो तो शक ८८ गा सवत्छरी श्रीमंत

बालाजी बाजीराव प्रधान याणी राज्याचा बंदोबस्त श्रीमंत रघुनाथ बाजीराव यासी सांगून चिरंजीव माधवरावसाहेब कारभारी सखाराम भगवंत व नीलकंठ महादेव पुरंदरे यास सांगून आपण निघाले परवतीस वाडियात जाऊन राहिले होते त्याचा काल जेष्ट वा। ६ परवतीवर जाहला तेंव्हां जवळ कृष्णराव पारसनीस व कोन्हेरी त्रिंबक होते सौ गोपिकाबाई व नाटकशाळा पलीकडे खोलीत होत्या काल जाहला तेंव्हां रघुनाथ बाजिराव आले त्याणी मांडी दिली नंतर श्रीमंत माधवरावसाहेब आले सायंकाली काल जाहला तेंव्हां पुण्यात दरवाजे लोकाचे च्यार घटिका लागले होते संपूर्ण राजमंडल आष्टप्रधान व सरकारकून व मुछदी सरदार जमा होऊन श्रीमंत नडगे मोडीचे पुलाजवल सार्थक केले अवतार समाप्त जाहला पेशवाई शके १६६२ श्रावणमासी जाहली त्यापासोन पराक्रम करून पंतप्रधान पदावर शाहानशाहा म्हणू लागले संपत्य मोठी संपादिली शत्रू पराभव करून वलयांकित उतर दक्षण पूर्व पश्चम जमाखर्च पाहत असतां जेथवर हात फावला तेथपर्यंत हुकूम चालऊन राजे भोसले याचा बदोबस्त सातारियास राखून आपण राज्य केले पुणियाची वस्ती वाढविली गणपतीचा उछाह करूं लागले वाडियात सात खणी इमारत बांधून नाचाचा दिवाणखाना केला गणपतीचा उछाह तेथे करीत होते सामराज प्रज्या नांदविली कार्याचे मनुप पाहून वाढविले सत्यवेहार खासे व भाऊ रघुनाथ बाजिराव व जनार्दनबावा व चिरंजीव विस्वासराव व माधवराव व नारायेणराव व चिमाजी आपाचे पुत्र भाऊसाहेब व त्याची स्त्रिया व बहिणी *अनुबाई व दुर्गाबाई व कारभारी महादाजी आंबाजी पुरंदरे नंतर भाऊ-साहेब रामचंद्रबावा मिलोन तीन वर्षे कारभार चालला साहा वर्षे भाऊसाहेबी कारभार केला शेवटी नीलकंठ महादेव पुरंदरे हिंदुस्थानची स्वारीतील खानगी महादाजीपंत गुरुजी फडणीसाकडील घेऊन केली एकवचनी कारभार चालत होता आवतार समाप्त जाहला ता। शके मजकुरी वर्षे २०॥।२ यात तीन कारभारी जाहले व रघुनाथ बाजीराव याणी लाहूरपर्यंत ठाणी बसऊन उतर-जिंकिली पूर्वेस निजामआली यास जिंकून मुलूख किले घेतले दक्षणेस श्रीरंगपटण वगैरे पुंड पालेगार जिंकून खंडण्या घेऊन सता चालीविली मुलूक करनाटक काबीज केले पश्चमेस अंगारकीचे पारपत्य करून कोंकण तमाम सोडविले किले विजयदुर्ग व सुवर्णदुर्ग घेऊन वसई वगैरे सवरक्षण केले समुद्रकिनारा संपादून ज्यातीमात्र भाग्यास आणिली बालाजी विश्वनाथ व अंबाजीपंत पुरंदरे याणी पेशवाई पदवी व दिवाणगिरी मेलऊन येवनी

* आता

राज्यात श्वपराक्रमें सता चालऊन मुलुकास कौल दिल्हा त्याचा काल जाल्यावर श्रीमत बाजीराव बलाल याणीं कौल चालऊन मुलकाची लावणी करून श्वपराक्रमें लढाया करून वाडा बाधून सपत्य सपादिली त्याजवर श्रीमत बालाजी बाजीराव याणी पराक्रम विशेप करून राज्याचा उपभोग घेऊन लोक राजी राखोन श्वसतेत सावधपणे वैकुंठवासास गेले कीर्ति केली परवती देवाल्य व विष्णु देवाल्य बाधिले पूजा चालविली बाग व तळे केले पापाणाचे व आळदीचे व थेऊरचे वाटेस झाडे लाविली पुणे शेहरात लोकानी हवेल्या केल्या वस्ती वाढविली पेठास कौल देऊन वाणी उदमी बहुत जाले नादल्या वाड्यास चिरेबदी दरवाजा बुरूज घालून केला चौघडा दरवाजावर ठेविला देवस्थाने चौघडे चालविले मुछदीयास जमिनी इनाम देऊन बाग करविले कामे केली त्यास बक्षिसे दिली मेले त्याचे बालप्रवेशी चालविले शिकार खेलत होते राजमडळाचे अष्टप्रधानाचे चालऊन जवळ बाळगून ठेविले होते न्याये रूवरू मनास आणावा हे करीत होते सेवक लोकापासोन चूक जाल्यास विच्यार पाहून क्षमा करीत होते शेवकाचा गुणग्राह करून अवगुण त्यागून चालवीत शास्त्रज्ञ ब्राह्मण सग्रह फार केले होते श्वता राज्यशेवा करून श्वये राज्य भोग घेतला लोकीक मोठा सपादिला वशात कुलदीपक जाले त्याणी सर्व जातीस दीपवत् केले तो आवतार निध[न] पावला

---

२१

११।१ श्रीमत माधवराव बलाल प्रधान कारकीर्द

॥२ सन इसने सितैन शके १६८३ वृषानाम सवत्छरे सन ११७१ श्रीमत पत प्रधान कैलासवासी जाल्यावर श्रावण मासीं श्रीमत व चुल्ते रघुनाथ बाजिराव व कारभारी नीलकंठ माहादेव व सखाराम भगवत बोकील फौज-सहवर्तमान सातारियास माहाराज रामराजे व ताराऊसाहेब असता दर्शनास गेले त्याणी श्रीमत माधवराव बलाल यास पेशवाईची वस्त्रे जडजव्हाईर तरवार ढाल सिकेकटार दिल्ही व रघुनाथ बाजिराव यास वस्त्रे देऊन प्रति निधी सचीव वगैरे आष्टप्रधानास वस्त्रे चालीप्रों देऊन नीलकंठ माहादेव यास दिवाणगिरीची व हुजूरचे मुनाल्कीचे वस्त्रे देऊन मनमदार चिटणीस हुजूरचे त्यास वस्त्रे जाली व पतप्रधानाकडील बाळाजी जनार्दन फडनिस वगैरे मुछदी यास वस्त्रे दिल्ही तेव्हा नारो घोन्हेर व व रगो घोन्हेर येक घोटे बरावर होते त्यासहि वस्त्रे दिल्ही सर्वांस राजश्रीचे विटे होऊन ताराऊ-साहेबाचा निरोप घेऊन श्रीमन पतप्रधान जाहले पुणियास आले.

१ कार्तिक मासी नबाब निज्यामआलीखां बहादर चालून येतात सबाा स्वारी निघोन मुकाबल्यास गेली तो कार्तिक मासीं मोगल उरूलीवर आला पुणे पलण जाली श्रीमंताचा न नबाबाचा तह होऊन नबाब भागानगरास गेले श्रीमंत करनाटकात स्वारीस गेले कारभारी नीलकंठ माहादेव पुरंदरे व सखाराम भगवंत बोकील कुलकर्णी मौजे हिवरे ता करेपठार प्रां पुणे

१ माहाराज ताराऊसाहेब राजारामसाहेब यांची स्त्री सातान्यास होती तिचा काल जाहाला पंतप्रधानाकडील कारभारी होते त्याणे सार्थक केले. सदरहू सन मारी होऊन श्रीमंताचे धाकटे बंधू नारायेणराव बलाल यांचा व्रतबंध श्रीमंत रघुनाथ बाजिराव याणीं केला कारकीर्द ·॥२

१ शके १६८४ चित्रभानू नाम संवत्छरे सु॥ सलास सितैन मयों व अलफ सन ११७२ विक्रम संवत १८१९

१ श्रीमंत रघुनाथ बाजिराव व माधवराव बलाल प्रधान व नारायेणराव बलाल पुणियात वाडियात आसता कारभारी नीलकंठ माहादेव व सखाराम भगवंत श्रावण मासचा देकार ब्राह्मणाचा परवतीस जाहला

१ श्रीमंत रघुनाथ बाजिराव यांची स्त्री सौ आनंदीबाई यांस पुत्रं वडगावचे बागाचे वाडियात भास्करराव जाले नंतर भाद्रपद मासी श्रीमंत निघोन गंगातिरास गेले.

१ पुणियाचे मुकामीं पंतप्रधानाजवळ त्रिंबकरावमामा कारभार करू लागले हरिपंत फडके आसता गोपालराव गोविंद पटवरधन मिरजकर व बाबूजी नाईक बारामतीकर व पिराजी ना। निंबालकर व हुजरात पागा वगैरे डेरे दाखल आश्विन मासी जाले

१ श्रीमंत रघुनाथ बाजिराव यानी नबाबाकडील मुरादखान फौजेनिसी बराबर घेऊन कारभारीसुधा फौज चालून आली श्रीमंत पंतप्रधान व कारभारी त्रिंबकराव मामा फौजेसुधा चालून गेले मुकाबला होऊन लढाई व्हावी तो पंतप्रधानाचे शरीरीं आश्वस्थ होते लढाई जाल्यास दुतर्फा दौलत सरकारची खराब होईल हा विच्यार करून पंतप्रधान जाऊन भेटले उभयेता येक आंबारीत बसून डेरे दाखल जाले बाबूजी नाईक व गोपालराव गोविंद व पिराजी नाईक व हरिपंत फडके निघोन गेले श्रीमंताचे डेन्यावर रघुनाथ बाजिराव याचे लोक तीन दिवस बसले नंतर सखाराम भगवंत व नीलकंठ माहादेव याणी श्रीमंताचे देण्याचे यादीव[र] रघुनाथ बाजिराव याणी रुजू करीत जावें हा तह होऊन डेरियावरील लोक उठले कारभारी व पंतप्रधान कारभार चालला चिंतो विठल यास फडनिसीचे

काम सांगितले होते ते करितात त्यात नीलकंठ माहादेव यास पुरंदर किल्याच्या सनदा देऊन तेरा लाख रुपये सरदारीस सरंजाम दिल्हा सखाराम भगवत वोकील यास नऊ लाख रुपयाचा सरंजाम फौजेस दिल्हा व महिपतराव चिटणिस यास हजार राउताची सरदारी सांगून तीन लाख याचा सरंजाम दिल्हा नबाबाकडील मुरादखान आले होते त्याची ज्याफत करून वाटे लाविले

१ श्रीमंत रघुनाथ बाजिराव व पंतप्रधान व कारभारी फौजेसुधा स्वारी सातारियास गेली श्रीमंतास पुत्र भास्करराव जाले होते त्याचे नावे प्रतिनिधीची वस्त्रे घेऊन मुतालीक नारो शंकर ठेविले त्यामुळे भवानराव प्रतिनिधी निघोन मोगलाकडे गेले व मोरो बाबुराव फडनिस व गोपाल राव गोविंद मोगलाकडे गेले नागपूरकर भोसलेहि मोगलास जाऊन मिळाले तो श्रीमंताची स्वारी निघोन मिरजेस गेली मोरचे बसऊन सताविसावे दिवसी मिरज घेतली तों मोगल लाखलवाड्याचे घाटे व भोसले उबरीचे घाटे चढून येतात गोपालराव वगैरे त्याजबराबर प्रतिनिधीसुधा फौजेचे जमेतीसुधा येतात असी खबर फालगुन मासीं आली तेव्हा श्रीमंत कूच करून मल्हारजी होलकर बराबर आसता गंगा उतरून औरंगाबाजेवरून कासारबारी उतरून मलकापूरपर्यंत गेले तेथील खडणी साठ हजार घेतली तो मोगल व भोसले व प्रतिनिधी व गोपालराव मोरो बाबुराव फडणिस घाट चढून आले तेव्हा मागे कूच करून औरंगाबादेवर येऊन मुंगी पैठणाजवळ गंगा उतरून खडकतचा घाट चढून नागनल्यावर मुकाम गेला मोगल मागे यावा तो पितुरामुळे मागे न येतापुणियाकडे जाहला पुणे पळाले मुकाम करावा तर लोक मुले लेकरे सभाळावयास जातील फौज फुटेल याजकरिता पुणियाची आशा सोडून उभयेता श्रीमंत ऐसीं हजार फौजेनसी तोफखाना ठेऊन साडे सोळा कोसाचे मजलीने भागानगरास गेले

१ शके १६८५ सुभकृतनाम सवछरे सु॥ सितैन मया व अलफ सन हजार ११७३ विक्रम संवत १८२० राजशेक ९० या सवत्छरी

१ उभयेता श्रीमंत ऐसी हजार फौजेनिसी वैशाख मासी भागानगरी दाखल जाहले तेथे शहरास कुसू लगत मुसानदी याहात आहे यामुळे शहरास हात न लागला बाहेर कारवानपुरा होता त्यापासोन येक लक्ष ऐसी हजार खंडणी घेऊन कृष्णा तुगभद्रा निवृती सगमाकडे फौज चालली तो पुणियात मुतालकीवर नारो आपाजी होते त्याचे पत्र आले की मोगल वगैरे पुणियाकडे आला यामुळे पुणे पळाले मातोश्री गोपिकाबाई व श्रीमंत नारायेणरावसाहेब

हे सिंव्हगडास गेले रुमालवगैरे संपत्ती सिंव्हगडास पाठविली होती त्यास भोसल्याकडील करंडावगैरे फौज जाऊन माची लुटिली पुणियास आग दिल्ही सरकारवाडा खंडणी देऊ [न] राखिला काही घरे शहरची राहिली त्याची याद पाठविली व सिंव्हगडावर मातोश्रीनी कृष्णाजी हारी साठे यांची कन्या सौ॥ गंगाबाई नवरी निश्चय करून श्रीमंत नारायणरावसाहेब यांचे लग्न केले ही बातमी आली तेव्हा फौजसुधा देसी कूच करीत येतात तो मोगल व भोसले यानी पुरंदरची खंडणी घेऊन निघोन राक्षसभुवनी गंगातिरी गेले श्रीमंत आषाढ वा॥ पक्षी मांदल मोहींचे घाटावर येऊन पोहेचले दुसरे दिवसी श्रावण शु॥ १ पदेस कूच होऊन मुकाबला व्हावा तो भोसले व प्रतिनिधि व मोरो बाबुराव यांची राजकारणे येऊन हे निराले राहिले मोगल रात्रीतून गंगापार गेला दिवाण विठल सुंदर फौजसुध्धा ऐलतिरी असता सदासिव रामचंद्र वगैरे याजवल होते तो सरकार फौज श्रीमंत उभयता चालून गेले आघाडीस नीलकंठ माहादेव व महिपतराव चिटणीस व महादजी सितोले मांजरीकर व माधवराव नरसिंव्ह हु[जू]र पागा व नारो कोन्हेर व रंगो कोन्हेर व दादा पोतनीस वडगावकर गेले तो नबाबाचे दारूस व बाणास आग लागून बाण उडाले त्या संधीत नीलकंठ महादेव यांजकडील हरी गोपाल व विटल सिवदेव यांजकडील फौजेने तोंड लाविलें तो श्रीमंत येऊन पोहोचले नीलकंठ महादेव वगैरे मोर्चे उठून आंत गेले मागाहून श्रीमंत रघुनाथ बाजिराव यांचा हावदा येता दरम्यान कंचरक्यांत विठल सुंदर व विनायेकदास व इस्मलखान पठाण अलजपूरसुभा पाच हजार फौजेनिशी हवद्यावर येऊन माघारा फिरविला हवदा पुढे मागे पठाणाची फौज चालली सरकार फौजेचा मोड जाहला तो ईश्वरे कौतुक केले त्याचे लोकात बार सुटून विटल सुंदरजीस गोली लागली ते लोक उभे राहिले पुढे मल्हारजी होलकर जेवुरे पसरून होता त्याची शिलक जाहली यामुले विठल सुंदर सात अंबाऱ्या फौजसुध्धा उभ्या राहिल्या श्रीमंताचा हवदा निघाला तो श्रीमंत माधवराव बल्लाळ प्रधान घोडयावर होते ते एकीकडे उभे राहून विठल सुंदर याच्या आबाऱ्या उभ्या राहिल्या त्याजवर आल्या लोकास पाठवून तंटाचे झुंज बाबूजी नाईक व दमाजी गायकवाड श्रीमंतास पाहत आले त्यांस त्याजवर पाठविले तेव्हा श्रीमंताजवळ भगवंतराव बारवकर व महादजी सितोले व कृष्णराव पारसनीस व नारो कोन्हेर वगैरे असता महादजी शितोले यानी सात अंबरीतील अंबारी मारितो म्हणोन बोलले तेव्हा करार मांजरीगाव व हती व दोणसे राउताची सरदारी वाचून आल्यास द्यावी हा करार श्रीमंती केला तेव्हा महादजी सितोले व

नारो कोन्हेर व भिकाजी नाईक व रगो कोन्हेर वगैरे तटाचे जुजावर गेले महादजी सितोळे यानी अबरी मारली निवर्गानी तटास हाणोन मागे आले माधवराव नरसी पागा बहरीचे शिंगीवर बसले असता घिलींत सत्तावीस जखमा लागोन घोडी गेली तटाचे जुंज पडले असता नबाबाने गगेपलीकडोन तोफाचा मार केला तीन प्रहर दिवस जाहला अकरा कोस मजल चालोन येऊन लढाई होत असता प्रजन्य पडला आधःकार जाहला पठाणानी घोड्याच्या कुच्या मारिल्या भिजून उभे राहिले तेव्हा श्रीमत माध[व]राव बलाल प्रधान चालून आले पठाण लुटून घेतले विनायक्दास ठार पडले तीन कोस मुर्दे पडोन रण जाले तेव्हा विठल सुदरास गोली लागली होती त्यास मुर्देफुरइत करून लोटून दिल्हे ते होल्कराकडील गिल्चे याणी पाहिले धावोन डाचके कापून भाल्यावर घातिले श्रीमताचा शाहाजाना वाजला आसमानी फते जाली सदाशिव रामचद्र व शहाजी सुपेकर वगैरे घोड्यावर व हतीवर बसोन गगेपार गेले कितेक बुडाले सरकारची फते जाली विठल सुदर याचे अबारीत बसून गेवराइ धोंडराइवर मुकामास गेले प्रजन्य उघडला उष्ण पडले गगेस पूर होता बेवीस उमराव अबारीसुधा धरले आले विठल सुदर व पठाण वगैरे मराठे फौज तीस हजार बुडविली नबाब गगेपार होते

१ श्रावण शुध १ रात्री नबाब गगेपार होता त्यानी तोफखाना टाकून जरदी सामान घेऊन निघोन गेला दुसरे दिवसी श्रीमतास गगेने उतार दिल्हा अवरगाबादेवर हला केला शहरातून मार जाला नारो कोन्हेर यास तीर लागला शहरची खडणी घेऊन मुकाम जाले

१ महादजी सितोळे यानी अबारी मारिली समय रामबाण हाती व गांजरी गाव दाह हजार रुपयाची व दोनसे रावताची सरदारी दिल्ही

१ गोपाळराव गोविद मोगलाइत गेले होते त्याची मिरज त्याजकडे बाहाल करून समजावीस केली

१ श्रीमंताचे पुत्र भास्करराव जाहाले होते त्याचे नावे प्रतिनिधि केली होती त्याचा काल जाला भवानराव मोगलाईत गेले होते त्याची समजूत करून प्रतिनिधी त्याज बहाल केली

१ फडणीसी चिंतो विठल करीत होते मोरो बाबुराव मोगलाइ गेले त्यानी समजास करून फडणीसीची वस्त्रे बाळाजी जनार्दन यास दिल्ही

१ नागपूरकर भोसले याची कामकाजे उरकोन त्यास निरोप दिल्हा

१ चिंतो विठल रायरीकर हुजुर कामकाज करीत होते पालखी दिल्ही होती

१ सदाशिव रामचद्र मोगलाची फौज बुडविली तेव्हां घोडीवर बसोन गगापार गेले ते तिकडेच गेले असेत

१ मोगलाकडील बेवीस उमराव पाडाव आले होते त्यास वस्त्रें देऊन निरोप दिल्हा
१ मोगल तोफखाना टाकून गेला होता त्या तोफा सरकारात आल्या
१ श्रीमंत कार्तिकमासी पुण्यात आले
१ श्रीमंत रघुनाथ बाजीराव श्रीगंगातिरी आनंदवली येथे राहिले कारभारी चिंतो विठल
१ पुरंधर किल्यास अमल नीलकंठ माहादेव पुरंदरे याचा होता तेथे विसाजीपंत सोने यानी फितूर करोन किला सरकारात घेऊन सरकारचे निशाण लागले कोलीयांचा दंगा जाला
१ नीलकंठ माहादेव यांचा काल सासवडी जाला त्यास दतक नाना पुरंदरे याचे पुत्र माधवराव नीलकंठ जाले
१ श्रीमंत माधवराव बलाल स्वारीस कर्नाटकात गेले पौष मासी कारभार सखारामपंत

—

१७

१ शके १६८६ तारणनाम संवत्सरे सु॥ खमस सितैन मया व अलफ राजशक ९१·
१ श्रीमंत माधवराव बलाल स्वारी कर्नाटकात गेली होती तिकडे धारवाडास मोर्चे लावोन किला जेर केला
१ श्रीमंत रघुनाथ बाजीराव आनंदवलीहून फौजसुधा स्वारी कर्नाटकात अनदपूर परयेत गेली

—

२

१ शके १६८७ पार्थिवनाम संवत्सरे सु॥ सित सितैन राजशक ९२
१ श्रीमंत पंतप्रधान याणी धारवाड घेवोन पुढे हैदर नायकावर स्वारीस गेली
१ श्रीमत रघुनाथ बाजीराव कर्नाटकातून अखेरेस आनदवलीस आले

—

२

१ शके १६८८ व्ययनामं संवत्सरे राजशक ९३
१ श्रीमंत पंत प्रधान हैदर नायकावर स्वारी करून सिव्हस्ताचे साले गंगातिरी जावोन ज्येष्ठ मासी शके १६८९ पुण्यात दाखल जाले
१ श्रीमंत रघुनाथ बाजीराव आनंदवलीहून गोहदेपर्यंत स्वारी करोन अनदवलीस आले

—

२

१ शके १६८९ सर्वजितनाम संवत्सरे सु॥ समान सितैन मया व अलफ सन ११७७ राजशक ९४

१ श्रीमंत पंत प्रधान आनंदवलीस जावोन श्रीमंताची समजावीस करून जहागीर देऊन किले सातारा वगैरे चिठ्या घेतल्या

१ श्रीमंत रघुनाथ बाजीराव याणी फौज मेलवून मल्हारजी होलकर याचे कारभारी गगाधर येशवंत यास मिलोन धोडप किल्याजवल पंचवीस हजार फौज जमा जाहली वैशाख मासी शके १६९० त दतक अमृतराव घेतले

१ श्रीमंत पतप्रधान यास खबर फौज जमा केल्याची व दतक पुन घेतल्याची लागली तेव्हा श्रीमत जेष्ठ मासी स्वारी तयार करून धोडपेस गेले मुकाबला दोही फौजेचा होता कारभारी चिंतो विठल पाडाव आले त्यांचे बधू मोरो विठल तरवारीच्या जखमा लागून ठार पडले श्रीमत रघुनाथ बाजीराव धोडप किल्यावर गेले श्रीमताचे फौजेने किला वेढला श्रीमत किल्यावरून खाली आले त्यास घेऊन पत प्रधान सताविसावे दिवशी मोरो बाबुराव कारभारास घेऊन आले

१ शके १६९० सर्वधारीनाम संवत्सरे

१ श्रीमंत रघुनाथ बाजिराव आणिले ते वाड्यात बंदोबस्ताने ठेविले कारभारी मोरो बाबुराव फडणिस

१ श्रीमत पतप्रधान स्वारीस निघाले विसाजी कृष्ण बिनीवाले हिंदुस्थानात रवाना केले श्रीमंत निघोन घरास आले

---

२

१ शके १६९१ विरोधीनाम संवत्सरे

१ खासा श्रीमत स्वारी कर्नाटक कारभारी बराबर मोरो बाबुराव फडणिस बराबर श्रीमंत नारायेणराव आसता निजगल किल्यावर हला जाहाला तेथे नारायेणरावसाहेब यांच्या हतास गोली लागली किला फते जाला नतर त्रिंबकराव मामा करनाटकात छावणीस ठेऊन श्रीमत पुण्यास आले रघुनाथ बाजिराव वाड्यात होते मोरो बाबुराव कारभारी सखारामपत घरी आहेत करम

१ विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश व सिंदे होल्कर हिंदुस्थानात पतरगडाकडे आहेत

---

२

१ शके १६९२ विक्रतीनाम संवत्छेरे
 १ खासा स्वारी निघोन तांदुलवाडीपर्यंत गेली शरीरी अश्वस्थ जाले यामुले आपा बलवंत फौज ठेऊन मामाकडे करनाटकात रवाना केले व कृष्णराव काले पाठऊन खासा पुण्यास आले कारभारी मोरो बाबुराव फडणिस
 १ श्रीमंत रघुनाथ बाजिराव वाडयात

——

 २

१ शके १६९३ खरानाम संवत्छेरे
 १ खासा श्रीमंत स्वारीस निघोन शरीरी पोटदुखा जाहाला कटोरियास गेले तेथून नगराकडे आले श्रीमंत नारायणराव पुण्याहून श्रीमंताकडे गेले रामचंद्र गणेश हिंदुस्थानचे स्वारीतून विसाजी कृष्ण चिनीवाले यासी न बने सबा निघोन अले भेट जाल्यावर सारे पुण्यास आले
 १ श्रीमंत आमृतराव यांचे लग्न टोकियास जाहाले

——

 २

॥२ शके १६९४ नंदननाम संवत्छेरे सुा सलास सबैन मया व अलफ सन हाजार ११८२
 १ खासा श्रीमंत शरीरी आस्वस्थ श्रीमंत रघुनाथ बाजिराव वाडयात आसता खासा निघोन थेवरास श्रीगणपतीजवळ खासे वाडियात जाऊन राहिले
 १ त्रिंबकराव मामा कर्नाटकातून स्वारी करोन भाद्रपद मासी आले
 १ श्रीमंत रघुनाथ बाजिराव वाडयात होतें त्यास वेदशास्त्रसंपन्न रामशास्त्रीसहित थेवरास आणऊन स्नेहाच्या गोष्टी करून कार्तिक वा। ८ श्रीमंती आवतार समात केला मोरो बाबुराव कारभारी राहून श्रीमंती सखाराम भगवंत कारभारास लाऊन श्रीमंत नारायेणराव बलाल सार्थक करावयास लागले संपूर्ण राजमंडल थेवरी जमा जाहले होते
 १ श्रीमंत नारायेणराव बलाल कारभारी सखाराम भगवंत श्रीमंत थेवरी कैलासवासी जाल्यानंतर स्वारी मार्गसीर्षमासी निघोन सातारियास गेली राजदर्शन जालियावर माहाराज रामराजे याणी पेशवाईची वस्त्रे श्रीमंत नारायेणराव बलाल यास दिल्ही आष्टप्रधानास वस्त्रे चालीप्रो। होऊन दिवाणगिरी व मुतालकीची वस्त्रे पुरंदरियास जाहाली नंतर पंतप्रधानाकडील सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन फडणिस व हारी बलाल फडके व हुजूरचे चिटणिस व मजुमदार यास देऊन मुछदी लोकास दिल्ही तेंव्हा नारो कोन्हेर व रंगो कोन्हेर येकबोटे यासहि दिल्ही माहाराजाचा निरोप घेऊन पंतप्रधान घरास आले

१ श्रीमत रघुनाथ बाजिराव वाडियात आसता त्यांची कन्या सौ दुर्गाबाई तीस वर पाडुरंग बाबूराव बारामतकर निश्चय करून लग्न केले

१ उपरात खासा श्रीमत कारभारी सखारामपंत स्वारीस निघोन मातोश्री गोपिकाबाई गगापुरी होती त्यास भेटून पुणियास आले वाडियात रघुनाथ बाजिराव बदोबस्त श्रीमती केला आहे

---

६

येणेप्रो शा शके १६८३ श्रावण मास ता। शके १६९४ चवऱ्याणव कार्तिक मास यो वर्षे ११।१ श्रीमताची कारकीर्द बाबुराव फडणिस याचा काल श्रावण मासी छ ५ जमादिलावली जाहला

१॥ शके १६९५ कारकीर्द श्रीमंत नारायेणराव प्रधान व रघुनाथ बाजिराव प्रधान व मातोश्री गगाबाई स्त्री श्रीमंत नारायेणरावसाहेब

।॥। श्रीमंत नारायेणराव बलाल कारकीर्द कारभारी सखाराम भगवत

।।१ शके १६९४ मार्गसिर्ष मासी पेशवाई जाहाली ता। फाल्गुण आखेरीस शक आखेर जाहला महिने

।॥२ शा चैत्र शु॥ १ शके १६९५ ता। भा। शु॥ १४ श्रीमंत वाडियात आसता पूर्वेची खिडकी लाहाण दरवाजा वाडियास होता तो मोठा करावा याकरिता खिडकी पाडून भिंत आवाराची पडली होती दरवाजा लावावयास तो मिती मारी श्रीमंत स्वारीत पर्वतीस जाऊन राघोजी आगरे सरखेल कुलाबियाचे आले होते त्यास भेटून वाडियास आले तो तिमायाचोवाचे लेक हारिभक्त बावा गोसावी संवस्थानासहित वाडियात आले होते त्याचे पक्तीस भोजन होणे आणि वर्तमानहि कलले की गारदी दंगावा करणार त्याचा बंदोबस्त करावयास हरी बलाल यास सागितला ते रंगो कोन्हेर येकबोटे याचे घरी जेवावयास गेले श्रीमंत जेऊन माहालात गेले तो सुमरसिंग व मोहोमद इसफ गारदी याचा सरदार तलबाचा हंगामा म्हणोन वाडियाजवळ येऊन खिडकी पाडली त्यावाटेने वाडि-चढले वाडियात चौकीस खरगसिंग होता तो यावर त्यास मिराला गारदी वाडियात माहालात सिरले दिली दरवाज्या उतरेकडील लारला वरून गोल्या चालल्या श्रीमत माहालातून निघोल श्रीमंत रघुनाथ बाजि-राव अपले माहालात होते त्याजकडे गेले तो सुमरसिग मागोमाग आला श्रीमंत माडीवर जाऊ लागले मागे पतप्रधान जाऊ लागले तो तुळ्या पवार खिजमतगार याणे मागे वोढून घेतले तो चापाजी टिलेकर खिजमत-तगार येऊन पावला त्याचे गल्यात श्रीमंती मिठी घातली तो सुमरसिग व तुळ्या पवार याणी तरवारीने वार टाकले दोघेहि ठार जाहाले श्रीमंत रघुनाथ

बाजिराव माडीवरून खाली आणोन चापेखणात बसविले नारोजी नाईक जासूद याचे डोके मारले व इछारामपंत ढेरे वाडियात गेले ते गाईजवल मारले गेले गाई मारल्या तो हरि बलाल फडके वाडियात जावयास गेले तो दरवाजे बंद जाहले तेव्हा सखाराम भगवंत व हरी बलाल बुधवारचे चावडीस जाऊन बसले फौजा तमाम तयार होऊन शहरांत रस्ते भरले तो वाडियातून रघुनाथराव याचे चोपदार लोकास बोलाऊ येऊ लागले ते लोक सखारामपंतास चावडीस पुसावयास येऊ लागले याणी आत चिठी लैहून हरी बलाल याची हातची आपल्या नावे पाठविली ते चिठीवर श्रीमंताचे हातचे उतर आले की तेव्हा ती चिठी घेऊन हरी बलाल निघोन बारामतीस गेले सखारामपंती लोकास आपलाले घरी जावयास सांगितले संध्याकाळ जाहला बज्याबा पुरंदरे व मालोजी घोरपडे वाडियात जाऊन आलें श्रीमंत नारायेणराव बलाल प्रधान यांचा नाश जाहला हे सर्वास कलले सखारामपंत त्रिंबकराव मामा वाडियात गेले नंतर श्रीमंतास झोळी करोन त्रिंबकरावमामा बरोबर जाऊन नडगे मोडीस आग्न दिल्हा लोक आपलाले घरास गेले कारकीर्द महिने भाद्रपद शु॥ १४ परियंत.

---

·।।।·

·।।।· कारकीर्द श्रीमंत रघुनाथ बाजिराव भाद्रपद शुा १४ च्यतोर्दसी पंतप्रधान देवगत जाल्यावर दुसरे दिवसी पोशाख करून कचेरीत बसता सुमरसिंग व महंमद इसफ याणी तळबेचे साचा तगादा तीन दिवस केला अबंतर बसला वाडयात दरवाजे बंद तेव्हा सखाराम भगवंत याणी गाडद्याचे पैक्याचा निकाल करून देऊन श्रीमंतास मोकळे केले कारभार चालला नंतर चिंतो विठल व आबाजी माहादेव व सदासिव रामचंद्र मिलाले स्वारी बाहेर निघाली कार्तिक मास बज्याबा पुरंदरे यास सातारियास माहाराज रामराजेसाहेब याजकडे पाठऊन पेशवाईची वस्त्रे आणविली ती घेऊन श्रीमंत रघुनाथ बाजिराव प्रधान सिका जाहाला स्वारी बेदरास चालिली बराबर सखाराम भगवंत बालाजी जनार्दन फडणिस आहेत तो विसाजी कृष्ण चिनीवाले हिंदुस्थानातून श्रीमंत भाऊसाहेब पानपती गालेब जाले ते वेलची संपत्य फतरगडी लुटून नेली होती हाती जड-जवाहीर वगैरे तो फतरगड घेऊन बहुत संपत्य सापडली लोकाच्या नालबंद्या खानग्या देऊन जामदारखाना व जव्हाईर व हती आणिले तो श्रीमंत माधवराव प्रधान याचा काल जाहाला होता श्रीमंत नारायेण-राव प्रधान मारले गेले श्रीमंत रघुनाथ बाजिराव यास येऊन भेटले.

जडजव्हाईर चेवीस लाख सोंचे व जामदारखाना आणला होता तो श्रीमंती वाड्यात जामदारखान्यात न ठेविता स्वारीबरावर घेऊन बेद्रास गेले तेव्हा सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन फडणिस निरोप घेऊन घरास गेले नंतर श्रीमंत बेद्राजवळ पावले तेथून निजाम-आलीखा फौजसुधा होता गोळा गोळी लढाई होतां रंगो कोन्हेर याणीं तटासर हात चालऊन माघारा फिरले श्रीमंती रुबरू पाहून दोनसे लोक राजमंडळ वीरकर रंगो कोन्हेर याचे निसबतीस देऊन सरदारी दिल्ही सुा आर्बा सबैन सरकार जोर मोठा जाहला सल्याच्या गोष्टी होऊ लागल्या पंचवीस लाखाची जाहगीर द्यावयाचा करार होऊन नबाबाची भेट जाली श्रीमंत नबाबास जाहागीर सोडून कर्नाटकात चालिले सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन फडणिस याणी निरोप घेतला हरी बलाल घरीच होते पुण्यात मुतालकीवर नारो आपाजी होते स्वारी कर्नाटकात चालिली तेव्हा त्रिंबकराव मामाबरावर फौज देऊन साबाजी भोसले याजवर पो श्रीमंत बलारीपर्यंत गेले पौष अखेरीस श्रीमंत नारायेणरावसाहेब यांची स्त्री गंगाबाई गरोदर होती ती निघोन पुरंदरास गेली सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन बरावर गेले नारो आपाजी मुतालकीस होते याणी बाईचे हुकमावर केशवराव कोतवाल होता त्यास धरिले पुणियात मातोश्रीचा हुकूम चालला त्रिंबकरावमामा भोसल्याकडे पो होते ते येक होऊन आले हरी बलाल किल्याहून मामाकडे गेले नबाब निज्यामआलीही चालून आले दक्षणेत बहेदा जाहाला हे समजून श्रीमंत रघुनाथ बाजिराव करनाटकातून माघारे फिरून पंढरपुरावर आले तो त्रिंबकरावमामा चालून कासेगाव गोपाळपुरावर अले श्रीमंत तयार होऊन गेले तो त्रिंबकरावमाना चेत्रात पाडाव अले हरी बलाल निघोन फौजसुधा नबाब निज्यामआलीस भेटले पासष्ट लक्षाची जाहगीर भाऊसाहेबी घेतली होती ती त्यास देऊ करून नबाबसुधा चालून येतात तो रघुनाथ बाजिराव याणी कूच करून बऱ्हाणपुराकडे चालिले त्रिंबकरावमामा जखमी होते त्यांचा काल खडकतचे तळावर जाहाला श्रीमंत बऱ्हाणपुरावर गेले मागे हरी बलाळ व नबाबाची फौज होती तो आधिक वैशाख शुा सतमी शके १६९६ मातुश्री गंगाबाईस पुत्र माधवराव नारायेण जाहाले हे वर्तमान लस्करात अले तेव्हा रघुनाथराव प्रधान निघोन सातपुड्याचे डोंगरावर गेले फौज येऊन हरि बलाल फडके यास भेटली बज्याबा पुरंदरे व मुजुमदार व चिटणीस व नारो कोन्हेर व रंगो कोन्हेर वगैरे निघोन किले पुरंदरी

श्रीमंताजवळ सखाराम भगवंत व नाना फडणिस होते यास भेटले यात कारकीर्द

।= स्वारीत व मुकामी हुकूम सिका ३ा भाद्रपद ता चैत्र अखेर शके १६९६ पर्यंत आठ महिने पौ मुकामी भाद्रपद पौर्णिमेपर्यंत ता माघ शुा ५ पर्यंद स्वारीत वैशाख अधिक पौर्णिमेपर्यंत चालला

।१ पुरंधरीहून मातुश्री गंगाबाईचा हुकूम पुणियात माघ शुा ५ ता अधिक वैशाख शके १६९६ वद्य च्यतुर्थीपर्यंत चालला

।॥।

१॥

सदरहू येणेप्रमाणे कारकीर्द रघुनाथ बाजिराव व नारायेणराव बलाल पंत प्रधान दीड वर्ष कारकीर्द मातुश्रीसुध्धा

---

# शिवकालीन पत्र-व्यवहार

श. १३८२ आश्वि. शु॥ ५ ] श्री [ इ. स. १४६० सप. १९

आसल बरहुकूम नकल

श्री [1]सके ११००१७ वीक्रमनाम सवछरे आस्वीन शुध पचमी शुक्रवार ते दीनी आदी पीठी दवलताबाज पातशाई बेदर मामुले जुनर कसबे चाकन देस हासेन कलाप आला चाकणेस दुर्गाच्या पाया उभारीला मग जव्हांरीस फर्मासी केली दर गावासी गाडा येक व वेटे दोन येकू वेटा दुर्गाच्या पायांत घालीत येकू वेट्या गाडयासगाते सोडीत याबदल वीलाईती गयाळ आली श्रीसाटक पद्मावती व गीरमेटक गीरमालवड पाटील मोकदम व गीरमा फान पाटील मोकदम मौवजे आम्हांस खाचे गीरीम पुणे देश जे आपुली मोकदमाई षरुसी माजुमियाच्या हावाली मोकदमाई केली गीरम्याचे हासीचा वोवसीचा कोण्हीं उभा राहील माझी मोकदमाई म्हणेल थळपत्र दावील माझी मोकदमाई म्हणेल त्याची त्याचे हावाली कीजे षलेसी राजुमीयाने उतर केले हे मोकदमाई तुझी मी जतन करीन तुझे हासीचा वोवसीचा उभा राहील मज ओळखी दावील त्यास आरधी मोकदमाई देईन गीरम्याचे हासीचा वोवसीचा उभा राहील तो आरधी मोकदमाई खाईल षलेसी राजानमीयाचे हसीचा उभा राहील तो तो आरधी मोकदमाई खाईल हे उतर सही या उत्राचे गोही चवगुला दाद पाटील टेका मोवजे गीरीम साहागला दास पाटील मोवजे गीरीम गोरा दाद पाटील मोवजे गीरीम सीदा बहीर पाटील मोवजे गीरीम

---

१ हा शक विक्रम संवताचा धरला पाहिजे व आकराशेच्या ऐवजी पंधराशें असें धरून विक्रम संवत १५१७ या वर्षी आश्विन शु॥ ५ स शुक्रवार येतो.

वायेबला लुख पाटील मोवजे गीरीम गारू कारू बाब वरटा थोराद पाया थ्रीतीकार मौवजे गीरीम हे समस्त या उतराचे गोही गीरमी आन्हासके वीहीर खातली ते वहिरिंमधे आतु आडु हे आपुल्या वडयाचे स्याहासन हे पत्र प्र मेरे तो झाले

लेप ताब्याचे पत्रावरील आसे.

---

श्री

[ शिवापूर देशपांडे वहीची अत्रे-नकल पृ० १७–१८ ]

यवनी पातशाहात दिलीस जाहाली शके ५१२ त्यापासून दक्षिणेत यवनी अमल चालला त्यात शके ११६८ आकरासे आडसष्ट सन हजार ६५६ यांत पीर पेगंबर फकीर आवलीया पुण्याजवळ आले तेथे कुमारी कासारी दोन्ही गांव लगत असतां माल्याचे बैल मेलेले फिकिरानी उठविले आणि पुणेश्वर केदार व नारायण दोन देव हिंदूचे होते ते करामतीने उठऊन किले पुरंदरी नेले तेथे त्या स्थळीं दर्गे करून आपण राहिले तो शके १२१२ बाराशे बारात बरया आरब याणे चाकणाचे किल्याची बोपज (?) करून आपण तेथे राहून पुण्यांत आमल केला तेव्हां पुणे कुमारी व कासारी तीन गांव मोडून येक गांव केला पुणेश्वर केदार व नारायण दोही देवाची पूजा धर्माधिकारी राजरूपी करीत असता ते स्थळी यवनानी दरगे केले सबब त्याचे पूजेचे गांव मौजे फलस व येरंडवणे मना जाहाले म्हणू लागले की यवनाचे देव जाहाले तुम्ही मुसलमान जाहाल्यास गांव खाऊन पूजा करणें त्यावरून धर्माधिकारी याचे वंशातील पुरुष यवन होऊन पूजा करून गाव खाऊ लागला त्याचे वंसीचे हाली मुजावर दरग्यात आहेत तीन गांव मोडून येक गांव पुणे जाहाले ते कालची वस्ती वि।।

कोट पांढरीचा नवीन बांधला त्यांत चालोबा देव मुंजा पुरातन त्याची पूजा धर्माधिकारी करीत होते कलम १

फकीर पीर पेगंबर आले त्यांच्या कबरी पीर जाले बी तपसील

१ नारायण देवाच्या जाग्यावर सेख दसामुदीन सेखसला दरगा असे

१ पुणेश्वर केदार महादेव त्याचे स्थली सेखसला दरगा जाहला असे जुना दारुल नदी व देवलाचा आवार कुंभारवेसीजवल आहे

१ रविवार येसीजवल पीर आमना जाहाला असे

१ गारपीर गांवाबाहेर पूर्वेस जाहाला असे

कोटाभोंवती वस्ती दरगे व मोहतर्फा देशमुख व देशपांडे व स्थाई उपरी उदमी ऋगवेदी ब्राह्मणाची घरें धर्माधिकारी याची होती कलम १

पाटील तीन याची घरे कलम १

कुलकर्णी माराइत पुणे व कुमारी व कासारी तीन गांवचा होता तीन गावचा येक गांव जाला तेथील कुलकर्णी माराईत होता कलम १

मुतार तीन गांवचे

१ फगले

१ ढोरले

१ गोचंदर

---

३

१ बावसुरूख गांवाचे दक्षणेस फकीरीण होती तिची कबर देवालय मुलामुठा संगमी नदीपलीकडेस चिमट्यास जाले आहे तीस बिबी सैदानी म्हणतात तेथे हाली इंग्रजानी बंगला करून बाग केला आहे शके १७१० पासून त्याची वस्ती तेथे जाली असे
१ पीर मना पानसरे याचे घरानजिक असे
—
७

म्हार तीन गांवचे
२ चव्हाण तक्षीमा
१ ..............
—
३

न्हावी तीन गावचे
१ खडके
१ आंढव
१ मगर
—
३

गोलक सेटे व माहाजन व्यव्हारे याची घरें होतीं कलम १

गणपती जुना भेंडयाचे आवर होते देशमुख देशपाड यांचे घराचे दरम्यान असें त्याचे देवालय हाली आहे जिजावसाहेब शाहाजी राजे यांची स्त्री सिवाजीमाहाराज यांची आई हिणे बांधिले असे कलम १

येणेप्रमाणें पुण्यातील वस्ती अमल बरया आरब याची असतां उपरात अमल जागा जागा घालमेलीने शके १४०० पर्यंत होत आले तों दौलताबादेस निज्यामशाहा राहून तो अमल करू लागला नंतर शके १५०० पासून दक्षणेत अमल जागा जागा जाहाले

१ चाकण किला शके १२१२ बाराशे बारांत बरया आरब याणी बाधली नबादीज करून मुलूख करून तेथे होतो त्याणे मसीद बाधिली असे व पुण्यातील कोट बाधिला असे त्याचा काल जाहाल्यावरी निज्यामशाहाचा अमल जाहाला नंतर बहिरी निजामशाहाने केला उपरांत औरंगजाबाचा होता नंतर सिवाजीमाहाराजांचा जाहाला नंतर औरं[ग]जबाचा जाहाला नंतर शाहूमाहाराजांचा जाहाला हाली बालाजी बाजिराव प्रधान त्याप्रमाणे माधवराव नारायण प्रधान चालत असे ह्मा ता शके १७१७ अमल वर्षे सुमारी २१७

शके १५०० यात धर्माधिकारी यांचा वंश जुने जाहाल्यामुळे सात ब्राह्मण पाठराखीस वगैरे धर्माधिकारी याणी आपल्यास करून आपले बृतीतील निबधाची आधेली आठास नेमली त्यांत येक आसामी धर्माधिकारी याची याप्रमाणे ठराऊन धर्माधिकारी याची बृती चालण्याकरितां पाठराखी केली त्या दिवसापासून धर्माधिकारी आठघरी असे म्हणो लागले त्या काली को पुणे येथे आमल यवनाचा यास वर्षे ह्मा ता शके १७१७ पर्यंत सुमारी २१७ सुमार

---

# देशपांडे ता। खेडेबारे याचा शिवकालीन करिणा



[ हा करिणा श्री. रावसाहेब गंगाधरराव बाबासाहेब देशपांडे मा. इ. सं. मंडळाचे सन्मानीय इतिहासप्रेमी सभासद यानीं संपादिलेला असून तो त्याच्या परवानगीनें येथें छापीत आहों. ]

श्री

आसलप्रमाणें नकल

सन १०६३ [ श. १५७४] मधे चिमणाजी बापूजी व बालाजी बापूजी व केशो नारायेण यामधे व सखो भिकाजी यामधे व गंगाजी विठल यामधे वाद जाला त्याचा करिना राजेश्री सिवाजी राजे यापासी सखो भिकाजी उभे राहून आर्जे केला की आपणास आनदराव याची मजमू आहे त्यास आपणास च्यार महिने निरोप दिल्हा पाहिजे त्यास आज्ञा दिल्ही याउपरी दुसरा आर्जे केला की तर्फ खेडबारेच्या देशकुलकर्णाचा कथला आपल्या बापाचा व आपला आपले आजे राजेश्री रुद्राजी नारायेण त्यापासून आहे तो [1]साहेबास ठावका नाही ऐसी खेड कसबा व सिवापूर हे दोन गाव आपले आपले बाप हाली भिकाजीपत व नारोपत चालवीत होते पुरातनहि आमचेच ऐस आसता साहेबापासी [2]नारो बापूजी चाकरी करीत होता व साहेब मातुश्री [3]आईसाहेब [4]कसबीयामधे त्याच्या वाडियात सेजारी होते त्या वलखीने साहेबी त्याची पाठी रासून आपल्या बापाच्या हातीचा कसबाच्या रुमाल हिरून त्याचे हाती दिधला ते वेलस [5]बापूजीपतहि होते त्यानी चाहाडी केली की सिवापूरचे पेठमधे [6]भिकाजी रुद्राने काही चोरी मारी केली आहे म्हणून साहेबापासी सागितले तेधवा साहेबी मनास आणिले ते समई राघो बल्लाल आण्या सोनाजीपत दबीर व भानजी बलाल ऐसे बैसऊन मनास आणिले चोरीचे कलम लटके जाले ते वेलस पेठेचा हावालदार कासियबे व मजमूदार बापूजी दामोधर होता त्यास देशमूख बापूजी नाईक[7] व बोपजी नाईक व कानजी नाईक व भिवजी नाईक व रामजी नाईक व नागोजी नावडकर देशमुखाचा कारभारी त्या देखता सदरहु करिना जाला म्हणून त्यापासी जाऊन सागितले की दिवाणचळे त्याने तुम्हादेखता कसबाचा रुमाल घेतला आपण दिवाणात उभे राहून खटपट करावी तर सिवाजी आबजी याचा वाटेदार तो

१ आपणास, शिवाजीमहाराजास २ निमणाजी बापूजीचा वडील भाऊ ३ जिजाबाईसाहेब ४ खेडात ५ बापूजी मुद्गल ६ सखो भिकाजीचा बाप ७ बांदे

आपला वाटा मागो लागला म्हणून नसरापूरचे कुलकर्ण चालवीत होता म्हणून त्यावर काही कुभांड करून त्याला मार केला तो बहुतच केला धोतरात हागला तो घरास आणिला तच वेळेस देशमुखादेखता आपला रुमाल घेतला ते वेलेस आपण काही दिवाणात खटपट करावी तो भये उत्पन्न जाले की सिवाजी आवजीचा न्याव होईल म्हणून आपले बाप देशमुखापासी सागितले की त्यास सागोन आपला निर्वाहा करणे त्यानी आपल्या बापास उतर दिधले की तुमच्या वादियाची राजेश्री राजे पाठ राखीत आहेत ये प्रसगी आम्हास बोलता येत नाही आपला काळ पडल ते वेळेस तुमचे देसकुलकर्ण तुम्हास देऊ थैसे बोलिले त्यावरी ते प्रसगी उगच आपल्या बापास राहाणे जाले बापूजीपंत मेले नारो बापूजी सेवा माहाराजाची करीत होते आपले भाऊ नारो भिकाजी सिवापूरचे कुलकर्ण चालवीत होते थैसीयास ते वेलस [8]सन मधे फतेखान विजापूरकराची नामजाद राजियावरी आली ते वेळस किले कोंढाणा व सिरवळ खेडबारे देऊन सला केला राजेश्री राजे पुणियास गेले तेथे आबाजी माहादेव हे कारभारी जाले यानी कुल मुलकावरी गुर व ढटे व घोडी घातली ते वेळस सिवापूरच्या कुलकर्णास येक वाटी (?) व दोन टोणगे उटे घातले व्हन १० दाहा घातले ते वेलस आपले बापापासी काही द्यावयास नव्हते तेधवा राजेश्री [9]माहादेवभट माहाभास राजेश्री राजियाचे गुरु ते आपले माऊस चुलते त्यास वरातदारी उपद्रव केला तो त्यास दिल्हे वचना (?) मग आपल्या भावास नारोभिकाजी यास बराबरी घेऊन पुणियास राजेश्री राजियापासी गेले आणि त्यास विनंती केली, की हे बहुत दुर्बल आणि यास वृतीसमधे उट घातले आहे इतके याच्याने देवत नाही तर निमे घेऊन निमे सोडिले पाहिजे ते वेळेस नारो बापोजी सभेस बैसला होता त्यास आपल्या भावाने हाटकिले की राजे तुझे वचन येकत आहेत तुम्ही बोला त्यास त्याने उतर बरकसीने उतर दिधले की तुमचे कुलकर्ण तुम्ही सोसने आम्ही बोलणार नाही मग राजेच कृपाळू होऊन व्हन ५ पाच करार केले आणि येक टोनगा फिराऊन घेतला आणि होन सोड देऊन पाच व्हन करार केले तेहि द्यावयास गत नाही म्हणून सिवापूरचे घरी होते ते भगवत गोसावी यास भाडियाने देऊन रुपयास व्हन पाच घेऊन[10] दिवाणात दिधले पुढे पेठेचे कुलकर्ण नारोपत चालवीत होते तो सामराजपत पेसवे याही मुलकावरी मोहीम पटी घातली पेठस घातली ते वेलस नारो[11] बापूजी इदलशाहीचा दिवाणाने

---

८ फतेखानाची स्वारी शके १५७०. ९ ही माहिती अगदीं नवीन. १० या वाक्याचा अर्थ स्पष्ट होत नाही. ११ हा नारो बापूजी वर आलेल्या नारोबापूजीहून निराळा दिसतो.

कसबियामधे उपद्रव माडिला म्हणऊन पेठ राजेश्री राजियाची म्हणून तेथे आले होते ते समई मोहीमपटी शभर [१२]टके घातले ते वेलेस नारो बापूजीसी आपले भाऊ नारो भिकाजी बोलले की आपण दिवाणात बोलून काही हालू करवणे त्यास नारो बापूजी बोलले की तुमचे कुलकर्ण जाणा आम्ही बोलणार नाही तेहि खंडणी दिधली त्यावरी कितेक दिवस जाले नारो बापूजीने राजेश्री राजियापासी चाहाडी केली की सिवापूरची पेठ दाहा बारा वरसे राजेश्री दादाजीपती इनाम वाढविले सन कुलारग खडनी टके १२०० बारासे टके केली त्या आलीकड साल दरसाल कमतर खडणी होत आली ते पैकी[१३]कारकुनानी व सेटियानी व कुलकर्णी याने खादले थैस सागितले त्यावरून आपले भाऊ नारो भिकाजी यास पुणियास नेऊन राजेश्री राजियास सागोन मार केला हिसेब कितेच मनास आणिता चोरीचे लिगाड लटके जाले त्यावरी नारो बापूजीने राजेश्री राजियास सागोन पेठेच्या कुलकर्णाचा रुमाल हिरुन घेऊन नारो बापूजीचे हाती दिल्हा त्यावरी आपल्या मावानी राजेश्री राजियासी रदबदली केली की कसबाचे देसकुलकर्ण पुरातन आपले आपले बापातागाईत खात आलो या प्राती साहेबाचे सुभेदार दादाजी कोंडदेव कसबियात होते ते वेलेस राजेश्री साहेब लाहाण होते राजेश्री [१५]माहाराजसाहेबी मातुश्री आऊसाहेबास व तुम्हास खेडबारियास दादाजीपतापासी पाठविले ते वेलेस राहावयास वाडा बापूजी मुदगल याच्या वाडियात ठाव दिल्हा आणि तुम्हास वाडा बाधावयाची तजवीज केली थैसी कसबियाचे बाणियाची व माजे मोहतर्फ कुले याची घरे मोडून तो जागा वाडियास केला त्या कुलास वसाहतीस जागा पाहिजे म्हणून कसबियाच्या सिवारात पेठ वसावयाचा तह केला पेठेचे नाव सिवापूर थैस साहेबाचे ठेविले बारा वरसाचा इनामाचा कौल दिल्हा पेठेचा मुहुर्त करिता मलवरे रोविता मिरासदारास वस्त्र दिल्ही ते वेलेस कसबीयाचे कुलकर्ण आपले म्हणून पेठेच्या कुलकर्णाने वस्त्रे आपले बाप भिकाजीपत यास वस्त्र दिल्हे ते वेलेस बापूजीपतहि होते त्यावरी पेठ नऊ वरस इनाम पाळली कसबीची रयेतीवर मुलकी रयेत कौल देऊन आणिली त्यास घरे दिवाणातून बाधून देऊन कुळे पाहून दिल्ही त्याचा वसूल पेस्तर मोलू तुम्हास घेतला नव वरसे निपोटी चाकरी आपल्या बापाने आपली प्रती म्हणऊन चाकरी केली दाहावे वरसी राजेश्री दादाजीपत राजेश्री माहाराजाचे भेटीस करनाटकात चालिले त्या वेळेस पेठची खंडणी कुळाचे

---

१२ ४८ रुका = १ टका. रुका म्हणजे हल्लींची जवळ जवळ पै. बाजारभावपरत्वे टक्याची किंमत कमीजास्त होई पण साधारणत ३॥ टके = १ रुपया एवढा टका म्हणजे हल्लींची पावली.

१३ पैकी–पैके ?

१५ शहाजीमहाराज.

कुल पाहून खंडणी केली आकार टके१२००बारासे जाला ते वेलेस आवघ्या वतनदारी आर्ज केला की आपल्या हाकाची विल्हे केली पाहिजे त्यास त्याही उतर दिल्हे की समागमे दोन च्यार मजली येणे विल्हे करून सवेच निरोप देऊ त्यावरून वीरसेटी सेटिया व समाज पाटील व जावजी कुटा माहाजन व भिकाजी रुद्र थैसे तिकोटे नजिक विजापूरपावेतो गेले तेथे ज्याची त्यासारिखी मुशारियाची विल्हे केली त्यास भिकाजीपंतास शभर टके मुशाहिरा केला आणि आपण फिरोन आलियावरी हाक लाजिमा याची विल्हे करून देऊ म्हणून निरोप दिल्हा त्यास हे गावास आले कसब्याचे व सिवापूरचे कुलकर्ण खातच होते त्यावरी राजेश्री दादाजीपंतहि करनाटकातून आले तैसच दुखन्य पडले आणि सवेच मेले हाकलाजिमियाची काही विल्हे जाली नाही त्यावरी कितेक वर्से कसबा सिवापूर आपले बाप व आपले भाऊ खात होतो त्यावरी बापूजी मुदगल व त्याचा लेक नारो बापूजी याने साहेबाचा वदनिशा करून साहेबाकडून रुमाल बलत्कारे घेऊन आपले हाती घेतला ते वेलेस आपण रदबदली करावी तों चालली नाही चौघा मिरासदारास गोही करून उगच राहोन पेठेचे कुलकर्ण खात होतो त्याहि संमधे नागवणा व बरेवाईट सोसिले थैसे आसोन हाली पेठेचेहि कुलकर्ण बलत्कारे घेऊन साहेब त्यास देतात थैसे कितेक प्रकारें राजश्री राजीयासी रदबदली केली परंतु त्यानी मानिले नाहीं त्याचे वकील सबल बिा

रघुनाथ नारायेण यासी बापूजीपंताची लेक दिल्ही १

सोनाजीपंत डबीर याची लेक हे बालाजी बापोजीस दिल्ही १

रघुनाथपंत कान्हो डबिराचे जावाई १

शामराजपंत पेसवे त्यास त्याचा लेक चंदोपंत त्यास नारो बापोजीची लेक दिल्ही १

श्रीदेव चिंचवडकर यासी येक लेक बापोजीपंती दिल्ही

बावाजी नाो पुडे याचे लेक नारायण यासी रघुनाथ नारायेण याची लेक दिल्ही १

प्रभाकर भट व नारायेण भट हे बापोजीपंताचे व्याही १

थैसा कुल दरबार कुल त्याचाच जाला आपले कांहीं न चाले मग आपले भाऊ नारो भिकाजी पोट भरावयास निरोप मागत होते ते न देत मग शामराजपंत यानी पाव लोकाची सबनीस याची फडनिसी दिल्ही त्या दिवसापासून पेसजी देसकुलकर्णाची व बाजे गावकुलकर्णाची कटकट आसता हें नवी कसबाची व सिवापूरची कटकट चालली ये गोष्टीचा वादप्रतिवाद करावा तों मोरापंत पेसवे तेहि त्याचेच जाले थैसा आवघा दरबार त्याची पाठ राखो लागले व गलबल

मोगलाचा व इदलशाहाचा जाला मुलुक उद्वस जाला याजकरिता दाहा पांच वरषे गेली त्यावर आपणास आनंदरायाची मजमू होती रुईजुई गाव वसू लागले मग ते वेलस राजश्री राजे शाहेबास आर्जे करून मजमू च्यार महिने टाकून राजियासी हाटकिले की आपले वतन व गाव तुम्ही बलत्कारें घेऊन त्यास दिधले आता तऱ्ही धर्मतेने आपला येक कागद कारकुनास व देसमुखास देऊन त्यास व आपण्यास परस्छलास पाठऊन निवाडा होये ते केले पाहिजे त्यावरून त्यानी मुकुंद धोंडदेव आत्रे व हवालदार व बावाजी जनार्दन मजमदार यांचे नावें येक रोखा व देशमुखाचे नावे येक रोखा दिल्हा की चिमणाजी बापोजी व सखो भिकाजी यासी परस्छलास पाठऊन देणे आपला निवाडा करून येतील व चिमणाजी बापोजीस येक रोखा दिल्हा की तुम्ही व सखो भिकाजी परस्छलासे जाऊन आपला निवाडा करून येणे ते रोखे घेऊन का खेडास आलो नायेगावी चिमणाजी बापोजी होता त्याचा रोखा त्यास पाविला वरकड कारकुनाचे व देसमुखाचे त्याचे त्यास दिधले चिमणाजी बापोजीस कारकुनी व देसमुखी येक दोन बोलाऊ पाठविले परंतु तो न येच मग आपण नायेगावास जाऊन त्यास दुन्हाई देऊन त्यास ठाणियास घेऊन आलो चिमणाजी बापोजीस कारकून व देसमुख बोलिले की तुम्ही जमान देऊन परस्थलास जाणे यास त्यानें उतर दिल्हे कीं आपण परस्थलास जाणार नाही वेव्हार सागणार नाही आपले कोण काय करील ते करो ऐसे रेटाईच उतर दिल्हे त्यावर कारकुनी व देसमुखानी राजश्री साहेबास बखर लेहून दिधली की चिमणाजी बापोजी परस्थलास जात नाहीं व निवाडयासही उभा राहात नाहीं ऐसी बखर लेहून राजगडास पाठविली त्यावरून राजश्री साहेबी दुसरा रोखा चिमणाजीस पाठविला की तुसी वृती नव्हे तुवा बलत्कारे सखो भिकाजीपासोन घेतली आहे तरी त्याची वृती त्याचे सांमाली कर्णे ऐसा रोखा आला तोही रोखा कारकुनानी व देशमुख यानी चिमणाजीस दिल्हा त्यावर जमान देऊन परस्थलास जावे ऐसा तह केला आपण माहादाजी राम देस कुलकर्णी प्रा सिरवल याचा कतबा आणिला तो कारकून व नागोजी नो व येसवंतराव मुलफात आयराईच्या आमवाणीस चालिले त्या मा मौजे उचारे येथे गेलो तेथे कतबा त्यापासी दिल्हा त्यावरून त्यानी नायेगावी चिमणाजी होता त्यास बोलाऊन आणून सागितले की त्यानी जमान कतबा आणून दिल्हा तुम्ही पुणेकराचा कतबया आणून देतो म्हणोन बोलिलेत तो आणून देणे त्यास त्याने उतर दिल्हे की बहुत बरें म्हणोन उतर दिल्हे आणि हुजूर बालाजीनी सासू आयई व कारकून यास पत्रे पाठवोन परस्थल दिल्ही होती ती मोडली आणि नवडो मलाल गावीचा निवाडा करवा म्हणोन मागोन घेतले हे वर्तमान आपणास मौजे वरीये ता खेडेबारे येथ कारकूना पा होतो तेथे कलले त्यावरून आपण स्वार होऊन पद्मावती किले राजगड येथे राजश्री राजे होते तेथे गेलो राजियाची भेट घेऊन त्यास बोलिलो की आमचे आमचे वतन बलेच घेऊन

दिल्हे त्यावरी परस्थल दिल्हे तेही मोडोन हाली चौडोजी बलाल निवाडियास पाठविले की गावीच निवाडा करणे हे कोण गोष्ट केली त्यास ते बोलले की क्षणभर चिमणाजी आपण होतो तू मजसि च्यार गोष्ट रदबदलीच्या सागणे जर आपण उतरास भागले तर चिमणाजी खोटा तू भागलास तर तू खोटा येसे बोलिल्यावर सदरहू पुणियामधे नारो भिकाजीची व याची रदबदली जाली तितकी मागती सागितली त्यास राजश्री राजे बोलिले की तुम्ही मुतालिकीस पेटस टेविले आसाल आपण उतर दिल्हे की नऊ दहा वरशे निपोटी चाकरी केली व नागवणाही दिल्हे ते वेलेस फिर्कीरीत नव्हतो व काही फतुही होते आपण काही दिल्हे नाही येसे आसता आपण तुलिलो कैस येस उतर दिल्हे येसी उदड रदबदली जाली मग आपण राजे साहेब उगेच राहिले मग आपणास बोलिले की त्याच्या वकिलानी आपणास भिडेस घालून परस्थळ मोडून चवडोजीस गावच्या निवाडियास मागोन घेतले तेथवर जाणे तो कैसा निवाडा करील तो मनास आणने बरहाक करीत तरी पेस्तर आणीक विचार करू येसे बोलिले त्यास आपण चवडाजीपंताकडे न जाऊ म्हणोन उदड हाटकिले परतु आतिशयेच तेथवर जा म्हणो लागले मग जरूर जाहले मग पेट सिवापुरी चवडाजी राहिला होता त्यापासी त्याची भेट घेतली त्यावरी दुसरे दिवसी बोलाऊन आपणास व चिमणाजीस त्या बापभाऊ बोलाऊन आणिले वंशावली आपणास विचारल्या त्यास आपण सागितल्या चिमणाजीस विचारतो म्हणो लागला की हे आपले काही नव्हेत आपण नेरेकर आणि हे आरवीकर त्यास आपण उतर दिल्हे की नरे तर्फ येलवडखोरे यास दोन महार आड आहेत तेही ब्रीत आपलीच्च येसे आसोन आरवीतव्ही खेडबाराची पाणवथा येक या दोही गोस्टीनी यास समध नाही त्यावरी मागती त्याने पुसले की तुम्ही सुतक धरितां की नाही त्यास आपण बोलिलो की इतके दिवस दाहा दिवस धरीत होतो नारो बापोजी मेले ते वेलेस ब्राह्मणास विचारिता सात पिढिया जाल्या तीन दिवस धरावे म्हणोन धरितो चिमणाजीस पुसता तो बोलिला की आम्ही याचे सुतक धरीत नाही येशास आपण बोलिले की यानी आमचे सुतके धरीत असिले येसे त्याचे आगी लागिले म्हणजे हे खोटे येसा याचा कतवा घेणे त्यास चवडाजी बलालास त्याची पाठ राखने सबब सभेमधे कतवा न घेता उगच मनास आणिता आम्हास म्हणो लागले की तुम्ही खरे करून देणे त्यावरी आपण त्याचा बापभाऊ सिवाजी आवजी तो त्यामधे वडील होता त्यास आपण त्याच्या तिघा लेकाची आण घातली की सते बोल त्यास आपण विचारिले आंताजी बापुजीचे वऱ्हाड पुणियामधे होणपासी जाले ते वेलेस वऱ्हाडास आमचे आजे रुद्राजीपत व आमची आजी बरवाई ते वऱ्हाडास आली होती तेथे बरवाईस वेथा होऊन वऱ्हाडामधे देवआज्ञा जाली तेव्हा सोहिरीयाचे घरी बापूजीपत व कुलवऱ्हाडी भोजनास बसले होते त्यास समाचार कलताच उठले सुतकाचा निर्वाहा ब्राम्हण बसोन केला सात पिढ्या दाहा दिवस सुतक धरावे मग

तीन दिवस सुतक धरावे येसा निर्वाहा जाला येसी गोष्टी सिवाजी आवजीनीं दिल्ही मग उगच राहिले त्यावरी चवढाजी म्हणो लागले की सुतकाचे ठाई धरिता अतर पडिले त्यास आपण उतर दिल्हे की नेणता भटाचे बोले अतर पडले असले तर आपण बापभाऊ नव्हे की काय त्यास ते बोलिले की बापूजीपत समर्थ आणि त्याचे सोहिरे धाइरेहि समर्थ हे तुम्हास नक्ळे तेधवा त्याचे तुम्ही बापभाऊ नव्हा त्यास आपण उतर दिधले की महादमट महाभास व बापभट ठकार हे फेळवडियात होते त्यास लेहून आणवले त्याने आपल्याहि मते लेहून उतर आणवले आपण बोलिलो तैसच उतर आले त्यावरी आपण बोलिलो की तथापि येक वेळ आपण सुतकास चुकलोहि आसिलो तर बापभाऊ कैसे नव्हे बापूजीपंताचे लेक चिमणाजी हे प्रतेक्ष पदाजी नाईकाच्या बटकीच्या घरात राहोन तिचे चुलीवरी भात करून खाऊन त्याजवरी विडीयाच्या पिका टाकून तिसी संभाल करून येसी विल्येव अनाचार हे मुधाजी व त्याची माये अकाई हे तुम्हा सेजारी आहेत हे अनाच्यार वर्ततात तरी यास लेक व बापभाऊ नव्हे म्हणाल की काये त्यावरी उगेच राहिले मग सिवाजी आवजी बोलिले की तुम्ही सिवापूरचे मुतालिकेसच ठेविलेस त्यास आपण उतर दिल्हे की तू सत्य स्मरून बोलत नाहीस आजीच तुज क्रिया लागल तेच दिवसी मल्कू देवरकर याचे घरी त्याची गुरे होती साहीकारी गाय येताच फोवीरडोन मेली त्यावरी चिमणाजी आपणास बोलिला की कसबायेस मुनालीक जईतपली म्हणून होता त्यास ठेविले होते तो मेलियावरी तुमच्या आर्जयास ठेविले येसीयास आपण उतर दिल्हे की जैतपली धुणयी होता लेहु लिफला होता तो बापू मालियाचे घरी आसत आस आमच्या बापाच्या वेळेस मुलास लेहु सागत आसता आमच्या बापादेखत मेला तो आमच्या आज्याआधी कसा मुनालीक होता त्यावरून त्या गोस्टीने लटके जाले त्यावरी सारकाली चवडाजीपती आम्हास व चिमणाजीस बोलाऊन नेले म्हणू लागले की तुमची गोष्टी साक्ष विचारावयास कोण कोणास बोलाऊन आणावे त्यास आपण बोलिलो की बहुता दिवसाचे पुरुष असतील त्यास बोलावणे ये तपसील

बुवाई आवा देशमुखीन — फानजी ना १

समाजी पाटील

—————— गोगल्वाडीकर १

दरणा गुरव

नसरापूरकर

येणेप्रो यालेरीज आणीकहि थोर वडील आसतील ते बोलाऊन पुसणे येसे सांगितले यावरी त्यानी सदरहू बोलावावे हे टाकिले आणि त्याने पक्षीतेने दुसरे दिवशी बोलाविले आणि आठ दिवस हे गोष्टीची रदबदल होत होती तो

रोजाच्या रोज जें माणूस परनिष्ट बोलणार त्यास दापादापी करीत आपणासारखी गोही देणे म्हणोन सागणे गोही द्याना म्हणजे रा साहेब व सरकाकून तुमचा उबर राखणार नाहीत म्हणोन दबावीत ते देवसी रात्री चिमणाजी आपणास बोलिला की कानजी नाो व नागोजी नाो बापलेक भाडले आहेत त्यांची समजाविसी करू म्हणोन आपणास सागाते घेतले तोहि येक मते होता म्हणोन त्यावा पेठेतून कसबीयात आलो तो पाहार रात जाली आपला बोस वाडा तेथे नेले आणि आडाचे काठी उभा राहिला इतकीयात आलो कसाबाचा लेक व बाबाजी खाटीक याचा लेक आणि दो़घेजण यैसे तेथे आले आणि आपणास झोबो लागले काये मुदा होता तो न कले आपण त्यासी झीडाडून चालिलो तो हिरोजी बाटील सोमन पाटिलाचा लेक त्याची म्हैस चुकली तो पाहात पाहात तिकडे आला त्याबराबरी आपण दादाजीपताच्या वाडियावरून नागेशाचे टोगीवरून सिवापुरास आलो दुसरे दिवसी गोहींचा प्रसग पडिला तो त्याचे पक्षीचे न ज्यास दापिले होते ते फडास आले मनास मानिले तेसी गोही देऊ लागले त्यामधे कानजी नाो व बुवाई आवा देशमुखे आली त्यानी गोही दिल्ही की वडील घर सखो भिकाजीचे वृती याची ते वले खातात हे खोलेश्वर स्मरोन सत्य आपण सागत आहो त्यास नागोजी ना कानजी नोकाचे लेक बोलिले की आमचा बाप हे आफू खात आहेत त्याचे बुधीस चल जाला आहे हे बरे होते तेव्हा आपण सागितले आहे की चिमणाजी बापू धणी तैसीच गोही लिहिली आहे कानजी नाकाची व बुवाई आवाची गोही मानली नाही यावरी मजीनाईक धाकटे बोप्रजीचा लेक तो भिकारी होता त्यास चिमणाजीने च्यार मण दाणे देऊ करून गोही देविली की बोपजो ना धाकटे त्यानी येकवेल रुद्राजी नारायेण याणी कसबाचे कुलकर्ण खात आसता त्यास कसबाचा हक मागितला तो त्याने दिल्हा नाहीं म्हणोन आपल्या बापानी त्यास म्हटले की तू कसबा खाऊ नको ते वेलेस आपण धाकटे होतो ते आपण यैकलें हे सत्य यैसी गोही दिल्ही त्याचे सिकविल्याप्रो त्यास आपण उतर दिल्हे की बोपजी नोकाचा चुलता जाखोजी नाो ते तुझ्या बापास आडसेरी देत आसे त्याचे बगर रजा कसबाचा हक तुझिया बापास आपला आजा कैसा देऊ पाहतो येक रुका देता तरी जाखोजी ना जिवेच मारिता यास लटिके म्हणसी तरी सखाजी मोरदेव याचा भाऊ देशमुखीची मुतालकी करीत आसता काहीं चुकला चाकरास सागितले की यास मारिणे यैसे म्हणताच तो खासनीस देसमुखाच्या वाडियातून पलाला तो बाजारांत चाहुडी होती तेथे हवालदाराची पाठ निघाला तेथे जाखोजी नो: जाउन बाजारात निंबाचा पार होता त्यावरी उभा राहोन हवालदारास दटाऊन तिरान खासनीस जिवेच मारिला यैसा जाखोजी ना दारुण आसता तुझ्या बापास हक कोणे देऊ

पाहतो यैसी थोताडाची गोही दिल्ही याने काये बरे होते यैसे आपण बोलिलो त्यावरून चिमणाजी बोलला की मल्हार कोडो मुधाजी मल्हारीचा बाप त्याने महिना दोनी महिने कसबा चालविला त्यास आपण उतर दिल्हे की कोड-सेटी सुकाला वाणियात कारभारी वाणी होता त्यामधे व आपले आजे रुद्राजीपता मधे कलागत जाली त्यानी त्यास थोरले बोपजी ना आपले आजीयास रागेले म्हणोन आपले आजे रुसोन चाकणेस महिनाभर गेले होते मागती बोपजी नो थोरले याणी समजावीस करून आणिले मागती कसबा खाउ लागले यैसा त्याचे दावदुव करून गोही मनास मानिले तैसे लेहु लागले वेकावा वेखडा फेलवडेकर त्याचा मुतालीक तो येखाद्याने सुधी परनिष्ट गोही दिधली तऱ्ही त्याचेसारिखी गोही लिहीता मग ते धर्मता होईनासे जाले हे देखोन हाकबोब केली की आपण पहिले-पासोन गावचीया निवाडीयासी राजी नाहीं व चौडोपतासहि राजी नाहीं म्हणोन परस्थल मागोन घेत होतो सेवट ते मोडोन जुलूम करून यैसे करिता यास आपण राजी नाही म्हणोन उठोन स्वार होऊन रा राजेसाहेबापासी राजगडास गेलो आवघे वर्तमान राजीयापासी सागितले चवडाजी बलाल आम्हास पुसू लागला की नारो बापोजी मेले त्याचे सुतक तुम्ही किती दिवस धरिले होते त्यास चिमणाजी बोलिला की नारोपत मेले ते यास काये ठावके आहे त्यास आपण उतर दिल्हे की तू आध्यमपणे बोलतोस नारो बापोजी हा व परसोजी माहाडीक व सताजी बोपडा तिन्ही जुमले लोहोगडीहून नेतोजीचे सरनोबतीचे वेलेस [1]सुरतेहून आली-यावर लोहगडी लस्कर राहिले तेथे नारो बापोजीस [2]राहुजी पनकीयाची लेक नवरी पाहिली वागनिश्चये केला वऱ्हाडायदल चिचवडीहून सौ भागुबाई नेली तेथे लोहगडीस ठेवली स्वारीहून आलियावरी लग्न करावे यैसे करून सदरहु तिन्ही जुमले स्वारीस लोहगावापासी आले तो वडगावाजवल वडाखाले मुकुंदसिंग रजपुत होता त्यासी गाठ पडली ते वेलेस चिमणाजी पुढे हुटीस गेला नारो बापोजीस तीर थनसरीस लागला तो घोडा गजरत्न आसनकोहो होता त्यावरी जीव गेला तो आपण जवल होतो घोडियाखाले पडला आपण उचलोन घोडियावर घातला परसोजी माहाडिकास व सताजी बोपडा त्यास सागोन पाठविले चिमणाजीहि त्याचा आला तो आपण नारोपतास घेऊन सोनवणीयाची आल्दीस चालिलो कटकहि आले गनीम पाठीवर येत आसे नारोपताचा मुडदा घेऊन आलदीस येऊन आपण दहन केले ते वेलेस सभाजी मोरदेव नारोपताचे मजमदार होते [illegible] तुने परसोजी माहाडिकाचा मुजमदार त्याच्या श्रधेपावात चिमणाजीस जेऊ घातले आपण उपोषण केले दुसरे दिवसी वटकीहून जाऊन आग गोला करून सागातेघेऊन लोहोगडास आलो तेथून

१ शिवाजीनी सुरतेवर पहिली स्वारी केली
२ हे रावजी सोमनाथ असावेत.

राजगडाजवल हस्तीस मंत्रआग्र दिल्हा दाहा दिवस सुतक धरिले यैसे सागितले मग चिमणाजी खोटा जाला सदरहू करिना सुतकाचे वर्तमान वरले बंदी लिहिले आसे येणेप्रो बोलोन राजगडास जाऊन राजश्री राजेसाहेबास वर्तमान सागितले की चवडाजी परनिष्ट मनास आणीत नाहीत त्याची पाठ राखोन मनास आणू लागला म्हणोन आपण त्या फडास राजी न होता साहेबापासी वर्तमान सागावयासी आलो आणि तेथे च्यार दिवस राहिलो तो मागे आपण आलियावर चवडाजीने व चिमणाजी बापोजीने लोकास दाबदुब करून लटक्रिया मनास माने तैसी गोहीचा जाबता करून घेऊन आले त्यावरून [1]आवई व मोरोपंत व बाबाजी नाा व रघुनाथपंत कोरडे व चवडाजी बलाल आणि कितेक त्याचे वकील मिलोन राजश्री राजेसाहेबास म्हणो लागले की गोहीचा कागद आणिला आहे त्यावरून सखो भिकाजीपासून खोटेपणाचा कागद करून देवणे म्हणोन सागितले तो तेच दिवसी मोरोपंत पेसवे याच्या घरास आपण व त्रिंब [क] विश्वनाथ पानसी यैसे दोघेजण आवई दबीरीणीच्या घरासरून जात होतो तो आपले दारी आवई व तिचा लेक त्रिंबकपंत व रघुनाथपंत कोरडे यैसी उभी राहिली होती आपण वाटने जाता आपणास म्हणो लागले की तू चिमणाजी व बालाजीसी भाडतोस ती वृती आमची आहे त्यास आपण उतर तीस दिल्हे की बापोजी मुदगल तुमची लेक आपण घेऊन तुम्हास लेक बालाजी बापोजी दिल्हा हे मज कलले नवते यैसे आसले तर मजसी व त्यासी लिगाड तुम्हास बोलावयासी संबंध नाही यैसे उतर देता ते बायेको तैसीच राजियाकडे गेली हाट घेऊन बैसली की सखोपंताचा कागद करून देणे आपण तैसेच मोरोपंताच्या घरास आलो तो मोरोपंतहि आपणास दाबदुब करून बोलो लागले की गोहीचा कागद आला आहे तो आता खोटेपणाचा कागद लेहून द्यावा लागेल यैसे मोरापंती म्हटले त्यास आपण उतर दिधले की आपणापासून लेहून घेई यैसा कोण्ही दिसत नाहीं ते बोलिले की आपण दिसत नाही की काये आगर राजश्री राजेहि दिसत नाही की काये यैसे बोलिले त्यास आपण उतर दिल्हे की बरहाक होत नाहीं तेव्हा कोण्हीहि दिसत नाहीं त्यावरी मोरोपंती विश्वनाथभट दीक्षित सिवणेकर आपल्या पोवनमावळच्या वृतीनिमित्य राजगडास आले होते त्या हाती मोरापंती निलोपतास सांगोन पाठविले की तुम्ही आम्ही सोयेरे जालो आहो तुमचा लेक रामचंद्रपंत त्यास आम्ही आपली लेक सोयेरीक देऊ केली आहे तुम्ही आम्ही सोयेरे तुम्ही सखो भिकाजीच्या कथलीयांत मन न घालणे राजश्री साहेब आज त्यापासून बऱ्या बोले कागद लेहून देईल तर बरे नाहीतर वाईट करून लेहून देणार आहेत तुम्ही काही फड न घालणे यैसे सागोन पाठविले ते पदमावतीस निलोपंताच्या आगनात उभे राहोन सागो

१ सोनाजीपंत डबिराची स्त्री

लागले तो आपण बाहेरून गेलो तो दोघे उभे राहुन आम्हास निलोपती बोलाऊन सदरहू वर्तमान सांगितले आपण त्यास उत्तर दिधले की तुम्ही उगच जासणे जे होणार ते होईल त्यावरी निलोपती विश्वनाथभट बराबर सांगोन पाठविले की तुम्ही आकरीत करिता आणि पाठ राखिता आणि सखोयावरी आकरीत होईल तेव्हा कैसी पाठी राखोना हे मुजमू गेली आगर तुम्ही मूल न द्या तरी दुसरी मेळऊ परतु आकरितात सिरणार नाही येसे सांगोन पाठविले तेच दिवसी साहिकाली आम्हास व केशो नारायेण व बालाजी बापोजी यास बोलाऊन आणिले आपण व केशो नारायेण राजेश्री साहेबाकडे वाडियात गेलो थकी [1]गोमाजी नाईक व कृष्णाजी नाईक सोकटी खेलेत बैसले होते त्यांपासी उभयेता बैसलो ओसरीवरी राजेश्री साहेब व पेशवे व बावाजी नाईक रघुनाथपंत कोरड व निंबकरत ढवीर आचई येसी व चौंडोजी बलाल येसे बैतले होते बंकास व वोसरीस पाच सा हात अंतर होते येसीयास राजेश्री राजेसाहेब येकत व सभासद येकत येसे आपण वर्तमान उभयेता नाईकासी केशो नारायेणासी बोलो लागलो आपण नाईकास म्हटले की याणी दिवाणचले व पैकीयाच्या बळे आपली म्रती घेतली आणि आपण राजेश्री साहेबास विनती करून धर्मन परस्थळ मागीतले ते यानी मोडून चवडोजी बलाल गावीचा निवाडियास मागितले आपण त्यास राजी जालो नाही यानी गावास जाऊन लोकास दाबदुब करून गोहीचा कागद करून आणिला आहे तोच कागद याणी घेऊन आता तुम्ही परस्थलास चलावे आगर म्हसलीयास जाऊन कोश घ्यावे आगर तो कागद कपाळी बांधोन दिव्य करावे इतकेहि न करीत यास पैका फार जाले आहेत कैस म्हणाल तर कोंढाणा निजामशापासून घेतला सिदी आंबर धरिला ते वेलेस पनाससाठी हाजार व्हनाचे वित पातशाहाचा खजिना वरी होता तो लुटून आणिला माहुलीस महाराज निजामशाही दिवाण घेऊन गेले होते ते वेलेस मोगल व इदलशाही नामजादी माहोलीखाली वेढा बैसला होता त्यास सामान व खजना विज्यापुरीहोऊन डोणजाचे खि[डी]तून जात होता तोहि लुटलीयावरी मुधाजी मायघा निजामशाही तो पडून खेडबारीयास याच्या घरास लक्ष व्हनाने वित घेऊन आला तो आपलीया घरात याणी गुप्तरूपे ठेविला होता येसीयास [1]पुरधरास रा[जारा]ऊ ईदलशाही वेढा आला तो मुधाजीस धरावयास जगो लागला येके दिवसी बुधपळ खेळत आगता वाडियात रायेगऊ याचा माहाल्दार येऊन हाती धरिला त्यावरी गदरी करून बापूजीपंती भट म्हणूज हातीचा घेऊन चाकराचे रूप त्यास देऊन व त्याचे माइलेश धटकीचे रूप देऊन रातोरात रोहिडियास पाठविले तेथ गोविंद मुत्रगलाने मकुंचे तेथील नाईकबाडी त्यापाशी पाठविले तेथेहि त्यास पाळती लागली तेथून ते गदफ

[1] पानसंबळ

लक्ष्मीश्वराकड गेले तिकडेच मेले ते पैके त्याचे वित यास जिराले त्याचे बळे थोर-थोराशी सोईरिका केल्या आणि वकील करून मनास मानिले तैसे करितात आणि मजपासून साहेबीच्या बळे कागद लेहून घेऊ म्हणतात तरी आपण ब्राह्मण लेहू जाणत आहे आपली ब्रह्महत्या केली तऱ्ही लेहून देणार नाही राजियाने अनीत केली तरी मज येकास मारील माझे भाऊबंध साहा सात आहेत ते तऱ्ही आपली ब्रति घेतील आपणही मेलियावरी ब्रह्मराक्षस होऊन जे कोण्ही पाठीराखीत आहेत त्याचा वंश नाहीसा करील अबदूल वाटेस कोलाटी आले होते त्याणी कुत्रीम नदी आणून गावकरी-यास दाखविली ते नदी गावाजवळ असावी म्हणोन कोलाटी मारिले येक बाईको गरीब गारोडीण होती तिचे पोटी लेक जाला त्याने विद्याभ्यास शिकोन आपल्या बापाचा सूड घ्यावयास येऊन गाव बुडविला तैसे आपले वौशी कोण्ही तरी निर्माण होईल तो जे पाठी राखितात त्याचा व वाद्याचा निर्वाह करील यैसीया कितेक गोस्टी उभयेता नाइकास व केशो नारायेण यापाशी राजेश्री साहेब यैकत यैशा शांगितल्या त्यावरून काये राजियाचे चिती वाटले मग प्रहर रात्रपावेतो बैसले होते त्यातून खासा आपण उठोन निद्रेस गेले मग अवघच हालू हालू उठोनी आपल्या घरास गेले मग आपणही व केशो नारायेण उभयेतानी भिकाजी नाईक दिवटीया करून राजेश्री साहेबाचा निरोप घेऊन घरास गेलो दुसरे दिवसी आवई व त्याचे वकील जाऊन राजेश्री साहेबास हाटकिले की कागद घ्यावयास काली काय म्हणोन गइ केली आजी कागद घेऊन देणे त्यावरी राजेश्री साहेबी त्यास सांगितले की तो धर्मतेन बोलतो आणि तुम्ही आमच्या बळे घेऊन मागती त्यापासून जुलमे कागदहि मागता परस्थलास निवाडियास जात नाही यावरून तुम्ही खोटे आहा तुम्ही आपले कार्येभागी म्हणऊन तुमचे भीडने बरहाक करीत नाही च्यार दिवस तैसच टाकिले आहे पुढे जे होणार ते सुखीच होये कागद काही त्यापासून आमच्याने ध्यवत नाही यैसे यास फजीत करोन सांगितले मग कागद लेहून मागावयाचे वर्तमान राहिले दुसरे दिवसी आपणास राजेश्री साहेबी बोलाऊन नेहून सांगितले की तुझ्या निवाडियाकरिता कुल आपले कार्येभागी दुखी होत आहेत आपल्या कार्यास धका देत आहेत आपल्यावरी ये प्रसंगी राजकारन पडले आहे तरी चिमणाजी बापोजी बालाजी व बापोजी यास दुखी करिता येत नाही च्यार दिवस निवाडा राहू देणे यैस कितेक प्रकारे आपणास समजाऊन सागितले पुढे मनास आणून तुझे वतन तुजला माहाराज देतील त्यावरी आठ-च्यार दिवस तेथ होतो तो यादो सिधनाथ हे पंढरपुरास गेले होते तिकडून आले ते सिवापुरात जावजी कुटे माहाजन त्याचा लेक गोविद कुटा त्याचे घरी राहिले होते साईकाळाचे वेळस केशव नारायेण यादोपंताचे भेटीस गेला त्यास यादोपंती पुसिले की सखो भिकाजीचा तुमचा कथला होता तो कैसा जाला त्यावरी त्याचे

हाती महजर होता तो यापासी वाचावयास दिल्हा त्यामधे मकसूद आम्ही खोटे आपण खरे ऐसे आपणास पाहिजे तैसा करून घेतला यावरी सिके निशान सर्वाची होती तो महजर त्यानी वाचिला मागती त्याचा त्यापासी दिल्हा त्यावरी दो घटकानी आबदेव भट व सिवभट ठकार जोतिसी त्यापासी आले त्यास यादोपती म्हटले की सखोपताचा व चिमणाजीचा वेव्हार होत होता ते कैसे जाले त्यास भटानी उतर दिल्हे की त्याचा निवाडा जाला नाही तैसेच राहिले सखोपंत उठोन राजेश्रीपासी गेले त्यास यादोपंती उतर दिल्हे की केशवपतापासी महजर होता तो आपण वाचिला त्यावरी निशाने देशमुखाची व सर्वोची व तुमची देखील आहेत त्यास भट मजकूर बोलिले की तो महजर केशो नारायेण याचा केशो नारायेणे मुधो मल्हारीस दिधला आहे तो महजर पहिले केला होता तो तुम्ही नेला त्याची तालीक करून आणिली आहे त्यावरी निशाने करणे देसमुखाचे सिखे आहेत म्हणून आम्ही निशाने करून दिधली हा कुरनीम महजर करून आम्हापासून निशाने करून घेतली हे आम्हास कलले नाही आगर देशमुखानीहि महजर वाचून पाहिला नाही त्याच्या बोलावरी विश्वासोन सिके व सर्वांनी निशाने केली इतके यादोपंतास उतर देऊन तैसेच उठोन देशमुखाचे घरास गेले त्यास सहरहु वर्तमान सागितले तैसेच सेटे माहाजन व समस्तास वर्तमान सागितले त्यावरून देशमुखानी केशो नारायेणास बोलावू पाठविले तो केशो नारायेण पलून सोनगडास गेला ऐसे वर्तमान जाले सदरहू वर्तमान यादो सिधनाथ राजगडास आले त्याही सागितले त्यावरून आपण जाऊन राजेश्री राजेसाहेबास निवेदन केले त्यावरी राजेश्री साहेब बोलिले की ऐसी गोस्ट घडणार नाही देशमुखास लेहून समाचार आणवणे त्यावरून आपण देशमुखास लिहिले की आपला व चिमणाजीचा निवाडा जाला नसता ऐसा महजर करून दिल्हा त्याचे उत्तर राजेश्री साहेबाच्या नावे साकल्य बखर लेहून पाठऊन देणे त्यावरून खरेखोट साहेबास कलेल ऐसे आपण लेहून पाठविले होते त्यावरून त्याही राजेश्री साहेबाच्या नावे बखर लेहून पाठविली की केशो नारायेण मुधो मल्होरीस दिधला होता त्याचा महजर नारो बापूजीने घेतला होता तो महजर ठेविला होता तो भिजला आणि तुम्ही पलोन गेला त्याची तालीक केली आहे त्यावरी सिके करून देणे म्हणून आम्हास सागितले बराबरी मुधो मल्हारीहि होता आणि कनीम महजर करून आम्हास मखसूद ऐसा सागोन सखो भिकाजीचा महजर केला आणि आम्हा पासून सिके करून घेतले तैसेच सेटे व महाज[न] व भट व दाहीजण याच्या गोहा व निशाने घातली जबानी मखसूद केशो नारायेणाचा सागितले आणि सखो भिकाजीचा महजरावरी सिके करून घेतले सखो भिकाजी हा खोटा आपण खरे हा मखसूद त्यामध्ये लिहिली आहे हे आपणास कलोन आपण सिके केले आसिले

तर आपण गुणेगार सखो भिकाजीचा काही निवाडा जाला नाही यैसी बखरे लेहून पाठविली त्यावरून राजेश्री साहेबासहि पस्ट कलो आले त्यावरी पुढें कटकट आणिक करावी तो राजेश्री साहेब बारदेसाचे श्वारीस गेले मुलुखहि खराब याकरिता राहिल जे वेलेस आपणापासून बलत्कारे कागद लेहून मागत होते तेंव्हा चिमणाजी बापूजी-ने राजेश्री मोरोपतास लेहून पाठविले की आपण येथ सखो भिकाजीस खोटे केले आहे हाली हुजूर आले आहेत तेथेहि तुम्ही सर्व प्रकारे त्यास तोडघसी दिधले म्हणून आवघे बापभाऊ उगेच राहतील यैस लिहिले होते तोहि राजेश्रीस निवेदन केल्यावरी कितेक दिवस तैसच राहिले मग सुवर्णदुर्गीहून आपण देवदर्शनास जेजु-रीस जावयास सहपरिवारे आलो देवदर्शन करून सिवापुरास गेलो सिवापुरात चिमणाजीची माये द्वारकाही व त्याची बहीन नागराबाई व वरकडहि माणसे होती त्याची भेट घेतली चिमणाजीचा समाचार घेता चिमणाजीवरी तजकरा आणाजीपती केला होतां त्याची निकड लाविली होती त्यावरी चिमणाजीने जरूराई करून बारा मावलावरी कवुलाती केली व्हन पाठवणे त्याची तक्षीम कोंडे देशमुख-यावरी आली त्यास यैवज नाही म्हणून कसब्याची पाटलकी हिरोजी इदलकर यास विकावयास आपण व नागोजी नाईक व येशवतराव यैसें जाऊन दमाजी कोंडे याच्या मल्यात प्रस्थाने गेले होत तेथे जाऊन आपण भेटी घेतील त्यानेहि घरास बोलाऊ पाठविले होते त्यावरून जाऊन भेटी घेतली चिरजीव रुद्राजी व गोदोबा सागाते होते त्यास ऊस व हरभरा आणून दिल्हा भोजनास राहवीत होता त्यास आपण राहिलो नाही आरवीस जातो म्हणोन म्हटिले त्यावरून निरोप घेऊन आरवीस गेलो तोहि तेच दिवसी रात्री चिमणाजीहि आरवीस आला तेथे येऊन धनाजी कासार याचा सासरा त्याचे घरी राहिला दुसरे दिवसी गंगाजी विठल याचे घरी आपण होतो तेथे आला त्यान व आपण व रामभट घोडे यैसे येके ठाई भोजने केली आपली समजावीस केली कसबा व सिवापूर दिल्हे म्हणून चिरजीव रुद्रोबाचे डोईस आपले डोईचे मदील किमत व्हन १० दाहाचे होईल ते बाधले मग आपण-हि त्यास येक कोचकी व दुपटा दिल्हा तीर्थरूप भिकाजीपतास पत्रहि लेहून दिधले की तुम्ही गावास येणे सदरहु वर्तमान नागोजी नाईक व येशवतराव त्यासहि कलले सदरहू वर्तमान जाले याची याद आलाहिदा आसे याही येक व आपला कागद आपले दस्तूरचा लेहुन दिधले आपण श्वार होऊन सुवर्णदुर्गास गेलो तेथून तीर्थरूप भिकाजीपंतासी सिवापुरास पाठऊन दिधले सिवापुरात येऊन चिमणाजीची भेटी घेतली त्याचेच घरी दोन च्यार दिवस होते कसबा व सिवापूर तुमचे तुम्हास दिधले यैस बोलिला ब्रहस्पतवार सिवापूरचा बाजार आला ते दिवसी जकातीची टीप धरावयास भिकाजीपंतास पाठविले ते टीप लिहीत होते तो मुधो श्रीपती याने येऊन दुराई दिल्ही हे वर्तमान भिकाजीपती चिमणाजीस जाऊन सागितले त्यावरी

त्याने उतर दिल्हे की आपण तो मनापासून दिल्हेच आहे परतु भाऊबध कथला करितो यासहि सागोन इतकीयात बालाजीपतहि कर्नाटकातून येणार आहेत आवर्धीयाच्या वीदमाने निर्वाहारूप तुमचे तुम्हास देऊ आपण तो दिल्हे आहे त्यावरी भिकाजीपंत चिमणाजीचा निरोप घेऊन सुवर्णदुरगास आले पुढे गलबला फारच जाला मुलूक वोस पडला निवाडा तैसाच राहिला आसे'

---

(ले.१५२) श. १५७८ वै. व. १२] श्री [इ. १६५६ मे ११

राजश्री राघो अनंत हवालदार व कारकून मामले मुर्तजाबाद ऊर्फ चेऊल गोसावी यास

अखडित लक्ष्मी आलकृत राजमान्ये सेवक [1]आबाजी माहादेऊ सर सुभेदार व कारकुन सुभे अहद कल्याण भिवडा व सुभा प्रात चेऊल मामले राईरी नमस्कार विनंती सुा सीत खमसैन अलफ ईदीलशाहाचे कारकीर्दीची बरखास्त वसूल नेहटा-वयासी बदल सारे देशमूख व अदकारी व देपकुल्कर्णी व सेटे महाजन यैसे मुकाम किले प्रबलगडास आणिले त्यास आज्ञा केली की कारकीर्दीचा वसूल नेहटोन देणे त्यावरून सारे देसकुलकर्णी याणी वसूल बरदास्त लेहून दिल्ही अपाजी तावजी देसकुलकर्णी मामले चेऊल याणे जाब दिल्हा की आपण कारकीर्दी निजामशाहा व इदीलशाहा तागाईत जमाबदी करून देतो रयेतीचा वसूल लिहीत नाही वसूल मजम्तफरी लिहितात त्यावरून मशारनिलेची बाजपुस केली की तू देशकुलकर्णी म्हणवितोस आणि वसूल लिहीत नाही फुकट हक खातोस त्यावरून गुन्हेगारी लाऊन खंड घेतला हाली आपले राज्यात वसूल कुलकर्णी याचे दफ्तरी व मजमूचे दफ्तरी रुजू मोझ्याबगर चालत नाही म्हणौन मामले मजकुरी तपो तपा व माहाल आगर चेऊल येथे कुलकर्णी नाहीत म्हणौन तह केला त्यासी तपो तपा कुलकर्णी ठेऊन त्याचे हताने जमे वसूल बाकी करून वसूल मजमूदफ्तरी व कुलकर्णी याचे दफ्तरी रुजू करीत जातील त्यास हक व कागद बाब नि॥ रयेत केला असे त्याचा जाबिता मामले मजकुरी पाठविला आहे तेणेप्रमाणे वर्तणूक करून कुलकर्णी ठेऊन वर्तणूक करीत जाणे हाली पुतलाजी माहादेऊ हुजूर फ्तरी मदतनिसी करीत होता त्याणे मेहनत बहूत केली शाहाणा लिहीणार देखोन

---

' सदरहु करिणा रा. बळवंतराव मुळमुळे, राहणार मौजे कोंढणपूर, याजकडून श्री. रावसाहेब गंगाधरराव बाबासाहेब देशपांडे यास शके साली मिळाला. तो त्यांनी भा. इ. स. मंडळ, पुणें, येथील शके सालच्या वार्षिक संमेलन-प्रसंगी वाचिला.

१ आबाजी महादेवाचा उल्लेख श. १५९२ मधील पत्रांत (खं. २० पृ.२०३) आला आहे.

म्हणौन कृपालू होऊन त्यापासून सरणी बसरी लाहारी ५०० पाचसे हुजूर घेऊन यासी वतनी माहल आगर चेऊल येथील कुलकर्ण देऊन पाठविला आहे यापासून कुलाची जमे वसूल साल दरसाल घेऊन भोगवटा चालवीत जाणे यासी हक निा रयेत देखील कागदबाब बसरी लाहरी ३६० तीनसे साठ

बा मुा ३१२ — कागद बाब ४८

यो लाहारी तीनसे साठ साल दरसाल देऊन साल दरसाल भोगवटा चालवीत जाणे तालीक घेऊन असल परतोन देणे रा छ २५ माहे रजब

(ले. १५३) श्री

सिवाजी राजे — नकल

यादि वाटणी मुशाहिरा देसक मामले चेऊल कारकीर्दी माहाराज राजश्री छत्रपती स्वामी सालिना होन पातशाही ६००

ता

| | | |
|---|---|---|
| पेशजी बोलीप्रा वाटणी कृष्णाजी | | दामाजी आपाजी देशकुलकर्णी |
| माहादेऊ देसाई होन | २४१ | होन २४१ |
| बावाजी विठोजी अदकारी होन ११८ | लग | ० |

सदरहूप्रो वाटणी करिता त्रिवर्गांत कजिया भाडण लागले ते समई त्रिवर्ग बसून आपपलीयात समजावीस काढिली दामाजी आपाजी देसकुलकर्णी यास लिहीणार ठेवणे त्यास मुशाहिरा पडतो मुल्की याफ्ती वुडाली हक जमा जाले याची बेगमी करून द्यावी ऐसें भाडण लागले तेव्हा कृष्णाजी माहादेऊ देसाई याणी आपले यैवजी होन देऊन समजावीस केली

कृष्णाजी माहादेऊ देसाई होन २४१ पैकी दिल्हे
१४ बावाजी आदकारी यासी दिल्हे आणि समजाविले
५१ दामाजी आपाजी देसकुलकर्णी याचे लिहीणारास दिल्हे आणि समजावीस केली
—
६५
बाकी आपण द्यावे १७६

बावाजी विठोजी आदकारी यासी पेसजी वाटणी होन ११८ कृष्णाजीपंत देसाई याणी आपले वाटणी पैकी दिल्हे होन १४
होन १३२

आपाजी तावजी देसकुलकर्णी यासी समजावीस
२४१ वाटणी
५१ कृष्णाजी माहादेऊ देसाई याणी दिल्हे
—
२९२

तारीख छ १३ जिलकाद

पु.द.१८

(ले.१५४) श.१६९० मार्ग.व. ९] श्री [इ. १६६८ दिसें. १७

[1]मशरहुल हजरत राजेश्री विसाजी बल्लाळ सुभेदार व कारकून महाल सरदेशमुखी सरकार महाल ता। पुणें प्रति राजश्री शिवाजी राजे दंडवत सुहुर सन तिसा सितैन अलफ. पंताजी गोपीनाथ वोकील येंही हुजूर साहेबापाशीं येऊनु सांगितले की पो। सुपें व कर्याती बारामतीचे देशकुलकर्ण पूर्वापार आपले आहे. आपले वडील......वोकील त्या तागाईत खादले विठल माहादेऊ व त्रिंबक गोखदेऊ बुचके खातात व ... मुतालिक दोनी चार कारकीर्दी भांडत होते. मलिकंबरें निवाडा केला आहे तो फर्मान बादशाही शिक्यानिसीं व मलिकाच्या शिक्यानिसीं आहे व रणदुल्लाखान व राजेश्री [2]महाराज यांही निवाडे केले आहेती ते महजर हाली [सादर असेत] शास्ताखान व जशवंतसिंग व मिरजा राजा याने सदरहू कागदपत्र सनदा पाहून देशिकाची साक्ष व गोही पाहून, बरहक निवाडा करून देशपांडेपण लिखोन परवाने देवविले परंतु महालीं पैकियाच्या बळे वादी यानीं आपल्या मुतालिकास मिरासीवरी बसों दिलें नाहीं ऐसेयास हल्लीही आपणास व त्यास देशपांडेपणाचे भांडण लागले आहे तरी साहेबी पुर्णी अमीन आहेती त्यास लखोनु बरहक निवाडा करून विल्हे लावावें म्हणवून कित्येक तपसिलें वर्तमान सागितलें, वरून कळों आलें तरी तुम्ही तेथें आहां राजेश्री पंत यांसी व अमीन जे असतील त्यासी ... सागोनु त्याकडोन विठल महादेऊ व त्रिंबक गोखदेऊ बुचके यासी तलब करून व गांवमजकुरीचे व कर्यातीमजकुरीचे देशक व गावगन्ना......तमाम बोलावून आणून त्यांसी गोही साक्ष विचारून याचा व त्याचा बरहक निवाडा करणें अगर हरदो वादी यासी गोत.... .गोतमुखें त्याचें होईल तो खाईल तरी...बोलावून देणे आणि कुळकर्ण दिवाणांत आमानत (ठेवून) दिवाणांत जमा होई तें करणें तुम्ही हरएक बाबें या कामात मन घालून जितकी मदत तुमच्याने होईल तितकी करून, कार्यभाग सिद्धी पावे तें करणे बहुत लिहिणे तरी हेही कळतच आहे ऐसे समजोन सदर्हु लिहिले (प्रमाणे) कार्यसिद्धी होय तो पदार्थ करणे बहुत लिहिणे तरी तुम्ही सुज असा छ २२ रजब हुजूर [मोर्तबसुद]

---

१ भा. इ. सं. मंडळाच्या पत्रसंमेलन प्रसंगीं कै. रा. ब. पारसनिस यांनीं 'श्रीशिवाजीमहाराजांचें एक महत्त्वाचें पत्र' या टिपणासोबत ठेविलेलें हें पत्र आहे. असल पत्र मंडळाच्या संग्रहीं नसून पारसनिसकृत नकलेवरून हें येथें छापिलें आहे. रा. ब. कै. पारसनिस आपल्या टिपणांत 'पत्र असल असून त्यावर श्री 'शिवछत्रपति हर्षनिदान। महादेव मतिमत प्रधान' असा शिक्का आहे' असा उल्लेख करितात.

२ शहाजीराजे

(ले.१५४अ) श .१६४२ ज्ये. व. १४] [इ.स. १७२० जून २२

यादी कागद हिंदवी
१ इदल शाही मोहरी परवाना
१ आदजुल खान मोहरी
२ रणदुला खानाना परवाना मोहरी
१ राजीनाना सिकीयाना
१ खुर्दखत सिकीयानसी
+ + + + +
१ राजीनामा
१ हजीर मजालसी मोजे गुलसे
१ संभाजी राजे याच्या हातना कागद

१४ राजेश्री शिवाजी राजे याने कागद
१ रणदुलाखानाना कागद दादाजी कोंडदेऊ यासि
१ हिशेब च्यार हजार आठसे नव्यासी ४८८९
१४ तालीका फर्मान
१ प्रताप राऊ
१ कोरगावीनी नकल
२२ किरकोळ कागद
———
५० (?)
३७ पारसी
———
८७

ऐकूण कागद सत्यासी पारसी व हिंदवी राज शके १६३४ (१६४२ ?) शार्वरीनाम संवत्सरे जेस्ट वदी त्र्योदसी बुधवार

---

यादी कागद प्रो सुपे व बारामती कागद पारसी

१ अनामत + + अमीरल उमराव
१ महजर मु॥ का पुणे
+ + + + +
४ फिरीदी परवाना
२ मोहरनसी परवाने
२ नकला
——
४
४ परवाने
१ अमीरल उमराव
१ वजीरखान मोहरेचे
१ कादरखान
——
३
१ महजर नकल हिंदवी व पारसी
१ चिठी हिंदवी व पारसी
१ नकल परवाना

१४ हकीकत पारसी फर्दे
२ हकीकत बद
१ फर्मान निजामशाही
१ किा पारसी बद पाटीसी देसपांडे
१ नकल सनद निजामशाही
१ इतमा +
४ उमराव याची
१ वजीरखानचा कागद मोहराचे अर्धा
——
३७

———

श्रीकात

(ले.१५५) श. १६४२ जेष्ट वा १४] [ इ. स. १७२० जून २३

तीर्थस्वरूप राजमान्य राजश्री भगवतपत बाबा स्वामीचे सेवेसी बालके श्रीनिवास पताजी सा। नमस्कार विनति उपरी रा। जगनाथपती सुपाचे कागद तीर्थस्वरुप राजश्री माहादजीपत आबा यापासी पाठविले होते त्यास आबास देवाज्ञा जाली मग आम्ही तुम्हास कागद मागितले त्यास तुमचे पुत्र निबाजीस आडविले त्या उपरी तुम्ही सासवडीहून आले मग राजश्री सखोपत न्यायाधीश याजपासी तुम्ही आम्ही मिलोन गेलो मग आम्हाबराबरी गणोबा देऊन गडावरी [ पुरदरवर] पाठविले आम्ही जाऊन राजेश्री आबाचे रुमाल सोडून पाहिले कागद घेऊन खालते आलो राजश्री न्यायाधीश याचे साक्षीने कागद घेतले बी ता। पारसी कागद ३७ सदतीस व हिंदवी ५० पनास कागद ये।। सुमार कागद ८७ सत्याऐसी पावले पुढे राजश्री जगनाथपताचे पुत्र गोपाल जगनाथ व खडो जगनाथ हे तुम्हासी कागदाचा कथला करितील तरी त्यास आपण वारू सेके [1]१६४३ शारवरी सवछर जेस्ट वदी चयोदसी बुधवार हे लिहिले सही हे विनति छ २७ माहे साबान + + + सन बी कलम ॐ

सदरहू यादी तुमचे हातची आहे त्याप्रमाणे पावले हे विनति

गोही पत्र पा। साक्ष गोपाल भिवाजी

कासी विस्वनाथ पुरधरे देशपाडीये पा। सासवड

सासवडकर पत्रप्रमाणे साक्ष बावाजी क + माजी देसपाडये

पा। वाई

---

(ले.१५६) श्री

असल बा। नकल

करणापत्र सेवेसी जयानी गोविंद आपदेऊ आत्रे सतान धोंडो रामाचे जोसी कुलकर्णी मौजे गराडे व आणिक गाव सात यो। गाव आठ सेवेसी लिहीले ऐसीजे मूळ पुरुष रामाजी रणमलराऊ याचे पुत्र आठ याची नावे

| | | | |
|---|---|---|---|
| गोविंदराम १ | म्हकोराम २ | धोंडोराम ३ | आपाजीराम ४ |
| तिमाजीराम ५ | सोनोराम ६ | पेराजीराम ७ | माहादाजीराम ८ |

ऐसे पुत्र आठजण याचा करिणा आपल्या वडिलानी सागितला जे तिमाजीराम याचे नकल जाले त्याची बायको मेली सतान नाही तेव्हा गोविंदराम याचे

---

१ शके १६४२ त शारवरी सवत्सर असून ज्येष्ठ वदी १४ ला गुरुवार यतो. बुधवारी २७ साबान आहे.

पुत्र मल्हार गोविंद याचे घरी ब्राह्मण बाई विधवा बाईको कामकाज करून होती तिचा पुत्र धोंडोबा परगोत्री लाहाण होता तेव्हां ते बायको मल्हार गोविंद याचे आर्जव फार केले की म्या तुमची शेवा चाकरी फार केली माझ्या पुत्राची मुंज करून त्यास काही थोडासा बसावयासि जागा द्यावा ऐसे अर्जव केले तेव्हा पंत मार याणी ध्यानास आणिले की तिमाजीराम आपले चुलते यासी पुत्र करून द्यावा म्हणून म्हकोराम व आग्राजोराम व सोनोराम यासी बोलाविले पेमाजीराम व माहादाजीराम हे दोघे वतनावर नवते जे प्रांतीहून आले तिकडे गेले मग हे चौघे भाऊ जमा करून आपण पाचवे म्हणो लागले जे आमचे घरी ब्राह्मण बाई आहे इच्या पुत्राची मुंजी करावी आपल्या गोत्री लाऊन तिमाजीराम यांसि पुत्र करावा मग चौघे भाऊ बोलले जे आम्ही त्याचे सातजण भाऊ आसता पर गोत्री परकी काही आम्ही करीत नाही त्याचे सातजण पुत्र आम्ही साता भावातून घ्यावा तरी तिमाजीपंत व त्याची बायेकोहि मेली आतां त्यास देता नये मग मल्हार गोविंद उगेच थबकून राहिले की हे खरेच निशा जाली मग पुढे मल्हार गोविंद याचे खासे पुत्र तिघे त्याची नावे नारो मल्हार दुसरा गणेश मल्हार तिसरा बालो मल्हार याचा पुत्र राघो बलाल कर्ते माणूस सुभे मामले करू लागले सताधारी जाले तेव्हा त्याच्या वडिलानी सांगितले हे ध्यानात आणिले जे आमचे आजे म्हणत होते हे भावांनी ऐकिले नाहीं म्हणून पुढे चौघा भावाच्या संतानास बहुत जाचो लागले परंतु मागील मळी (?) देईनात आपल्या मनातच ही गोष्ट धरून ठेविली पुणे देसीचा सुभा करू लागले तेव्हा भावास गावगतीच्या हिशेबामुळे नानाप्रकारे मागो लागले मसाला करोन दररोज करून बहूत पीडा केली तेव्हां चौघा भावानी विचार केला जे हा भाऊ काही आम्हांस गावावर नांदू देत नाही हारएक तुफान करून वतन विकवी लावील मग चौघे भाऊ देशांतरी गेले मग आपण ऐकटेच वतन खाऊ लागले वतन पौ ब्राह्मण बाईचा पुत्र धोंडोबा याच्या वंशास बोपगाव धोंडोराम याच्या वाटणीतील दिल्हे त्यास सांगितले जे तू आमचा ठेवणाईत हे करिणापत्र खरे आसे हे चौधे भाऊ गेले याचा वंश हे धास्तीने आद्यापि आला नाही हे खरे

---

(ले.१५७) श्री (नकल)

दखलगिरी कुलकर्णे व जोतिस देहाए

| | | | |
|---|---|---|---|
| मौजे भिवडी तो करपठार | १ | मौजे कोढीत बुा को सासवड | १ |

बनाम सोनावा आत्र गोत्री त्याचे पोटी पुत्र संतान नाही येक कन्या होती ते कसबे सासवड राखे त्याचे घरी दिधली होती ऐसीयास बाराणसीस जाते समई जावई यापासून टका पैका कर्ज घेऊन यात्रा करून गावास आला त्या उपरी कितेक

दिवस कुलकर्णे व जोतीस सदरहू गावीची चालवीत असता आतःकालचा समये माडला ते काळी राखीया जावाई त्यास व आपले लेकीस बोलाऊन त्याचे साभाली कोढिताचे कुलकर्ण व जोतीप राखियास दिधले त्यानी येक दोन वरीसे चालवीत असता का सासवडचे देस कुलकर्णी त्यानी राखियास म्हणो लागले की मोकदम बुडाला त्याची मोकदमी देशमुखानी खावी कुलकर्णी जोसी बुडाला त्याचे वतन देशपांडे यानी खावे ऐसे दबऊन राखियापासोस सासवडकर देसकुलकर्णी यानी मौजे मार कुलकर्णे व जोतीस जोरावारीनें घेऊन खाऊ लागले दोनी च्यार वर्षे खादले असता मुधाजी आनेयानी पुणीयास येऊन कैा सिवाजी राजे भोसले त्याचे आमली रघुनाथ बलाल शिवाजी राजीयाची सबनिसी करीत होते त्यापासून मुधाजी आनीयाने होनु १३० येक्सेतीस घेऊन जोतीप व कुलकर्णाचा महजर रघुनाथ बलालास करून दिधला त्यानींहि दोनी च्यार वरसे कुलकर्ण व जोतीप खादले हे वर्तमान राघो बलाल आने या जाहीर जाले त्यावरून राघो बलाल यानी रघुनाथ बलाल यासी गाठी घालावी तो रघुनाथ बलाल मरोन गेले त्याच्या निंबक रघुनाथ यासी गाठ घातली कीं सोनावा आन गोत्री आपला बाप भाऊ त्याचे कुलकर्णे तुम्हीं मुधाजी पासून येक्सेतिसा होनावरी घेतले आहे ते आपले पैसे घेणे आणि जोतीप कुलकर्णास तुम्हास निसबती नाही त्यास निंबक रघुनाथ ऐकेना म्हणून राजश्री सिवाजी राजीयासी वर्तमान सदरहू सागोन रोख होनू १३० येक्सेतीस राघो बलाल आणून रा सिवाजी राजीया हुजूर निंबक रघुनाथाचे पदरी घाल्टिता निंबक रघुनाथ पैके घेईना म्हणून रा सिवाजीराजीयानी येक्सेतीस होन राघो बलाल पासोन निंबक रघुनाथ याचे गुजारतीने घेऊन मौजे कोढितच्या कुलकर्ण व जोतीप याचे कागद राघो बलालास दिधले त्या दिवसा पासोन पचवीस वर्षे रागो बलाल कुलकर्ण जोतीप खात आले असता तुलापुरास आलमि(पि)रा आलमगीर येऊन मुकाम जाला ते वख्ती तमाम परगणातीचे मोकादम व कुलकर्णी मुलाजीमतीस येऊन सिरपाव पाऊन सरफराज जाले तो वख्ती मुधाजीचा पदरजाती मल्हार आनत त्याने माऊनी नाईक जगथाप देशमुख त्यास रुपये ५० पनास व बाबाजा गोविंद देशपाडे यास रुपये १०० येकसे येकूण दीडसे रुपये देऊन शिरपाव कुलकर्णाचा घेतला त्या दिवसापासून राघो बलालाचा गुमास्ते व भाऊबद त्यासी खटखट करू लागले राघो बलालचा पुत्र दामाजी रघुनाथ सातरिकाब(?) लस्कर बादशाही व तैनात सुभा नबाब गयाजदीखान आसे मागे पेश गैबनीने मुठमर्दी व जबरदस्ती व टकीया पैकीयाचे साजीसीने मल्हार आनत हर्ली खात आहे सदरहू वर्तमान सकराजी नारायेण व रामचद्र पतापासी सागितलें परतु दादी होऊन आली नाही.

सदरहू नकल बिठलराव बलाल देशपाडे प्रां पुणे याने घरीहून आणली शके १७३२

---

(ले.१५८) श. १५७८ माघ शु॥ ] १ [ इ. स. १६५७ जाने. १८

श्री सके १५७८ दुरमुख नाम सवछेरे माहो सुध त्रियोदसी वार सोमवार तथे दिसी बालाजी हरि मेडजोगी कुलकर्णी मौजे वडगाऊ नेपरज पा पुणे यासि तथे दिनी मुधाजी बापूजी अत्रे जोसी व कुलकर्णी कोढीत खूर्द व भिवडी व सोमलवाडी पा मजकूर लेहोनू दिधले ऐसाजे आपले जोतीस व कुलकर्ण मौजे कोढीत बुाँ का सासवड हे आपली मिराशी हाये सोनाजीपत आपले गोत्रज खात होता तो गगथडीस आपले लेकीस भेटावया गेले तथेच राहिले तीही आपणासि सागोनू पाठविले की आपले म्हातारपण आहे गोदांतिरीच राहोनु तेरी तुम्ही मौजे मजकुरीचे जोतीस व कुलकर्ण खाणे तुमची मिरासी आहे तुमची तुम्ही खाणे यावरी आम्ही आपला पुतन्या विठोबा चालवया पाठविला सोनाजीपताचा भाचा रू + जी होता तोहि गगथडीस गेला विठोबा आमचा पुतन्या चालवीत होता हे गावीच्या मोकदमासहि ठाऊका आहे ऐसे असोन रामाजी देसकुलकर्णी का सासवड त्याणे आपले माणूस ठेऊनू कुलकर्ण मौजे मजकुरीचे चालऊ लागला आम्ही रामाजीसी बोलावे तो आम्ही आपले पोटाच्या व्यासगी गुतलो याकरिता राहिले तेरी तुम्ही मौजे मजकुरीचे जोतीस व कुलकर्ण तुम्ही सोडवणे आणि तथे जे पडली ते वेचणें आणि कुलकर्ण तुम्ही मिरास करूनू खाणे जोतीस आम्हास देणे सदरहु प्रमाणे जोतीस व कुलकर्ण सोडवणे कुलकर्ण तुम्ही खाणे व जोतीस आम्ही खाऊनु आम्हास कुलकर्णासी समधू नाही यासि आनसारिखे करू तेरी आम्हास आपलीया पूर्वजाची आण आहे हे लिहीले सही हिलाहरकती करील त्यासि आपण निवारूनु तुम्हास व त्यासि समधू नाही तुम्ही गावकुलकर्ण लेकराचे लेकरी खाणे जोतीस आम्ही खाऊनू हे लिहीले सही बीकलम ॐ

गोही

बापाजी नरसिंगराऊ सितले
देशमूख पो पुणे
( फारशी शिक्का )

विठोजी नाईक सितोले देसमूख
पा पुणे
( फारशी शिक्का )

विठल मोरदेऊ देशकुलकर्णी
पा पुणा

धाऊजी पाटील बीन बाज पाटील
कानगो मोकदम मौजे चाबली पा पुणे
( नांगराचें चित्र )

सूर्याजी बडधे व बाजी जरडे मोकदम
मौजे मजकूर
( नांगराचें चित्र )

मलोजी राजीवडा चौगले मौजे मजकूर
( नांगराचें चित्र )

काऊजी बडधे मौजे मजकूर
( नांगराचें चित्र )

---

१ वर माथ्यावर 'श्री'कार आहे किंवा नाहीं हें नक्की सांगतां येत नाहीं बहुधा नसावा.

श्रीभवानी शंकर

(लें.१५९) श. १६३७ मार्ग. व. ५ ] [ इ. स. १७१५ दिसें. २

ॐ चारी नंद महाराज शाहू

श्री शके १६३७ मन्मथ नाम संवछरे मार्गसीर्ष बहुल पंचमी भृगु वासरे ते दिवसी राजश्री मल्हार अनंत अने कुलकर्णी व जोतिषी मौजे कोढीत ‘प्रा कर्यात सासवड यासि त्र्यंबक रघुनाथ मेडजोगी नमस्कार सुा सीत अशर मया अलफ कारणे फारखती लेहोन दिल्ही ऐसीजे तुमचे चुल्त चुलते मुधाजी बापूजी अने याणी शके १५७८ दुरमुखनाम संवछरी आमचे आजे राजश्री बालाजी हरी यासी कागद लेहोन दिल्हा जे मौजे मजकूरचे कुल्कर्ण जोतीष आपली मिरासी आहे ते सोनाजी बाबाजी आपला चुल्त भाऊ खात होता तो गंगथडीस जाऊन तेथे गंगावास करावयासी राहिला त्याउपरी आपण आपला पुतण्या विठल कृष्ण कुलकर्ण व जोतीष चालवावयास मौजे मजकुरी ठेविला असता रामाजी निंमल देशकुलकर्णी कर्यात मजकूर याणी आपले निसबतीने बळेच ब्राह्मण ठेऊन कुलकर्ण चालऊ लागले आपण जाऊन करावे तर पोट व्यासंगास गुतलो यामुळे राहिले आहे तरी तुम्ही त्याजपासून वतन सोडवणे त्यास खर्च पडेल तो देणे आणि कुलकर्ण तुम्ही खाणे जोतीष आपण करून खाऊ ऐसे पत्र करून दिले होते त्या वरून आमचे आजे तीर्थरूप राजश्री बालाजी हरी याणी राजश्री रामाजी निंमल देशकुलकर्णी कर्यात मजकूर यासी वीस होन देऊन त्याजपासून कागद लेहोन घेतला तो त्याणी शके १५८० विल्मी संवछरी लेहोन दिल्हा की मौजे मजकूरचे जोतीष कुल्कर्ण सोनाजी बाबाजी अना याचे आहे तो निपुत्रिक होता त्याचे बुडाले त्याचा भाचा करीत होता तो गेला त्यावरी आपण देशकुलकर्णी म्हणोन जोतीष कुल्कर्ण चालऊ लागलो ते आत्मसंतोषे तुम्हास विक्रत दिल्हे किमती होन २० वीस हे पैके घेतले आणि हे पत्र करून दिल्हे असे तुम्ही जोतीस कुल्कर्ण लेकु-*राचे लेकरी खाणे म्हणोन पत्र करून दिल्हे त्यावरी आपल्या वडिलानी मुतालीक* पाठविला होता तो राघो बलाल अने याणी आपले कुलकर्ण म्हणोन कटकट करून आमचा मुतालीक उठऊन वाटे लाविला कुल्कर्ण जोतीष तुमचे वडील खात आले सांप्रत राजश्री राजे या प्रांतास आलीयाउपरी आम्ही व राजश्री मोरो नरहरी आमचे चुलतभाऊ याणी राजद्वारी प्रसंग करून तुम्हास व देशकुलकर्णी यास तलब करून आणून कथळा केला तेव्हा तुम्ही येऊन आपणापासी बोली केली की आपले वतन देशकुल्कर्णी यानी विकिले आहे याची पचाईत गोतमुखे करून निर्वाह करणे त्यावरून आम्ही आपले मनी विचार करून तुमचे वतन देशकुल्कर्णी यानी आम्हास विकत दिल्हे आहे ते तुमचे स्वाधीन करावे आपले

पैके वीस होन दिल्हे आहेत त्याचे दाम दुसार या हिशेबे चालीस होनाचे रुपये १२० येकसे वीस जाले ते तुम्ही दिल्हे ते आपणास पावले आणि तुमचे कुलकर्ण जोतीष रोहिडाचे मुकामी तुमचे स्वाधीन केले तुमचा वडील मुधो बापूजी याचा कागद येक व रामाजी त्रिमक देशकुलकर्णी कर्यात मजकूर याचा कागद होता ते दोन्ही कागद आसल तुमचे स्वाधीन केले असेती या उपरी मौजे मजकूरचे जोतीष कुलकर्णाचे वतन तुम्ही आपले सुखरूप अनभवणे आपणासी तुम्हासी अर्थाअर्थी समंध नाही याउपरी बालाजी हरी याचे वंसीचा जो कोण्ही होऊन तुम्हासी कथला करील तो गोताचा खोटा व दिवाणचा गुन्हेगार आसल कागद तुमचे स्वाधीन केले याच्या नकला व फिरकोली कागद जेथे जे असतील ते कूल नवे जुने रद असेती मुधाजी बापूजीचा लेक शामजी मुदगल त्यासी आम्हासी समध नाही तुम्ही ते समजोन घेणे [1]सदरहू प्रमाणे तुम्हास हे फारखती लहौनू दिधली असे यास जो कोन्ही रा बालाजी हरी याचे वौसीचा आसल त्यास श्रीवारानसीस पंच माहा पातकाची शफत असे कथला करावयास समंध नाही हे लिहीले सही छ १७ जिल्हेज पत्री वली बाहातरी ७२ बिा २ वो[2]

गोही[3]

केशव निलकंठ

यादो नारायेण निंबकर कुलकर्णी को लोहगाव ता हवेली प्रा पुणे हाली सवनीस किले विचित्रगड ऊर्फ रोहिडा

कृष्णाजी बीन सिदोजी जाधव पाटील मोकदम मौजे किरकटवाडी ता कर यात मावल हाली हावलदार किल विचित्रगड बिा ओ गोपाळ सिव देऊ बोकील[4]

बाजी शामराज अत्रे

रामाजी विठल देसपाडिये ता वाडे सा जुनर हली मुकाम किले विचित्रगड रोडिडा राघो बलाल तुटकणे कुलकर्णी मौजे सात ता घोडे सा जुनर हाली मुकाम किले विचित्रगड रोहिडा

तान्हाजी सावजी प्रभु देशेमूख ता नाडसूर नजीक सुद्दागड हाली कारखानीस किले विचित्रगड

---

१ येथून पुढील मजकूर त्रिंबक रघुनाथ याचे हातचा आहे. अक्षर अत्यंत कापरें कापरें लिहिलें आहे यावरून या वेळीं त्रिंबक रघुनाथ अतिशय वृद्ध म्हणजे जवळ जवळ ८०-८५ वर्षांच्या घरांत गेला असावासा वाटतो.

२ बिा वो (ॐ) म्हणजे दस्तुर खुद्द.

३ गोही ज्याच्या त्याच्या हातची आहे.

४ चारही बंद आहेत परंतु चौथ्या बंदाचा शेवट पाहतां त्याला चार सहा बोटांचें आणखी एखादें चिटोरें डकवलेलें असावेंसें वाटतें तें मिळालें नाहीं गाहाळ झालेल्या चिटोऱ्यांत आणखी कांहीं साक्षी असाव्यात.

पु.द. २०

(ले.१६०) श. १६३८ आषा. शु.११] श्री [इ. १७१६ जून १९

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४३ दुर्मुखनाम सवत्छेरे अशाढ शुध येकादसी भोमवासरे क्षत्रीये कुलावतस श्री राजाशाहू छत्रपति स्वामि याणि देशमूख व

| | | |
|---|---|---|
| ~ श्री ० | श्री आई | देशपाडे कर्यात सासवड |
| राजा शाहु छ | आदि परुष श्री | यासि आज्ञा केली ऐसीजे |
| त्रपतिहर्षनीधा | राजा शाहू छत्रपति | मौजे कोढीत बु॥ प॥ |
| नबाळाजी वि | स्वामि कृपानिधित | मजकूर येथीलें कुलकर्ण |
| श्वनाथप्रधा | स्य परशराम त्र्यबक | व जोतीस बालाजी हरी |
| न | प्रतिनिधि | मेडजोगी याणी रामाजी |

त्रिमल देशपाडे का मार यास वीस होन देऊन घेतले होते परतु बालाजी हरी व त्रिबक रघुनाथ व मोरो नरहर मेडजोगी याचा भोगवटा नव्हता मल्हार अनत अत्रे कुल्कर्णी व जोसी पुरातनप्रमाणे चालवीत होते ऐशास स्वामि स्वराज्यात अल्यावरी मोरो नरहर मेडजोगी व त्रिंबक रघनाथ मेडजोगी याणी कथला केला आणि कुलकर्ण अमानत केले होते कथला निवडे तोंवरी कुलकर्ण मल्हार अनत अत्रे याचे दुमाले केले होते साप्रत रा त्रिबक रघुनाथ मेडजोगी याणी आपले मुदल वीस होन घेऊन मल्हार अनत कुल्कर्णी व जोतिसी मौजे मजकूर याची वृत्ती याचे स्वाधीन करून आपले बेदाव्याचें पत्र लेहोन दिल्हें आहे त्याप्रमाणे स्वामिनी मल्हार अनत अत्रे पुरातन वतनदार जाणोन सदरहु वृती दुमाले केली आहे तरी तुम्ही मशार निलेचे हाते सालाबाद चालत आल आहे त्याप्रमाणे वतनाची सेवा घेणे नवजिकीर न करणे या पत्राची प्रती लेहोन घेऊन मुख्य पत्र भोगवटीयास मल्हार अनत अत्रे यापासी देणें जाणिजे लेखनालकार मर्यां

बारसुद सुरसुद बार देय रा
जते

---

(ले.१६१) श्री

[ वरील चार बोटें कागद फाटून गेल्यानें सदर पत्र कोणी कोणास लिहिलें आहे तें कळत नाहीं. मजकूर राघो बलाल अन्याच्या पुण्यातील वाड्यासंबधीं आहे. हा वाडा शनवारवाड्याच्या जवळ होता. असें पुढील लेखावरून दिसतें.]
आला तो वाडियाचे वर्तमान कलले तर तो वाडा म्हणिजे तुम्हा जिनकें आहा तितकीयाचे तरत आहे त्या वाडियावरी मग कुलकर्णे वडिलानी मेलविले ते तुम्ही समस्त मिलोन वतन खाता आणि मुलीच्या मुदलासच फोट लागली आम्ही काही वतनाचा भोगवटा घेत नाही आगर गावीहि नवतो गराडीमात तीर्थरूप रामाजी येसवतराऊ व चीरजीव राघो मल्हारी सा पा(वं)सावरी दोने

त्याणी वाडा बाधते वेलेस बोललेस नाहीत ऐसे वंशांत निर्माण जाले वाडा तो तयार जाला म्हणोन ऐकतो तुम्हास म्हणावे तरी तुम्हास पुणे देशीच्या वतनाची माथाच नाही वंशी जे पुरुष आहेत ते जंतवत निर्माण जाले कीं यारदी (?) सारखे वतन व पुण्याचा वाडा वडिलानी मेलविली वृत्ती सातां पिढीयाची गमाविली हे ऐकोन खेद जाला कीं वंशात कोण्हीच नाही याउपर वाडियात बाबुराऊ घरात जाणार यास द्वाही श्रीमंत राजश्री पंतप्रधान याच्या सात द्वाह्या देवणे आम्ही माहाराज राजश्री स्वामीस विनंती करून वाडा सुटे ते गोष्टी करितो कदाचित वाडा बाधवयासी पैका लागला आसल तरी तोही द्यावा परंतु तख्तीचा वाडा सोडवावा.

---

(ले. १६२) श्री

[ पहिले चंद गहाळ. फक्त सहावा चंद्र मिळाला. ]

६

ताई आत्री गावात खंडो विसाजी देशपांडीये याच्या वाडियात होती तिणे यैकोन हाती काठी घेऊन राजश्री राऊ बसले होते त्याजपासी येत होती ते दुरून रायानी देखताच राजश्री बापूजी श्रीपती जवल होते त्यासी पुसो लागले की ते बाईको नीट आम्हाकडे म्हातारी कोण येते त्यास नानानी रायास उतर दिल्हे की हे राघो बलाल अत्रे याची स्त्री ताई अत्री यैसे सांगताच ते जवल आली आणि राजश्री रायासी बोलली + + + जैसे आता तुम्ही नांदता तै (से)........खावंद या राज्या........त्याचे कोणी येथे......या वरी घर......यैसे यैकताच...... आणि ताईस सांगितले + + मातुश्री आम्ही तुमच्या जागियावरी घर बांधत नाही त्याज उपरी येके वरसी गावातील पाणी आटले होते ते समयी दार तोंडियात पाणी यासाठी उपसावासा केला आणि राजश्री रायानी आम्ही सुपियात होतो ते बोलाऊन सागितले की तुमच्या आडात गाल बहुतां दिवसांचा आहे तो काढावा लागतो तुम्ही आडाजवल बसणे नाही तर मग तुम्ही म्हणाल की आडांत आमच्या वडिलांचे द्रव्य होते याजकरिता जवल बसणे यैसे बोलोन उपसावयासी काम लाविले आडात सेदणीयाच्या फुटकिया चरव्या दोनी सापडल्या त्या आमच्या आम्हास दिल्या तिसरा दाखला रायानी गावाबाहेर आपला वाडा बांधिला ते समई आंम्हास आज्ञा केली की तुम्ही आपले घर जागियावरी बांधणे आणि वाडा तयार करणे आम्ही मान्य केले आम्ही बोलिलो की घर बांधोन येखादियासी नांदाया कारणे द्यावे हे यैकोन राघो कृष्ण व कासी कृष्ण हे उभयेता आम्हापासी येऊन जागा आम्हास घर बांधावयासी द्याल तरी आम्ही घर व वाडियासी आवार बांधऊन आम्ही उतर दिल्हे की तुम्ही परकी ग्रहस्थ आहा

गावींचे......आथवा हाकिमीचे नाते......घर बांधणे यैसे सांगी......वडिलाच्या हा..... साच्या बोले घर..... भितीस माती खाणते वेलेस वरतेच पोकले मातीत चिरे वडिलाचे हातीचे होते ते *कासी कृष्ण यासी* घर बांधिते वेलेस सापडले ते चिरे दोहीकडे वोसरीस येक येक चिरा लाविला होता घर बांधते वेलेस दाहा वरसाचे पत्र आपल्या हातीचे लेहोन देणे त्याजवरून पत्र त्याणी आम्हास दिल्हा त्यांत तो बारा वरसे नादला आणि आमचे घर आमचे स्वाधीन केले जुने मोडून नवे बाधावे तो आम्ही सातारियासी राजश्री पासी गुंतलो चौथा दाखला सातारियाहून राजश्री छत्रपति यासी व राजश्री (अपूर्ण)

---

(ले. १६३) ] + [

राजश्री पंत.......... ........................................

सेवक सोंन...... ................................................ [ वि ]

शेष आपला वडील काल ठाकूर मौजे पिपल्याहून मौजे बरड प्रांत फलटण येथे गाई व बैल घोडी व सिंगरे यैशी घेऊन चारणीस जात होते ते समई मौजे वाल्हे येथे वस्ती नव्हती मूल पांढर सुकवाले होते श्री देव सिधाजी व वाल्मीक याचे वारुल होते व टांगवड होता तेथे राहिले तों तेथे पाणी नव्हते अरण्य होते मग धावशींचे पाणी आणून रात्र गुजरात केली आणि सकाल उठोन जाऊ लागले तो श्री देवाचा भक्त कुमार होता त्याणे मूल पाढर सुकवाले यास जाऊन पाटील व कुलकर्णी व जोसी व माली व बलुते यैसे आणून भेटविले आणि यांस आग्रह करून राहविले त्यास याणी उतर दिल्हे की येथे पाणी नाही आम्ही येथे येऊ ना व येथे राहू ना मग सुकवाले मूल गाव मोडून येथे येऊन वस्ती केली आणि यास राहविले राहाविल्या उपरी मधे पार केला ठाकूर टिके सेत व मला व चौगुलकी व गावची लावणी अर्धी करावी आणि पाटीलकीचे हक अर्धे खावे यैसे वतन करून दिल्हे ते समई येक सोनारीण होती तीस याणी बहीण मानिली आण तिजकारणे आड खाणोन पाणी काढून आड बाधोन चाक कणा लाऊन चरवी सावली लाऊन पाण्याने राजण भरून दिल्हा तो आड व सोनार मौजे वाल्हे यामधे हाजीर आहे व आमचा खासगत आड हाजीर आहे यानतर श्री [1]माहाराज साहेब पिगोरीच्या दऱ्यामधे साहा महिने होते माहाराजास पुणे देश व सुपे देश व कराड देश कल्याण भिवडी व मावले हे मुलुख इदलशाहीपासून जाहाले रणदुलाखान येऊन माहाराजांस हुजूर घेउन जातेसमई आपले वडील चुलते गोपाजीयाचा यांस भरने जमातीनसी चिमणगावचे ठाणे बांधोन यांत ठेविले फल्टणी सैतानराऊ ठेविले त्यासमई आमचे पथिले थाप्यास गेले घराची कवाडे लाऊन दोही बोरवारर

---

[1] शहाजी राजे.

जागा देऊन कोष्टे यास ठेविले यानंतर श्रीमाहाराजसाहेब सुखरूप असता आमची आजा आजी व गाईचे आखर व गोठणी वाल्हे यात होते तेथे सेत व मला करीत होते व चौगुलकीचे मुतालीक बालोजी दात्या उपर मल्हारजी मरोन करीत होता पुढे श्रीमाहाराजसाहेब यास पातशाही अटक जाहाली त्या समई खैरतखान कन्हाड मुलकावर आला तेथून चिमणगावास आला त्या समई गोपाजीबावा याणी पिवली वस्त्रे करून येक येक बाहीर निघोन सग्राम केला आणि साहेब कामास आले त्यामधे मालजीबावा यांस त्याणी जिवंत धरून घोडा व माणसे बराबरी देउन वाल्हे यास रवाना केला तो येथे येऊन कान्होजी बाजी व जाजाई आवा यास उभयतास रडतच येउन भेटला तेव्हा गोपाजीबावा व समस्त युधीं लोक निवर्तले येसे वर्तमान येकोन उभयता म्हाताऱ्यानी उरावर धोंडे मारून घेउन प्राणत्याग केला त्यासमई गुरे व बैल वासरे व घोडी व सिगरे खिलारे निबालकराच्या राउतानी लुटून न्हेली त्याउपरी मालोजीबावा याणी आपले धाकटे भाव धारोजीबावा व संभाजीबावा यांस घेउन तोरण्यास गेले तेथे बलवंतराऊ कोकाटे होते त्याणी जतन केली मग ताजे होऊन हाबसीपासून मुरमदेव घेतला आणि श्रीमाहाराजाचे चाकर म्हणविले तेव्हा श्रीमहाराराज व राजश्री दादाजीपंत याणी बहुत गौर केला याणीहि बहुतच चाकरी केली त्याउपरी चाकरी टाकून आमचे पिते राजश्री सभाजीबावा ठाकूरटिके सेत व मला करीत होते व या देहाचा जन्म येथे जाहाला चौगुलकी आतां करितो त्याचा बाप जावजी मरोल होता त्याणे आम्हास हक दिल्हे आहे स्वामीनी कृपाळु होऊन आमच्या वाड्यामधे कोस्टी आहे तेवढा बाहीर निघाल्याने आमचा मामला सुरलीत होईल हे[२] विनंती . (निशाणी कट्यार)

---

(ले. १६४) श. १६१५ का. शु॥] श्री [इ.स. ३१।१०।१६९३

तालीक मोरया

स्वस्तीश्री राज्याभिषेक शके २० श्रीमुखनाम सवत्सरे कार्तीक शु॥ त्रयोदशी क्षेत्री कुलवतस्थ श्री रामराजा छत्रपती याणी राजश्री देशाधिकारी लेखक वर्तमान व भावी प्रात पुणे यासी आज्ञा केली आहे. ऐसीजे राजश्री शामजी नाईक पुंडे याणी स्वामीस येऊनं विनंती केली की श्री स्थल मौजे मोरगाऊ ता॥ करेपठार प्रांत मजकूर हे देवस्थान बहूत जाग्रस्त स्थल आहे. तरी श्रीस मौजे मजकूर गांव इनाम देविलीयाने देवाचे पुजा नैव्यद्य उछाव भाद्रपद शु॥ १ पासून पंचमीपर्यंत आहे तो ऐसे यथासाग चालेल म्हणोन विंधित केले त्याजवरून मनास आणिता श्री अष्ट विनायेक मधे आपण स्थल थोर सिद्धिस्थान ऐसे जाणोन स्वामीस व स्वामीच्या राज्यास कल्याणार्थ श्रीपरमेश्वर प्रीत्यर्थ नूतन इनाम मौजे

२ या पुढील मजकूर बालबोधींत आहे.

मोरगाऊ ताा करेपठार प्रात मजकूर देह १ येक कुलनाव कुलकानू हाली पटी व पेस्तर पटी जलतरु पाशाण निधी क्षेत्र झाड झाडोरा पडले पान खेरीज इनाम व हक्कदार गाव चतुसीमा भूमि पूर्व मर्यादे प्रा इनाम दिल्हा ऐसे तरी गाव स्थानिकानी स्वाधीन करून पूजा नैव्यद्य उछाव उतर उतर चालवणे यास जो आपल्या राज्यातील व परकी ब्राह्मण व मराठा होत असता या स्थलास उपसर्ग करील अगर काही इच्छा धरील त्यास वाराणशीस गौ हत्याचे पातक असे प्रतिवर्षे नवीन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची तालीक घेऊन मुखे पत्र स्थानिकाजवळ देणे[1]

| | |
|---|---|
| तारीख ११ रोवल सुा | पैा छ १ सफरसन |
| आर्बा तिसैन अलफ | खमस मुकाम जेजुरी |

---

श्रीगजानन प्रसन्न

(ले.१६५) श. १६२१ चैत्र शु॥ १] [इ. स. १६९९ मार्च २२

वरसासन पत्र श्री शके १६२१ प्रमाथीनाम सवत्सरे चैत्र सुद १ बुधवार तदिनी श्री देव चिंचवड यानी जोशी व छबिनीयाचे लोक क्षेत्र मोरेस्वर यासी मोइन करून दिल्ही मौजे मोरगाव श्रीकडे गाव इनाम आहे तोपर्यंत खडणीपैकी देत जावे ३० तीस बी ताा

| | |
|---|---|
| जोसी वेतधारी दादाजी | वाजत्री गुरव रुा ५ |
| येस देऊ.. . रुा १३ | दिवटे...रुा ३ |
| भोई २ ब्राम्हण रुा ५ | छेत्र व निशाणदार दोघे रु ४ |

येणेप्रमाणे रुो तीस निरयेतर करून दिल्हे आसे प्रतीवरसी देत जाणे जाणिजे

---

(ले.१६६) श. १६२१माघ वाा११] श्री [इ स. १७०० फे.४

छत्रपती

श्रीया विराजित राजमान्ये राजेश्री अचाजी त्रिंबक व कासी विस्वनाथ देसपाडे ताा सासवड गोसावी यासि

सेवक नरहरी निमल सभासद नामजाद माहाल सरदेसमुखी दिाा रुा हिंदुराऊ घोरपडे नमस्कार सुा मया आलफ राजेश्री स्वामीस हारकी पाचसे रुपये देऊन वतनाची पत्रे करून घेतली त्यास आमची सरदेशमुखी आमची वतनवाप

---

१ नक्कल अक्षरावरून पाहाता पेशवाईतील असावी.

दर सदे दाहोतराप्रमाणे बेरीज रुपये ५० पनास जाले ते आम्हास पावले पोता जमा जाले जाणिजे छ २४ साबान मोर्तब सुद श्री
मोरत
बसुद

---

(ले.१६७) श्री

राजेश्री कासीचा पुरधरे गोसावी यासि

सेवक नरहरी त्रिमल सभासद नामजाद सरदेसमुखी दिा (रा) (हि) दूराऊ घोरपडे नमस्कार सुा मया अलफ तुम्ही गोतपत्रानिमित्य रुपये ४०० च्यारीसे दिवाणात दिले त्याचे हक सरदेसमुखी रुपये ४० चालीस होताती हे पैके देखत रोखा रसद पाठवणे या कामाबदल सूर्याजी चिचवडा व हसनखान व लोक + + + + + रुपये पाच अ (.दा) (करणे) छ २० जिलकाद हे विनती ( )

---

(ले.१६८) श.१६२३ चैत्र व. ३] श्री [इ. १७०१ एप्रील १४

चिकलीजखानजी
(फारसी दोन शिक्के)

इजत आसार देसमूख व ता मोकदम का सासवड सु॥ सन हजार १११२ मालूम दानद की बापूजी व राणोजी हरकारे दि॥ चौकी माौ दिये फर्यात माार येथे चौकीस आहेत हमेशा नवले व थैली चालवीत आहेत तर यासि हाजीर देऊन हाजिरा हाजीर गावगना पोहचावणे काम नाजूक आहे नेक बाद जालिया जाब करणे लागेल खबर शर्त केली आसे रा छ १६ जिलकाद मा सुद

---

(ले.१६९) शके १६२४ भाद्र.व. २ ] श्री [ इ. १७०२ आगष्ट २८

श्रीभ
वानी चरण
रज राघोजी
बाबाजी

ई कौलनामा राजश्री राघो आबाजी सभासद नामजाद का सासवड दि॥ राजश्री पंतसचीव ताा गगाजी खिरसागर कसबे मजकूर सु॥ सलास मया अलफ बादे कौलनामा येैसे जे तुझेबाबे देशमूख व मोकद [ म ] याणी येऊन जाहीर केले जे मला कमलेश्वर बिघे ८२ दोनी बेचिराख पडिला आहे रये मजकूर कीर्दी करावयास उमेदवार आहे जरी साहेब जीवनमाफक कौल देतील तरी कीर्दी करून

बराये आर्जे खातिरेस आणून तुज कौल दिल्हा आसे कुलमखता दिल्हा असे बीता॥

| | | |
|---|---|---|
| रा | पंतसचीव | मोगलाई |
| | रुपये | रुपये |
| | ६८ | २८ |

सहरहू रुपये आठ उगवणी करून सुखरूप कीर्दी करून आसणे जाजती आजार लागणार नाही कोन्होहा बाबे शक न धरणे बेशक होऊन कीर्दी आबादानी करणे रा छ १५ रबिलाखर मोर्तब

बसुद

---

## कारकीर्द छत्रपति शाहूमहाराज



(ले.१७०) श. १६३६ पौ. व २ ] श्री [ इ. स. १७१५ जाने. १०

सो राजेश्री निचाजी बीन हिरोजी बारकडे चौगुले मौजे गुणधं पा सिरवल यांसि राजेश्री कदारजी नाईक येशवतराव निगडे देशमूख व यादो गगाधर देसपाडे पा मजकूर श्री शाके १६३६ जयेनाम सवछरे सु॥ सीत आशरईन मया अलफ कारणे जे मौजे मजकूर धामधुमे मुले खराब पडिले त्यासी स्वराज्य होऊन परगणे मजकुरास कौल जाला यामुले मौजे मारचे मोकदमानी कौल घेऊन बुजची वसाहत केली आणि येऊन वर्तमान मोकदमानी सागितले की काले फडून मौजे मजकुरचा चवगुला पुरातन होता तो बुडाला हाली चवगुलकीच्या कामास कोणी नाही त्यास निचाजी मजकुराचे वडील पूर्वीपासून चौगुलकीची चाकरी करी (त) आले आहेत यासी दिवाणचा कौल देऊन पाडरीचे चाकरीस लाविले पाहिजे म्हणून मोकदम मजकुराने सागितले त्यावरून राजश्री पतसचीव यास वर्तमान विदीत करून त्याचे आभयेपत्र तुज सादर केले व राजश्री पतसचीव याचे आज्ञेवरून तुज पत्र करून दिल्हे तर मौजे मजकूरचे चवगूल्कीचा हक चि ता॥

श्री मळा
रसूत केदा
र देशमूख पा॥
सीरवळ

| | | |
|---|---|---|
| नखत खुर्दा टके | गला बारुले | थल पुणबीक |
| | ।· | जिराईत चावर |
| टके ५ पाच | पाच मण गला | ।।।· |
| | | पाऊण चावरानी लाविली |

वाडा नजीक मोकदम

येणेप्रमाणे सेत व घर व हक चऊगुलकीचा पुरातन आहे ते चौगूलकी मौजे मारची तू व तुझे पुत्रपौत्रादि वौशपरंपरेने आनभऊन हक व सेत घरवाडा बाधोन चौगुलकीची चाकरी पाढरीची व दिवाणची व वतनदाराची करून सुखरूप राहाणे छ १४ मोहरम*

(ले.१७१) श. १६४६ फा.वा १] श्री [इ. स. १७२५ फे. १७

नकल

राजश्री बापुजी श्रीपत उपनाम चित्राव गोत्र आत्री येजुर्वेद कात्यायनसूत्र काणवी शाखा गोसावी यांसी

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य

शेवक बाजिराव बलाल प्रधान नमस्कार सु॥ खम [स] अशरीन मया व अलफ दिल्हे इनामपत्र ऐसीजे तुम्ही राज्यातील पुरातन शेवक आज ता॥ शेवक येकनिष्ठेने करीत आलेत म्हणोन तुम्हावर राजश्री स्वामी कृपाळू होऊन मौजे बालेवाडी ता॥ हवेली पुणे हा गाव कुलबाब कुलकानू स्वराज्य व मोगलाई दुतर्फा देखील हली पटी व पेस्तर पटी खेरीज इनामदार व हकदार इनाम करून देऊन इनामपत्रे दिल्ही आहेत तेणेप्रो करार करून हे इनामपत्र सादर केले असे तुम्ही मौजे मजकूर सदरहूप्रो आपले पुत्र पोत्रादि वंशपरंपरेने इनाम आनभऊन सुखरूप असणे जाणिजे छ १४ जाखर आज्ञापत्र मोर्तब असे

(ले.१७२) श. १६४६ फा.शु॥ ७] श्री [इ. स. १७२५ फे. ८

सिका नकल

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५१ क्रोधीनाम संवत्छरे फाल्गुन शु॥ सप्तमी इंदूवासरे क्षेत्रीयकुलवतंस श्रीराजा शाहु छत्रपति स्वामी याणी राजश्री बापूजी श्रीपत उपनाम चित्राऊ गोत्र आत्री येजुर्वेदी कात्यायनसूत्र काणवीशाखा यासी दिल्हे इनाम ऐसीजे तुम्ही स्वामी संनिध येऊन किले सातारियाचे मुकामी विनंति केली जे आपण स्वामीच्या राज्यातील पुरातन सेवक निष्ठेने शेवा करितो आपणास एक गाव इनाम देऊन वंशपरंपरेने चालविले पाहिजे म्हणोन त्याजवरून मनास आणून तुम्ही येकनिष्ट शेवाकरितां तुमचे चालवणे स्वामीस आवशक जाणोन स्वामी तुम्हावर कृपाळू होऊन मौजे बालेवाडी ता॥ हवेली पुणे हा गांव पेशजीच्या मोकासियाकडून दूर करून हली कुलबाब कुलकानु स्वराज्य व मोगलाई आमल येकूण दुतर्फा देखील हली पटी व पेस्तर पटी खेरीज हकदार व इनामदार तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने नूतन इनाम करून दिल्हा असे तरी तुम्ही मौजे

* खमस पाहिजे.

मजकूर चतुःसीमापूर्वक मर्यादेप्रो आपले दुमाला करून घेऊन सदरहु इनाम वशपरंपरेनें अनभऊन सुखरूप राहणे लेखन आलकार मोर्तब

---

(ले.१७३) श.१६५२ आ.भाद्र.शु॥ ६] श्री [इ १७३० आगष्ट ८

*चिरंजीव राजश्री माहादेवास प्रती अबाजी निबक आसीर्वाद उपरी आम्ही* ताा छ ५ सफर परियेत कुशल आसो विशेष श्रीमत् राजश्री आपास पुन जाला त्यास बारसे पुणियामध्ये होईल त्यास चिरंजीव धोंड्यास पुणियास पाठऊन आहेर करवणे त्यास सनगे बी॥

| | |
|---|---|
| राजश्री गणेशपत यासमागमे | घरात बासनात पाटाऊ आहत |
| पाठविली सनगे | त्यापैकी पाटाऊ सुमार ३ |
| २ सेले चादणी | राजश्री नारो मोरदेऊ याजपासून |
| २ तिवटे कुसुंबी | पुणियामध्ये गजनीच्या चोल्या |
| — | घेणे सुमार २ |
| ४ | |

धोत्रजोडा पाठविला आहे तो घरी ठेवणे १

येणेप्रमाणे सनगे देऊन चिरंजिवास पाठऊन आहेर करवणे बहुत काये लिहीणे हा आसिर्वाद

---

(ले १७४) श्री

राजश्री माहादाजी पत मजमूदार गोसावी यासी

अखडित लक्ष्मी अलकृत राजमान्ये

स्ने॥ अनदराऊ सोमवसी सरलस्कर दडवत विनती उपरी येथील कुशल जाणौन स्वकीये लेखन करणे विशेष आम्ही ल्स्कर सुप्याकडे रवाना करून सडे राजदर्शनास सातारियास गेलों तुम्ही दरबारी असाल म्हणून पत्रें पाठविलीं की आगोधर येणें त्यास तुम्ही सासवडी आहा म्हणौन कलले त्यावरून हें पत्र तुम्हास लिहिले आहे तरी पत्र दर्शनी स्वार होऊन येणे येक घडीचा विलब न करणें आम्ही आजी छ ८ जिल्हेजी मौजे पाटखल कृष्णातिरी मुकाम जाला राजश्री स्वामीचे दर्शन पूर्णमा जाल्यावरी होईल तूर्त त्यास सुतक मकूबाई भोसली जितीकर शात जाली याकरिता मुहूर्त लाबला आहे तरी आधी येणे वरकड वर्तमान भेटीनतर कलेल* बहुत काये लिहीणे हे विनती

मोर्तब सुद

श्री राजा शा
हु चरणि तत्पर
आनदराव सो
मवशि सर
लस्कर

---

(ले.१७५) श. १६५९, ज्ये. शु. १४] श्री [इ. १७३७ मे ३१

[ शि. या. च ]

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री बाजीराउ पंडित प्रधान ता। मोकदमानी मौजे वाल्हे तो। निरथडी प्रां। पुणे सुहुरसन सबान सलासीन मया अलफ नरसिंगराव जगनाथ चौगुले मौजे मार नाणी राजश्री स्वामीसंनिध येउन विनती केली कीं पूर्वीपासून चौगुलकीच्या वतनास हक व इनाम व कुणबाव्याचा मला तीस बिघे देखील अंबराई व सेते कुणबाव्याची घ इनाम ठाकूरमळ व वेलवडा + + + + व हकलाजीमे सेवाधार नवटाक दर घाणा व दर दुकानी पाने तेरा व सुपारी दर दुकानी येक व पासोडी येक व घोंगडी येक व टके येकवीस व सुगीच्या वावरी दोन मण व बारा महिन्याचे बारा सण वालेरीज कानू कार्ईदे पानमान सुदामत निमेनिमप्रो। आपले वडील अनभवीत आले आहेत त्यास हाली गावकरी सुदामतप्रो। हकदक चालवयासी खलेल करितात म्हणून विदीत केले येशास चौगुलकीचे वतनाचे हक सुदामतप्रो। चालवणे म्हणून तुम्हास हुजरून पेसजी येक दोन आज्ञापत्रें सादर जालीं असतां अद्यापि सुरलीत हकदक चालो देत नाही हे गोष्टी बरी नाही याउपरी हाली हुजरून राजश्री स्वामीनी आज्ञापत्र सादर केले असे तरी तुम्ही मौजे मजकूरचे चौगुलकीचे वतनाचा हकदक पानमान तश्रीफ कानु कार्ईदे जमीनजुमला इनाम पालक घर वाडा बुगरी बोंदरी पटी पासोडी वगैरे कानुकार्ईदे सुदामत यांचे वडील पडले पान निमेनिमप्रो। अनभवीत आले आहेत त्यास सुदामतप्रो। कानुकार्ईदे करार करून वतनपत्रें सादर केली आहेत त्याप्रो। हकदक इनाम पालक घरवाडा पानमान तश्रीफ कानू कायदे यांजकडे सुरलीत चालवणे फि[रून] बोभाट येऊ न देणे जाणिजे छ १२ सफर पा हुजूर लेखन[1]सिमा

---

(ले.१७६) पौ श.१६४९ माघ वा१२] श्री [पौ इ.१७२८ जाने.१७

छ २६ जाखर

पुा राजश्री चिमणाजीपंत गोसावी यास

विनती उपरी मोगल या प्रांते थिजोन राहिल्याने मुल्क दहशतीने लागणार नाही याची तरतूद करावी आपण येका दिवसाचे आवकाशे भेटीस यावे विचार करणें तो आपले विचारे करावा लागतो म्हणून सांगोन पाठविले येसीयास मोगलाने वाघालीयास मोरचा लाविला त्यासी व पावलास प्यादे व स्वार कुमक रवाना केली तो मलोजी पवार याचे पत्र आले कीं तुम्ही सिकारपुरास येणें आपण तेथे येतो तुम्ही आम्ही मिळोन मोगलास गाठावे त्यावरून आपले स्वार जागा व

---

१ जोडावर लेखनसिमेचे सिक्के

पुणाचे जमा करून जावे या उद्योगांत तो दुसेरी खबर आली कीं मलोजी पवार वाघालियास येत होते मोगलाने मोरचा काढून फौज वरून मलोजी पवार याज-वरीच चालोन गेला त्याची याची गाठी पडली हे थोडे त्याने मोडले पलत सिकारपुरास आले तीन च्यार घोडे पवाराकडील घेतली आब गमाविला याकरितां आपण महिनाभर आलो बोले काव्हे (?) जमा करून काही काम होणार नाही आणि आब गमावावा याकरितां भ्रमेकडूनच जे काम होईल ते करून आब रक्षावा या विचारे येथें राहिलो त्यासी लोक आहेत त्यासी रोज उठोन पोटास घोडीयास दाणा पाहिजे तुम्ही सांगोन पाठविले कीं नागोजी घाटगे व मादाजी निंबालकर ठेनावे तरी कर्जदार मात्र हावे त्यास तो दिल्हे पाहिजे कामकाज होणे न होणे ते कललेच आहे हाली मलोजी पवार रायाजी जाधव याची फौज आम्ही जमा होऊन आवाईने जाईल अगर दुसरी कुमक येईल हे पाहावे मुख्य मोगल तरी वैजापुरा-वरून गंगातिरास आला म्हणून बातमी आली रायाजी जाधवावरी छपा घातला हे वर्तमान लिा आहे बहुत काये लिहीणे हे विनंती मोर्तब

सुद

---

(ले.१७७) पौ श.१६४९ माघ वा१२] श्री [इ.स.१७२८ जाने. १७

छ १६ जालाखर

पुरवणी राजश्री चिमाजीपंत गोसावी यासी

विनंती उपरी काली रायाजी जाधव याच्या लस्करातून दाहा बारा माणूस पाईचे लस्कर पावलावरी सोडू आले ते वर्तमान सांगत होते कीं रायाचा व तुकोजी पवार यैसे मढीकडे फौजेनिसी गेले होते तो नवाब निजामनमुलुक कासारीचा घाट चढोन वैजापुरावरी आला तेथून मोगल तीने हजारेक फौज व सुलतानजी रभाजी निंबालकर याजवरी रवाना केले हे वर्तमान यैकोन रायाजी कूच करून लांब मजल करून तावराचाजेवरी डोगरात येऊन राहिला तेथे मागोमाग फौज आली तेथेच छपा घातला रायाजीची तो खबरच नाही मानाजी व सिवाजी पलोन पावलावरी आले आहेत म्हणून जानजी रणबावरे सिकारपुरास राजश्री मलोजी पवार याजकडे कुमकेस पाठविले आहेत त्यानी लेहून पाठविले तो बजीनस कागद पाठविला आहे त्याजवरून कलो येईल " रायाजीस तीन च्यार जखमा लागल्या आहेत तुबाजी-पंताचा भाऊ रामाजी धरून नेला रायाजीस मारले की धरून नेले किंवा कोणीकडे निघाला हे वर्तमान तहकीक नाही माणसे पाठविली आहेत खबर तहकीक आलि-यावरी पाठऊन देऊन बहुत काये लिहीणे हे विनती मोर्तब

सुद

---

(ले.१७८) शके १६५२ आश्वि.शु.१५] श्री [इ.स. १७३० आक्टो.१४

राजश्री दादोबा स्वामी ........यासि

......दाभाडियानी मुलकात धामधूम माडिली आहे येविसी राजश्री स्वामीस पत्र राजश्री गोविंदराव यांस पत्र पाठविले राजश्री स्वामीचा लाखोटा दरबारी जाऊन गुजरानला राजश्री गोविंदराव यानी [ला]खोटा फोडून अक्षरशाहा वाचून दाखविले त्यावरून राजश्री स्वामीनी गोविंदराव यास आज्ञा केली की दाभाडियास पत्र लेहून हुजरे पाठऊन त्याची स्थीत रीत पाहून येतील मग आज्ञा कर्तव्य ते केली जाईल यैसी आज्ञा जाली अतःपर हुजरे व पत्र रवाना होईल म्हणोन तपसिले लिहीले ते कलले ऐशास तुम्ही तेथील मजकूर आलीकडील काही लेहून पाठविला नाही दाभाडियाची वर्तणूक आहे तैसी आहे उतम रीतीने पारपत्य केल्याविना देहावर येणार नाही त्यास पारपत्य करावे न करावे येविसीचा विचार तुमच्या विचारास येईल व तेथीलहि विचार आढळेल तदनुरुप लेहून पाठवणे त्याप्रो कर्तव्य ते केले जाईल रा छ १२ रावर * हे विनंति

---

(ले.१७९) शके १६५४ माघ वा ११] श्री [इ.स. १७३३ जाने.३०

राजेश्री अवाजीपंत देशपाडे का सासवड साहेबाचे सेवेसी

अर्ज सेरीकर कालोजी पा गरूड मौजे वेलसर का मार सुा सलास सलासीन मया अलफ वा तो छ २८ सावानपावेतो सेरीकराचे वर्तमान येथास्थित असे चिरंजीव मल्हारजी गरूड माहाराज राजेश्री अपासाहेबाचा गेला होता त्यास तो हिरदेनगरांवर पडला म्हणऊन वर्तमान यैकिले आहे त्यास साहेबाकडे लस्करातून जासूद आले आहेत त्यास काये वर्तमान ते लेहून पाठविले पाहिजे वरकड वेलसरचे लोक तन्ही सुखी आहेत किवा काये वर्तमान ते लिहिले पाहिजे व राजश्री सभाजी मल्हारजी गरूड याचे वर्तमान लिहिले पाहिजे सेवेसी श्रुत होये हे अर्दास.

---

(ले.१८०) शके १६५५ वै.शु. १०] श्री [इ. स. १७३३ एप्रिल १२

* चिरजीव सखुबाईस प्रती आबाजी त्रिबक आसिर्वाद उपरी आम्ही ता छ ८ जिलकादपरियेत कुपल आसो विशेप तुम्हाकारणे फणस २ दोन पाठविले आहेत ते घेणे थोर फणस इरसाल आहे त्यामधील (प)चवीस तीस गरे यांचे रोप घालणे याउपरी राजश्री पिलाजी जाधव याचे पत्र छ १२ सवालीचे मुा सुपे वेढा बंगस येथील मुकामीहून राजश्री राघोपंताच्या नावे आले त्याची नकल शहारीहून पुणियास आली तेथून सातारियास आली त्यामध्ये मजकूर लिहीला होता की बगसाचा पुत्र काईमखान तीन हजार फौजनसी चालोन आला

त्याचे आमचे युध्य छ ९ सवाली जाले त्यास बुडविले तीन हजार घोडे हाती तेरा व उटे घेतळी लुटून फना केला याउपरी मजल दरमजेल देशास येतो म्हणून लिहीले होते तुम्हास वर्तमान फला[वया]करिता लिहीले आसे याउपरी राजश्री त्रिंबक हरी यास लाखोटा पाठविला आहे तो सुपीयाच्या माहारापासी देऊन त्याजपासी पारता करणे तुम्ही आपले वर्तमान लिहीते जाणे बहुत काये लिहीणे हा आसिर्वाद

---

(ले.१८१) शके १६५५ अ.आषाढ व॥१३] श्री [इ.१७३३ जून २८

चिरंजीव राजश्री माहादोबा यासि चिमणाजी बलाल आसीर्वाद उपरी येथील कुशल ता॥ छ २६ मोहरम जाणोन स्वकीये कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष चिरंजीव राजश्री नानास व तुम्हास फौजसहवर्तमान राजश्री स्वामीकडे जावयाचा विचार करून येथून तुमची रवानगी केली ऐशास प्रस्तुत चव्हाण राजश्री स्वामीस येऊन भेटला तिकडील कारभार आटोपात आलाच अतःपर फौज तिकडे पाठवावयाचे प्रयोजन आहे येसे नाही परंतु चिरंजीव राजश्री नानानी राजश्री स्वामीचे दर्शनास च्यालीस पंनास स्वारानसी जावे न जावे तुम्हास तो गेलेच पाहिजे चिरंजिवाचा विचार तुमच्या विचारे कैसा तो लेहून पाठवणे तदनरूप कर्तव्य ते केले जाईल हे आसीर्वाद

---

(ले.१८२) शके १६६१ चैत्र व॥११] श्री [इ. स. १७३९ एप्रिल २२

[1]तहनामा श्रीमंत राजश्री बाजिराव पडित प्रधान यामध्यें बनाव बेहुजूर राजश्री व्यकटराव व राजश्री दादाजीराव राजश्री राव प्रधान याचे सरदार व अंतोन कारनेर देअलकाश्व व जुजे पेद्र येमाऊस येखतयार फिरंगी अमल जजिरे गोवा तेरीख २४ मोहरम सुहूरसन तिसा सलासीन मया व अलफ

१ तपे साष्ट व बारदेस फिरंगी याचा तेथील कोट व फलकूट फिरंगीयानी भोगावे यास्तव मुलुकामधील फौज उठवावी म्हणजे गावगन्ना जो दिवाण म्हसूल वसूल देत आहेत त्यापैकी दरसदे ४० चालीस राजश्री राऊ प्रधान यासी ××

१ साष्ट व बारदेश देश लस्कर पाईमालीखालें खराबी जाहाला मुलुक ×× नी बदल फिरंगी कौल देतील तेणेप्रमाणे राजश्री राऊ प्र[धाना]ही व अमलदाराही चालवावें कलम येक

१ खोर जुवे व पनले दोनही गाव भोसले यास द्यावे व ह + + सुरपी दर-सालिना फिरंगी यास द्यावे येसा करार + + + मुदतीमध्यें केला होता त्या असुर्फी मना म्हणऊन फी॥ + + कागद द्यावा कलम येक

१ साष्ट व बारदेस व नोडती व गोवे येथील बंदिवान उभ (येता) नें खंड दंड न घेतां सोडून द्यावे देखील खापरी व बंदीकडे कतबे घेतले असतील ते द्यावे कलम येक

१ फोंडे मुलुकामध्ये राजश्री राऊ प्रधान यांचा अम (ल) (जा) ला आहे तेथें गोवे प्रांतातील उदमी साहुकार लोक जा (तील) येतील त्यास व वितविषये उदमी जिनस आणितील त्यास उपद्रव होऊ नये सालाबाद-प्रमाणे जकात घ्यावी मार्गानें जो जिनस येईल जाईल त्यास सालाबाद-प्रमाणेची जाजती जलल होऊ नये कलम येक

१ राजश्री राव प्रधान या दिमतीचा जो मुलुक असेल (त्यास) फिरंगीया तर्फेने उपसर्ग होऊं नये व फिरंगी याच्या मुल (कास) राजश्री राऊ प्रधान यांकडून उपसर्ग लागो (नये) कलम येक

---

६

येणेप्रमाणे साहा कलमे श्रीमंत राजश्री रावप्रधान याचा व फिरंगी याचा तह जाहला याप्रमाणे दुतर्फा चालवावे जाणिजे छ मजकूर (लेखन सीमा)

---

(ले. १८३) श.१६६१वै.शु.१०] श्री [इ. १७३९ मे ७

श्रीमत् माहाराज राजश्री राव सुमंत आपा स्वामीचे सेवेसी

मल्हार गोविद मुकाम दिली सा नमस्कार विनंती उपरी वैशाख सुध १० जाणऊन स्वकीये लिा गेले पाहिजे विशेष दिलीमध्ये कतलआम जाली या + खड उमदे उनई याजपासून व सुजदानराये वकील यांजपासून दोन लक्ष व धमांगधराये वकील आबदूल जबीखान व उज्यागरचंद याजपासून दाहा हाजार सईदखान शामीरखानाचा वकील याजपासून पंचवीस हजार (के) शवराव हर (कारे) (यांज) पासून पधरा हजार रुा व बाबुराव खानदौराकडील यांजपासून लाख रुा घेतले यैसा तपसील कोठवर ल्याहावा येक खेमा व डेरे पादशाही न सोडिले छ ७ सफरी मंदवारी किलियातून कूच करून नरेलीयास छ ८ माहे सफरी सोनपतेस आपले फौजेनसी गेला जातेसमई छ ३ सफरी महमदशाहास तखतावरी बैसऊन जवाहीर व काही नगद व वस्त्रे व नवाबास समशेर व घोडा व खलायेत येणेप्रमाणे कुल आमिरास खलयेत देऊन समाधान केले व च्यार फर्मान त्याचे मोहरेनसी येक नासरजंगास व येक नासिरुदौलास व राजे शाहू व बाजिराव याचे नावे दिधले व महमदशाहाचे फर्मान दक्षणेच्या कूल आमिरास काही रवाना केले व काही जातील छ ८ सफरी शहरांत अज चैन जाले कतलेमधे तीन च्यार लक्ष माणसे

---

१ हा लेखांक भा. इ. सं. मंडळ, पुणें यांच्या संग्रहांतील आहे.

कतल जाली हजारो स्त्रिया व उमदे व साहूकार वगैरे बदी धरून नेली पधरा मण जवाहीर व पनास साठी करोड लुटी वेगला दड घेतला पातशाही हती घोडे व उटे व बैल वर्तमान आमिराचा माल येणेच प्रकारे घेऊन गेला फकीर करून सोडले यैसा कहर दोन महिने दिलीवर जाला शेवेसी श्रुत जाले पाहिजे ही विनती

---

(ले.१८४) श्री

श्रीमत राजश्री [1]आपा स्वामीचे सेवेसी

(वि)नती सेवक आताजी माणकेश्वर कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष काली रात्री राजश्री गगोबा तात्यानीं श्रीमत रा। बाबासी खलबत केले त्यात मा।र हाच की अताजी माणकेस्वर याजकडे ग्वालेरीतील सरजाम आहे तो काढावा आणि इतलाख ठेवावे तो सरजाम दुसरीयास कोणास देणे तो धावा यैसीयासी पूर्वी आजी बारा बरसे जाली ग्वालेर दरोबस्त श्रीमत रा। राऊ कैला[स]वासी यानी मुकासा दिल्हा आलीकडे श्रीमती + + + + + (का) ढून हुजूर ठेविला त्याजवरी कृपा करून निमे विठलपतास दिल्हे निमे आम्हाकडे ठेविले त्या निमेपैकीं आणखी तिजाई सरकारात ठेविली निचीच रदबदली आमची होती येजमानानीहि मान्ये केले होते तों आमची छावणी जाली इकडे ते तिजाई मानाजी पवार यासी सरजाम दिल्हा तो उपाय करणार तों ते गोष्टी येकीकडेच राहून थोडे बहुत आम्हास सरजाम दिल्हा होता तोच काढणार तेव्हा पुढील आशा क्लतन्न आहे ग्वालेर प्रांती आम्हाकडी[ल] दीडसे माणूस आजी बारा वरसे मेली बारा आसामी ब्राह्मण ठार पडले साल गुदस्ता ब्राह्मणाच्या आसामिया फार गोल्या लागोन मेल्या यैसी खराबी ग्वालेरीचे पाई आमची जाली (आहे त्यात) सेवक उभे ग्वालेरीची तिजाई सरजाम दिल्हा आसता त्याची घालमेल करितात येका दो दिवसाचा अवकाश मात्र आहे आमचे घर सर्वस्वे बुडाले कर्जदार जालो व ठाणी बाधली पागा तिकडे ठेविल्या बाकी तैसीच मुलुखात राहिली यैसे चहूकडून घर बुडवणार स्वामीनी कितेक प्रकारे सेवकाचा आभिमान धरिला होता आमच्या प्रा रब्ने स्वामीचे येणेच जाले नाहीं पुढे तिजाई करून घ्यावी हे रदबदली होती ती येकीकडे राहिली आणि होते तेच काढावे यैसे बोलतात तेव्हा गोस्टी कोण (ती) राहिली यैसियास पथकाचा मा।र च्यार स्वार उणे आधिक त्याच्या चितास येईल तैसे ठेवितील त्याची चिता नाही परतु हा पाया थोडा बहुत करून दिल्हा होता त्याचा सेवट लावणे या प्रकारेचा सनदा तिगस्ता दिल्ह्या त्या सिक्याची शाई (अपूर्ण)

---

१ धोंडो मल्हार पुरंदरे ?

(ले. १८५) श्रीशंकर

* चिरंजीव राजश्री नाना यासी प्रति रघुनाथ बाजीराव आसीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकूर कलला गोविंदरायासी निखालस वर्तायाचा भाव दाखविला संभालुनच्च असावे केवळ मैत्री करू नये जनार्दनपंताची मैत्री करू नये तुम्ही म्हणाल की भावासी दावा करितात तरी हे खरेच आहे यानंतर आमची खोड आसी आहे दोहोसी जो मैत्री राखितो त्यासी आम्ही काही बोलत नाही तुम्हा त्याहावेसे नाही परंतु सूचनां मात्र यानंतर काल रात्री सोमवारी जेवते समई घोडी फेरावया-वयाच्या गोष्टी निघाल्या पहिली पध्धत दुसरी पध्धत तिसरी पध्धत ऐस्या पध्धती काहाडिल्या सितबा व जानोजी ढमढेरे वगैरे हरजी सितोल्यादिक ही पहिली पध्धत दुसरी जोत्याजीराव व इद्रोजी कदम वगैरे हे तिसरी संटवोजी जाधवराव व सुभानजी जाधव हे अस्या पध्धती तीन त्या कस्यावरून तर पहिली सालसूद घोडे फेरणे म्हणून जुंझास उपयोगी कावादावा वेडेवाकडे करून दाखवणे हे मध्यंम बाजारातील बाइकास दाखववयाचा तो कटाव अस्या पध्धति काहाडला त्यामध्ये आम्ही तीहि मिश्रित भाऊ जुजेपर (?)फारच थोडे आसी नावे निघाली त्याउपर भाऊला सागितले की तुम्ही एक घोडी तयार करा जीजवर कोणी पाये दिल्हा नसेल ती नवीच तुम्ही करा तिघानी तीन घोड्या कराव्या म्हणौन सागितले आम्ही बरे म्हटले भाऊस लक्ष्मीची सिगी सागितली आम्हा दोघास सागितले नाही त्याउपर आपल्या गोष्टी काहाडल्या तुझी जराजर स्तुत जाहाली केवल थोडी जाहाली एक दोन उतरे जाहाली गोष्टी फार सागितल्या दशांश कागदी लिहिता पुरवत नाहीं सारांश लिहितो त्यावर माझ्या तोंडातून गोष्ट निघाली की बाबा माहादोबास घोडे तयार होणार नाहींत असे बोललो त्यावर नानानी पुसले की कस्यावरून मग उतर दिल्हे की हे आठा रोजा घोडी फेरावयास जाणार मग म्हणाले की घाला पैज आम्ही म्हटले पैज कस्याला पाहिजे तर म्हणाले तुम्ही बाइकोच्या पाया पडावे तेव्हा आम्ही पैज घातली आकांडतांड का की पैज न घालावी म्हणौन तरी न ऐकत तेव्हा अंती कबूल केले की त्याणी तरी पडावे असा करार जाला पुढे काय होईल ते पाहावे आज दोन प्रहरी कृष्णाजीपंत आले ते म्हणाले तुम्ही भोळे खरे तरी कसे म्हणून पुसले तेव्हा त्याणे उतर केले की काल नानाची मर्जी तुम्ही जाणलीत नाही नानानी बाबाचा म्हणून पक्ष केला असे काहीसे ख च्चि ली सा बोलत होता आम्ही मनात आणिले की नानानीच यास आमचा भाव काढा-वयास सागितले असले तर यास्तव आम्ही मोघमच म्हटले गोष्ट गेली काही भांडिले नाही असे येथे आहे परंतु नानाच्या बोलण्यावर चालण्यावर काहीहि असा भाव दिसला नाही हे आसीर्वाद

पु.द. २२

(ले. १८६) श. १६७० श्रावण] श्रीशकर [इ. स. १७४८ जुलई

* चिरजीव राजश्री नाना यासी रघुनाथ बाजीराव आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष काल येक कलमदान जाहाले यानतर परवा दक्षणा आम्ही दिल्ही तेव्हा मामानी आथवा कोणी सागावी आणि द्यावी असे जाहाले नाही आमच्या मनास आली तितकी दिल्ही पधरा हजार ब्राह्मण जाहाले आम्हाकडे सात हजार जाहाले त्यास सत्तावीस हजार लागले वैदिक उतम आले होते आणि नानाकडे आठ हजार जाहाले तीस हजार रुपये लागल या प्रकारची दक्षणा जाहाली तिकडे पडितास दक्षणा दिल्ही वैदिक आले नव्हते त्याच्या मते की आम्ही पडितास दक्षणा दिल्ही त्यास जितका दर बसला तितकाच हिकडे बसला परतु आम्ही मामाच्या आथवा पुराणीक आथवा बहीरव जोसी वगैरे दोन च्यार भट होते बाबुराव होते याच्या आनुमते दक्षणा दिल्ही याच्याच आनुमते केले त्यावरून नानास असे वाटले बहुधा की आपणास उदार शक्ती फार आहे असे दर्शवायासाठी फार दिल्ही मागे जेव्हा मनसबा पुसला होता तेव्हा सागितले होते की खर्च थोडा करावा त्यावरून असे त्यास भासले असेल येके दिवसी म्हणाले की सहजावरी गोष्ट निघाली होती आम्ही म्हटले की आम्हाकडे वैदिक फार आला तिकडे आला नसेल असे म्हटले बहिरव जोसी म्हणाले खरेच त्या वरून नाना म्हणाले की वैदिकहि आर्ष आणि हेही आर्ष त्या वरून असा तर्क केला आणि कोणी कोणी आम्हास अवमानतात आम्ही सभालीतच आहो जेथे राग करावा तेथे राग करतो जेथे सोसायाचे तेथे सोसतो असे आहे हे आसिर्वाद

---

(ले. १८७) श. १६७० भाद्र व ४] श्री [इ. स. १७४८ आगष्ट ३०

*आसिर्वाद उपरी साप्रत तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कल्त नाही तरी सर्वदा पत्री लिहीत गेले पाहिजे उचीत असे येथील वर्तमान तर अगारकी चतुर्थीस तीर्थरूप राजश्री नाना स्वामी थेउरास गेले होते आम्हीही बरोबर गेलो होतो ते दिवसी तुला नाना स्वामीनी आपली सुवर्णाची केली सात हजार मोहरा भरल्या चिलखत ढाल तरवार तरकस कमान घेऊन बसले होते याप्रमाणे तुला जाली तुम्हास कलावे म्हणून लिहीले असे हे आसिर्वाद

---

(ले. १८८) श. १६७० भा. व. ३] श्रीशकर [इ. स. १७४८ आगष्ट २९

चिरजीव राजश्री नाना यासी प्रती रघुनाथ बाजिराव आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिला आर्थ

---

१ पत्र जनार्दन बाबाचें

कलला आज आम्ही येथे थेवरास आलो चतुर्थी करून जाऊ उद्या चतुर्थी आहे काल आले आज काही होम जाहला उद्या सा तुला होतील येक सोन्याची येक कथलाची वगैरे सा तुला करितील आणि दुसरे दिवसी जातील तुम्हास कलावे म्हणोन लिंहीले आहे तुम्ही जनार्दन पंतासी श्नेह फार राखीत न जाणे का की येके दिवसी फारच कृपा करितील येके दिवसी तोंडावर मारितील यासाठी कच्चा मनसुबा न करणे हे आसिर्वाद

---

(ले. १८९) श्रीकर

पौ छ २९ रबिलोवल

चिरंजीव राजश्री नाना यासी प्रती रघुनाथ बाजिराव आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्राचे उतर पाठविले ते पावले लिहीला मजकूर सविस्तर अवगत जाहला ज्वराचा मजकूर लिहीला तर तो सखा-रामपंती सागितला असावा परंतु तो लटका यात संदेह अंगडीतला आहे काही ताजेही होत आहे दुवख्त दंड काढतों दो रोजा आड घोडी फेरावयास जातो खातो ते जिरते तुम्हास कलावे म्हणौन लिहीले असे बहूत काये लिहीणे हे आसिर्वाद.

---

(ले.१९०) श.१६७० भा. व. ] श्रीशंकर [ इ. स. १७४८ आगष्ट

*श्रीयासह चिरंजीव राजश्री त्रिंबक सदासिव यासी प्रती रघुनाथ बाजिराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहीणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले ऐसियासी तुम्ही कलमदानाचा मजकूर लिहिला तो कलला ऐसियासी आम्ही जेथवर राखवेल तेथवर राखितो आणि होते त्यास काही इलाज नाही वोखदाचा मजकूर लिहिला ऐसीयासी वोखद घेत असले तर पथ्य करावे लागते त्यास आम्ही वीस दिवस उतम रीतीने पथ्य केले आणि मग पाचसात दिवस कणसे खाऊ लागलो ते वैद्यास अगोधर आमचे वोखदाचे तोडावे म्हणौन सागा म्हणौन बोलले होतो त्यावरून वोखद तोडावे या अर्थे वैद्य म्हणाले की आता हे कणसे गिणसे खातात यास वोखद नलगे असे म्हणाले त्या वेलेस तर काही तीर्थ-रूप बोलले नाहीत ज्या दिसी रागे भरले त्या दिसी म्हणाले की त्या दिसी वैद्य असे असे म्हणाले नव्हते म्हणजे कणसे खादली त्याचा राग आला मग वैद्यास असे पुसावयास पाठविले की हे नीट पथ्य करीत नाहीत यास्तव यास वोखद नलगे अथवा बरे जाहाले म्हणोन नलगे किंवा का नलगे ते सागा म्हणौन पुसावयास

पाठविले त्यावर येकजण पुसावयास गेला त्या दिसी वैद्य सापडले नाहीत मग नारायेणास बलाऊन आणून म्हणाले की तू जर सिदलकी वगैरे काही अन्याये केलास तर हे दूर करितील ओखदासाठी दूर करितील तर आम्ही करू देणार नाही मग वर फारच बोलले विस्तार ल्याहावा कैस्यास दोन घटका बोलत होते सारांश मग वैद्याची गाठ पडल्यावरी त्याणी पुसले की तुम्ही काये म्हणौन ओखद देत नाही त्यावरून दोन तीन गोष्टी सागून समजविले मग ओखद काही रसायेण काही देत नाहीत येर गोल्या देतात मग थेवरास गेलो तेव्हा वैद्यास विचारिले की आम्हास आता पथ्य काये त्यावर बोलले की येक पथ्य आहे तर काये म्हणौन आम्ही पुसले त्यावर वैद्य बोलले कीं आहे मग आम्ही म्हटले की कणसे की काये मग नाही म्हणाले तेव्हा आम्ही म्हटले तें की काय तेव्हां म्हणाले तेवढे नाही केले म्हणजे झाले त्यावर आम्ही म्हटले की जेथवर राखवेल तेथवर राखितो हा मजकूर थेवरी जाहाला चतुर्थी जाहाल्यावर पंचमीस राहून शष्टीस कूच जाहाले पाऊस फार पडत होता उघडला प ल जा र नाही याजमुले वाटेचे फार श्रम जाहाले घोड्यावरच होतो त्यावर घरास आलो मग नानानी पाच कणसे आम्हा कारणे आणि पाच कणसे जनार्दनपंता कारणे आणि पाच भाऊ कारणे असी पाठविली ती खादली वगैरे जडच फराल केला इतके अपथ्य करावयाजोग जाहाले परतु तीर्थरुपाच्या मनात पथ्य करावयाचेच परंतु आम्हीच आम (प) ले हिकडे तिकडे करितों बाहेरील मजकूर ल्हाहावासा नाही आम्ही बरे आहो साऱ्या गोष्टी ठीकच होत आहेत वरकड मजकूर जनार्दनपंत लिहीतातच मजला फारसे सुचत नाहीत हे आसीर्वाद

---

(ले.१९१).श.१६७२ पौ.शु.१३] श्री [इ. १७५० दि. २९

+आसिर्वाद आईसाहेबी येकाती सागून पाठविले राजा खोटा हे खरेच आहे नारूजी तानाजी सावंत याणी नासले त्याचे पारपत्य करावे तरी राजा शर्मीदा यास्तव कोणे प्रकारचा डौल धरून करावे आईसाहेबाचे लक्ष राखावे किवा सेवट-पर्येत मुडदारच करावे हे ल्याहावे म्हणून लिहीले ते कलले ऐसीयास राजा या प्रकारचा आहे हे कललेच आहे परतु आता आईसाहेबी म्हटले तरी आम्हास व मातुश्रीस लोक फजीत करितील यात जीव नाही वरकड नेहमी आईसाहेब मुडदार करावी तरी राजे या प्रकारचे यास्तव आसे न करावे जे काम करणे ते आईसाहे-बाचे आज्ञेने जाले आहे जे केले ते तुमचेच हाते निभावावे हे मातुश्रीनी करावे खाली आलीयावरही राजश्री मुडदारच करावे उचित नाही यास्तव लगाम मात्र राखून व जबरदस्तीने खाली आणावी आईसाहेब केवल निराली होती तसी न राहावी त्यासच पुसून करावे परतु दोघातून येकास नेहमी बसविले आसे मात्र न

करावे आपले लक्षाने जाहाला कारभार तों निभावावा याप्रो करणे वरकड प्रस्तुत मोगल मेला यामुले जो मनसुबा ठहरून होईल त्याप्रो बाहेर जाऊन परंतु तुम्हाजवल फौज आहेच सेवटपर्यंत याप्रो च रंग उतरणे वरकड आम्ही जेथे जसे पहिले आहो तसेच आहो डोईवर घेऊन करावयाचा काल नाही जे सागतील ते करून आसू वरकड मागाहून लेहून पाठऊन तुम्ही लिहीलेप्रो करणे वर्तमान वरचेवर लेहून पाठवणे रा छ १० सफर मंदवार दोन प्रहर हे आसिर्वाद[1]

---

(ले.१९२) श. १६७२ पौष शु. ] श्री [ इ. १७५० दिजेंबर

चिरजीव राजश्री नाना यासी भाऊ आसिर्वाद तुम्ही पत्र पाठविले ते पावले सविस्तर कलले लिहिले की

आपले पत्र गोविदरायास दिल्हे मीही दाखविले शफत पूर्वक तेही बोलले प्रस्तुत पहिले पेच होते ते नाहीच आईसाहेबाचे पेचातच आहेत गडकरीही आईकत नाही मी ही ह्याच मजकुरासाठी येक दोनदा गला पडलो प्रस्तुत निर्मल आहे हर इलाजे राजश्रींचे काम सारे मिलोन चौघाकडून राजकारणे चालऊन करितो म्हणून सविस्तर लिहीले ते कलले येसी यास आणापासीही मातुश्री बोलली आहेत बराच प्रकार आहे दोघेही राखून केले न मोडावे आईचे वजन राखावे याप्रो भरोसा पुरऊन खाली आणावी केवल उगेच बोलून दाणे सेतचे न्यावे आसे आसलीया कजिया पडेलच कजिया ही करणे खाली सेते बंद करावी तोड काढील राजकारण करील ते मारावे केवल मोर्चा मात्र न द्यावा आसो इतकेही होऊ न देता राजकारणाने लौकर जाले तरी उत्तम आहे माझे मते गोविदरायाचे लगामचे तीनसेच्यारसे माणूस वरते आहे येमाजीपत आहेत तेच आहेत विशेष नाही तेथे येत नाहीत. राजश्रीचा खोटेपणाचा मजकूर लिहिला तर पहिले राज्यलोभ आई जेवली आता का वैसीत आणा यास्तव बोलतात परतु त्यास ही कामाचे नाही जे जाले ते उतमच आहे परतु कोणे प्रकारे ता सागतात ते आई बाप खूणखाण सविस्तर लिहिणे बाबाचे विसीचे चर्चेच प्रकार व प्रस्तुत काली मनसुबा करावयाचा मजकूर लिहिला तो कळला यैसीयास चौकी पैका मागणे वगैरे सर्व लटके दोघाचा पेच फारच पडला निराले राहिलीयावाचून बाबाची फजीती म्हणून मात्र पुण्यास गेले नेहमी राहिले तरी तुम्हास का ठेवते ते नाही मीही बोललो आहे व प्रस्तुतही त्याचे येणे होई तेच करितो गगेपर्यंत तो सारेच चालले आहो येखतीयार तुम्हावरच आहे रामचद्रबाबाचा प्रकार तर कोणे द्वारे स्वरूप नाश हा ठाऊकच आहे त्याप्रो आहेत आमचे विचारासिवाय नाही ज्यात लौकिक दूर होऊन

---

१ सर्व पत्र भाऊसाहेबांचे हातचे नाना पुरंदरे यास.

हवालदाराचे जबरदस्तीमुळे चालत नाही परतु इतके लोक आहेत तेव्हा पुर्ते मनापासुन रायानी आणखी तुमचे लोक वरते नेऊन जबरदस्तीने राजे खाली आणावे मग आईही भरवसा पुरऊन येईल गडकरी विचारात नाहीत देखील पुराणीक निर्माल्य होतील या प्रो आगर वरतीच फूट पाडून पुर्ते करावे आसे केले तरी होईल येकूण तेथील येख्तीयार तुम्हावर आहे दुसरेकडे राजकारण नाही आसेच आहे तुम्ही ताव भरून लिहित होता त्या प्रो फौज पाठऊन तुम्हास लिहिले याउपरी भलतेच विचारे खाली न आली तरी तुमचे स्वरूप नाही वाढे ते करणे कामही होई ते करितो परतु तुम्हासी पहिले सारले पेच रायाचे नाही आसे असले तरी परिछिन्न काम होईल आसे वाटते हे करून आपले स्वरूप वाढवणे नाही तरी कसे ते साफ लिहिणे तुमचे लिहीलीयात होईलसेच आहो त्याप्रो करणे

सातारकराचा मजकूर तरी प्रस्तुत हर इलाजे खाली आणावी स्वस्थपणे चालवावे मग पुढे दिसेल तसे पाहू आमचे विचारेच आसले तरी आमचेच जाले

गाईकवाड दाभाडे फतेसिग वगैरे सर्वाची राजकारणे कोणे प्रकारे तेथे कोणासी आहेत मोगल मेलीयामुळे आईसाहेब कारभारी काही करितात की काय बाबाचा गोविंदरायाचा पहिला भाव तुम्हास ठाऊकच आहे त्याप्रो प्रस्तुत आहे की कसा आईसाहेबाविसी कसे हे लेहून आढलत असेल त्या प्रो पाठवणे

( पुढील बंद मिळाला नाही )

---

(ले.१९३)श.१६८० चैत्र शु.११] श्री [इ. १७५८ ए. १९

चिरजीव राजमान्य राजश्री नाना यासी सदाशिव चिमणाजी आसिर्वाद उपरी तुम्ही पत्र बलवतराव याचे पाठविले ते पावले वर्तमान कलले ऐशीयास येथील प्रकार सर्व ठाऊकच आहे लिहीणे येथून बलवतराव यास लिहीणे ते लिहिले असे तुम्ही लिहीणे की चिदरूरचा यैवज याजवर येखतीयार तुमचाच आहे परतु फौज फेडून पाच सात उरऊन आणावे हे करावे असे लिहिणे आमचे शरीरी पाच सात दिवस ठीक नव्हते आता ठीक आहे त्रिचकी आहो नागबल नारायेणबल करितो प्रारंभ केला येका दो दिवसी समाप्त होईल नासिकास जाऊ तीर्थरूप याचा ज्वराने वाखा केला असे श्रान नाही मर्जी ठीक नाही लौकर पुणियास यावे हेच परतु हैदरजगानी येकायेकी शाहानवाजखान व मिरमहमद हुसैनखान दिवान यास कैद

केले पुढे नगरास यावे आम्हाजवल फौज नाही हे पाहून कजिया करावा हे अतील मसलत केली अशी खबर येती हे कर्म केले याजमुले इतबार पुरत नाही याजकरिता येथेच संगमनेरपर्यंत चैत्र मास घालऊन याची तालमाला पाहोन यावे असे असे शहानवाज + + + + यास रुपयाचे भ्रमावरून कैद + + + + रुपया दिसत नाही पाच सात + + + याची वस्तवानी जव्हायेर निघाले पु + + निघेल पाहावे सरहेदेस चिरंजीव दादा लाग [ला*] शहर लुटले किलेदार व सरदार किलेसुधा ++ केला म्हणोन खबर आहे कलावे *दादाक [डे] ... ... र्यंत जातील येदा येणे होणे ... ... दिसते शरीर प्रकृत (तीर्थरूप) याची उतम नाही आठ च्यार मुकाम नासकी पडले यामुले उरकून घेतले रविवारी नासिकास जाऊ आणखी दोन तीन रोजी तेथून कूच होईल हैदरजंग बाट यामुले बुसवास येदा नाही परतु पुढे दिसतो शाहानवानखानासी दगा करून फिरंगी यानी इमान पुर्ते बुडविले इतबार गेला पुढे काय महिना पधरा रोजात कलेल दतबाही चैत्र आखेरपर्यंत घरीच आसतील मग निघून जातील तुलजापूरची यात्रा तूर्त तुमची राहिली तर पुढे दसरीयात करावी आम्हास च्यार पाच [ दिवस ] ताप थोडासा आगात होता आता काही नाही बलवंतरायाकडील बिदरूरचे सात आठ आलीया येथे खुशाली आहे हे आसिर्वाद रा गुरुवार सकाल छ १० साबान

पौ छ १५ साबान

---

(ले.१९४) श.१६७५ माघ व.३] श्री [इ. १७५४ फेब्रु. १०

+ आसिर्वाद उपरी दोन पत्राची उतरे पाठविली ती पावली लिहिला अभिप्राय कळला तुम्ही लिहिला विचार बहूत उतम आहे साष्टी वसई खडोजी माणकर याचे तूर्त येणे होणार नाही वरकड येतील बोलाऊ गेले विसापूरचाहि मजकूर मागून विचार करून लेहून पाठऊ रा छ १७ रबिलाखर हे आसिर्वाद रामनगरचे राज्य आपले सरदेस आहे ते दुर्जनसिगाचे जावाई त्याचेच मारफातीने पूर्वी त्यापासून येक दोन परगणे ठाणे घेऊन सलुकानेच आपले पदरचे दाखल वर्ततात यास गुा त्याचा किला मातबर येक आहे त्याचा लाग करून वसईहून हूजरून आज्ञा करून लोक पाठविले होते त्यास राजकारण फसले सिडी लाविली त्या सरसा गडगा ढासलला चाहूल होऊन त्याणी सारा गडगा धासलला खालते दाहापर्यंत सरदार मात्र सापडले वरकड पलाले त्याची डोचकी त्याणी मारली येक दोन सावकाराचे वाटेने रुो चोर घालून चालीस पनास हजार नेले त्यात

---

१ या पुढील मजकूर खाशाच्या हातचा.

+ पत्र भाऊसाहेबांचें.

समजावीस करून थोडेसे दिल्हे याप्रो आतरमार्गे पारपत्य करावे तरी नवाबाचा कजिया फिरंगी या [ची] आवाई मुलखात डोहाणा होईल म्हणून न केले आलीकडे करावे तरी सकराजीपताचे मते डागण मुलूक या दिसात फौजेस दाणा येक मिळणार नाही त्यास गलीसपी बसणार नाही आपला मुलुकास मात्र उपद्रव लागेल पुढे त्यास दुर्जनसिगास हुजूर बोलाऊन त्याचे आगी लाऊन दोन च्यार परगणे घ्यावे नाही तरी पुर्ते पारपत्य करावे विचारे पाहाताच तेच खरे यासाठी तूर्त राहिले पुढे करून तुम्हास कलावे म्हणून लिहिले आसे हे आसिर्वाद'

पौ छ १७ रावर

---

(ले.१९५) श. १६७३ आश्वि. शु. ७] श्री [इ. १७५१ सप. १५

'आसिर्वाद उपरी गगोबाहि आम्हासी बहुमानादाखल बोलत आसतात आम्ही समाधानाच्या उमेदवारीच्या बोलतो नारो आपाजीचा मजकूर तुम्ही लिहिला त्या प्राच व्हावयाचे आहे फडनिसी त्याकडे देवितो तुम्हास कलावे याचा मजकूर तरी सखारामपतासहि पुसला त्यास लक्ष्मणराव येथे आले त्यास मेजवानी केली रामचद्रबावा व सरदार सारे आले होते दाहा हजारपर्यंत आख लागला आहे याकरिता तुम्ही येथे आसावे इतकाच मजकूर दुसरा आतर्भाव या प्रो दिसतो की पुरधरची सबनिसी आपण घेतली आहे पुणे देसची दिवाणगिरी नारो आपाजीस सागितली आहे त्यास तुम्ही सासवडाहूनच पाहावा गडचा बदोबस्ताचा समाचार घ्यावा पुढे पुढे होत होत शामराव उडऊन आपले लगामी सारे लावावे आसे दिसते आणखी पुढे आढलले वर्तमान ते लेहून पाठऊन पुढील विचार नवाबाचा श्रेहच होईल किले परस्परे घेतले आहेत ते द्यावे पुढे बदोबस्ताविसी बोलावे किले न घ्यावे येविसी आणभाप करावी कदाचित भेटीहि होतील पुढे नाना बाबा मालवियात जातील रामचद्रबावा सारखीयाने दाहा हजार फौज घेऊन पटणे प्राते जावे तेणेकरून आपल्यास पैका मिलेल रघोजी न वाढता पातशाहाजवल प्रमाणिकता राहाते आमचे राहाणे इकडेच होईल त्यास याची छावणी ते प्राती राहतील तेव्हा ये प्रातीचा व कोकणचा बदोबस्ताचा मजकूर कसकसा करावयाचा पुसतील तेव्हा कसकसे बोलावे याचा विचार करून ठेवणे पुढे होईल ते लेहून पाठऊ रा छ ५ जिलकाद हे आसिर्वाद'

---

(ले.१९६) श्री

*चिरजीव राजश्री नाना यासी प्रती सदाशिव चिमणाजी आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते

१ पत्र भाऊसाहेबाचे धोंडोबा आपास.

पावले लिहिला मजकूर कलला तुम्ही लिहिले की खंडेसरीची सिगी व कृष्णावतीची व कुमेत सिगा आपणच फेरून तयार करावी खडेसरीची सिगी जलद आहे रोज फार बसत जावे नागीण जलद आपल्यास फावली आहे त्याप्रो दुसरी जलद सोसणार नाही व चंद्रकला नागीण यास च्यार रोज कवडीस पाठवावे म्हणून सविस्तर लिहिले त्याचा भावार्थ सर्व कलला ऐसीयास आम्ही तीन सिगरे येथे आणली आहेत आम्हीच फेरीत आसतो येथाज्ञाने होईल तितक्या तयार करून वरकड नागीणीचा मजकूर लिंहिला तर आम्हास बहू विद्याहि नाही व गर्वहि नाही तेथील सिग्या कशा तयार होतात ते लिहिणे जे बसणार म्हणवीत आसतील त्याणी नव्या घोड्या तयार कराव्या आम्ही आजपर्यंत येक दोन आपल्या गवेस आणिली ते दुसरेच बसून आणिली पुढेहि सिग्या तशाच कराव्या लागतील होईल तशा करूंन तुम्हीहि गुरू आहा कोण सिगी कसी फेरावित ते लिहिणे त्याप्रो फेरून पत्राचे उतर लौकर पाठऊन देणे सुभेदारापासून आमचे नावची घोडी घ्यावयाची होती त्यास दोनीहि आणून पाहिल्या जगरूपेची बर्हाणीची लेक बाधा बरा परंतु सुबकबाज फार थोरहि नाही व चोर कोन्हाळी या बाबत थोर गरीब परंतु आमलसी पागल आहे ते घेतली रा छ १० सफर हे आसिर्वाद[1]

---

(ले. १९७) श्री

पुरवणी चिरजीव दामोदरास आसिर्वाद पेसजी आबाडचा कमावीशदार रा गगाधरपंत तात्याचे तर्फेने विनायेकपंत वोझरकर होता प्रा अबाड येथे चिरजीव बापूसहि खासगीची फडनीस होती त्यामुले विनायेकपंताची व चिरजीवाची वोलख त्यास विनायेकपंतानी सुरत आठाविसीत च्यार पाच माहाल जकातीचे केले ते चाला म्हणाले म्हणऊन चिरजीव बापू त्यास बराबर सुरत प्रांती गेला त्यास येक वरीस जाले कागदपत्र येतात परतु अद्याप पैसा प्राप्त नाही त्यानी विजारा केला होता त्यास तोटा आला याकरिता अद्याप काही पावले नाही सेवटी काये देतील ते पाहावे सरकारचा धदा नाही कमाविशदाराची चाकरी धर्मास देतील ते घ्यावे त्यास मार्गश्वर आखेर जकातीचे साल होईल पौशमासी चिरजीव घरास येईल ऐसे आहे त्याजपासी येक घोडी आहे तटू मुडा त्यापासी होता तो वारला घरी दुसरा तटू होता तो विचुरी कोणी चोराने नेला दुसरे घोडे घरी नाही चिरजीव बापुपासी घोडी येक व चाकर येक बाव्या आहे देसास त्याजबराबर आला होता तो तुम्ही पाहिलाच आहे सविस्तर तुम्हास कलावे म्हणऊन लिहिले आसे बहूत काय लिहिणे हा आसिर्वाद ताजाकलम मुख्य गोस्ट आजच्या दिवसापर्यंत आम्हास काही उपद्रव नाही पूर्ववतप्रमाणे कचेरीचे काम लिहीणीयाचे आमचे हातून घेतात येथून पुढे काये होईल ते पाहावे तैसीच गोस्ट जाली

तरी चिरजीव भगवतास तुम्हाकडे पाठऊन देऊ मग तुमचे विचारे उमयेताचे होईल ते करणे यानंतर तुम्ही लिहिले जे देशस्तास कोणी पुसत नाही गरीबीनेच आसावे म्हणऊन तुम्ही लिहिले त्यावरून आम्ही लिहिले असे बहुत काय लिहिणे वतनदारीची याद आम्ही लेहून पाठविली ते कोणास न दाखवणे आम्हास विदित होते ते आम्ही लिहिले आहे परतु अवघा मदार वौंशावलीवर आहे त्यास आम्हापासी वौंशावळ होती ते कोनेरीपासी होती ती आमची गेली आमच्या तीर्थरूपापासी नवती त्यास वंशावल रा। शामजीपंत दाणी याजपासी आहे म्हणऊन ते आम्हापासी सांगत होते आणखी कोणापासी गावात वंशावली असतील त्याचा शोध [ क ] रुन वंशावल लेहून घेणे तजविजीने लेहून घेणे आम्ही उड्डूक दुड्डूक लेहून दिल्हे आहे ते कोणास न दाखवणे मुख्य गोस्ट चितो माहादेव नावधारीक होता म्हणऊन त्याचे नाव चालते परतु त्याच्या घरास आमचा चवथा वाटा हे खरे बहुत काये लि॥ हा आसिर्वाद

---

(ले.१९८) श्री

पुरवणी चिरजीव दामोदरास आसिर्वाद उपरी राजश्री विठलराव सिवदेव याची कन्या वधू आहे तिजला देवी अद्याप आल्या नाहीत लग्नास खर्चवेच कितीक करितील म्हणऊन लिहीले तरी पूर्वी येक दोन लग्ने केली पाच हजारपावेतो खर्च जाला साल्गुदस्ता खासा राजश्री सिवाजी विठल याचे कन्येचे लग्न जाले त्यास आठ हजार दाहा हजारपावेतो खर्च केले त्याहून वि [ शेप ] काही खर्च करणार नाहीत येसे दिसते त्यास तुम्ही लिहिले त्यास समर्थासी सोयेरीक करावयाचे कारभारी विचूरी आहेत त्याच्या चितात नाही मग हिंदुस्थानात पत्रे जाणार आहेत म्हणऊन तुम्ही लिहिले तरी तेथून ते कारभारीयास काये लिहीतील ते न कले परतु खर्चवेच काही बहुत करवणार नाही खरे कदाचित घडोन आले तरी तुमची आमची व आथवा चिरजीव भगवताची विचुरी भेट होईल त्यास आपली आसामी सरकारातून करार असली तरी मागील बाकी वेतनाची राहिली आहे त्याचा विचार च्यार तोंडे येक होईल तेव्हा होणे तो होईल परतु सरकारचे ताकीदपत्र ताजे होये तोवर विचुरकरासी आथवा खासा राजश्री सिवाजी विठल यासी बाकीचा तगादा आपल्यास करिता येत नाही आर्जवानेच आसावे आम्ही सहकुटुब त्यांच्या प्रगणीयात आहो याकरिता आर्जवाने आसावे आवघा मदार आसामी करार जालियावर आहे बहूत काये लिहीणे हा आसिर्वाद पुढे आसामी ......ताक्दिपत्र जावे तरी मागील बाकीचा तगादा करावा बहूत काय लिहिणे प्रस्तुत चालतच आहे तुम्ही दरबारी जाऊन ताकिदपत्र सहसा न मागणे ताकिदपत्र मागावयास गेले तरी त्यास दाट्न स्मरण होईल तरी तरी ताक्दिपत्र न मागणे

जुनी ताकिदपत्रे पा। म्हणून लिहिले त्यास जागीर जालियाउपरी दोन ताकीदपत्रे घेतली होती त्यापैकी येक ताकिदपत्र रा। सिवाजी विठल याचे नावे आहे ते आम्हासी विचुरकरास दाखवावयास लागते म्हणऊन ठेविले दुसरे वरसीचे ताकिद पत्र रा। गणपतराव याचे नावे आहे ते तुम्हाकडे मल्हारीबराबर तुम्हापासी पाठविली असे व रा। सिवाजी विठल याच्या ताकिदपत्राची नकल मल्हारीबराबरच तुम्हापासी पाठविली आहे बहूत काये लिहिणे हा आसिर्वाद आणि विचुरकराकडे जागिर जाली ते साली ताकीदपत्र घेतले ते रा। विठलराव याचे श्वाधीन केले हा आसिर्वाद

---

(ले.१९९) श्री

*राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री [1]नाना स्वामीचे सेवेसी

पो। सखाराम भगवंत कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान ता। श्रावण वद्य त्रयोदसी परियेत येथास्थित आसे विशेष स्वामिनी पत्र पाठविलें तें पावलें पहिले भाषणाचा भावार्थ व आम्ही आगोधर पत्र लिहिलें होते त्याचें उतर लिहिलें ते कललें तरी आम्ही जे स्वामीस लिहिले त्यामधे हाच आर्थ की पहिलेपासून आपण बोलत गेलो त्याचे अर्थहि कोणे रीतीने बोलिलों ते येकीकडे ठेऊन रुक्ष भाषणाचा भाव चितात आणून हितशत्रुत्व केले येसे मानून सर्वस्वभाव गर्वोक्ती टाकणें म्हणून कितेक पर्यायें करून लिहिलें येशास पहिलें भाषण आम्ही केले आणि आता दुसरे करितों येसे नाही व मागें पुढें थोर माणसास व कुरुबदार माणसास ह्याच गोष्टी योग्य आहेत आम्ही काही [2]बाबापासून वेगलें निघावें आणि वाटा घ्यावा या आर्थें बोलिलो नाही बाबा आपल्यावरी कृपा न करीत तरी नानाची चाकरी सिलेदारीचे रीतीने करून काही न मागता हजार दित्हे पाचसें तथापि त्याचा मजकूर ध्यानात न आणतां स्वामी सेवा जालिया अनायासेच सर्वांचे मनोरथ हतप्रभ होतील येसी येकच गोष्ट बोलिलो आहे येसे नाही स्वामीहि बहुत गोष्टी बोलिले आहेत व मीहि बहुता प्रकारे भाषण केले आहे परंतु जन्मांतरीच्या रुणानुबधे व लोकानीहि स्वामीजवळ साहित्य केले त्यावरून चितात विषमता वाढली आहे यद्यपि बरी आथवा वाईट जेव्हा जो विचार सुचला तो बोलत गेलो तेव्हां दोन शब्द बरे दोन वाईट तोंडास येतच आहेत तेच ध्यानात आणावें आणि गर्वें करून बोलतो याच्या मनात बहुत गर्व येसेच ध्यानात यावें तरी जेथें संशयच जाला तेथें हे भाव चितात येतील यांत संशय काये आहे हेच गोष्टीचा आर्थ पाहातां सांप्रत [3]आपा येथे

---

१ त्र्यंबक सदाशिव पुरंदरे. २ महादोबा. ३ धोंडो मल्हार पुरंदरे.

सासवडास आले आहेत याच्या चितात चाकरी शरिरामुळें होत नाही घरींच राहावें बहुताचे पेच सोसावे बरे जालियावरी कळेल तें रीतीने सावदाची चाकरी करावी तूर्त घरीच राहावें म्हणून आले आहेत आम्हास विचार पुसतात जैसे स्वामीसी आपण करून बोल्त होतो येैसेच यथाशाने सुचते ते बोलतो आपाची आमची स्वछता काही पहिलेपासून नवती व साप्रतहि बहुत नाही थोडी बहुत कृपा करितात गोष्ट सागतात पुसतात सुचते ते बोलतो जो सिलेदारींचा विचार स्वामीसी बोलिलो तोच यासीहि बोलतो बरें जालियावरी कोणीहि कृपा न करी तथापि आपण फखत सिलेदारीनेच सेवा करून आपले आबरू राखोन थोडे बहुत जे देतील तेच घ्यावें परतु आपला स्वभाव व कुरूप जतन करावा येैसे बहुता रीतीने पुसतात मी सागतो तरी नाना म्या काही तुम्हासी गर्व करावा आथवा तुमचे आशुभ चितावें येणेकरून मजला कल्याणदायेक आहे येैसे आहेसे नाही येहलोक परलोकी हानीच आहे हे पूर्ण खरें जाणतो पुणियात बाबाजवळ कितेक ग्रहस्त आस जाले आहेत मनास मानेल त्याची कुचिंदे करितात त्याचे जघन्य लोकोतर बहुत जालें आहे माझी रीत बाबाजवळ पहिलेपासून जैसी आहे तैसीच आहे दुसरे ग्रहस्त बाबाजवळ आसिलें म्हणजे कोणाचाहि परिश्रम होत नाही यद्यपि आपादेखील बाबाजवळ आसिले तरी उठोन जावें येैसे जरी आहे तथापि बाबा मनुश्याप्रमाणे जाणतात उत्तम रीत कोणती वाईट कोणती त्याच्या स्वरुपा प्रमाणें त्याजपासी कार्य घेऊन वर्तवितात जेथें देशबुधी आसती तेथें माणूस पाहून वर्तवितात हे रीत बाबाची आहे बरे वाईट परिणामी कलते त्याहीमधे आम्हासारखी याची स्वामीस परवा काये आहे परतु विचारे पाहता स्वामीचे पदरी थोरपण तेव्हा कोणी तरी जवळ आथवा दूर आम आगर परकी योग्य मनुश्य आसावे आसतच आसतात माणुस गैरमाणूस जाणून त्याच्या बुधीनरुप त्याजवरी कृपा करावी हेच योग्य आहे बाबापासील वर्तणूकेचे सर्व भाव [४]बल्वतरायाचे चितात आले आहेत विस्तार कोठवरी ल्याहावा आम्ही हा परियाये लिहिला तथापि काये चितात येईल हे न कळे आम्ही तो हे रीतीनेच सशय न धरिता वर्तावे त्याप्रोच आम्हावरी कृपा करावी ह्या आर्थें लिहिलें आहे त्याहीमध्यें खातरेस येईल तें प्रमाण हा कालपर्यंत आमचा रुणानबध येैमाच आहे पुणियाहून आज च्यार रोज जाले येथें आलों आठ च्यार दिवस घरी राहून आवकाश जाला तरी येईन तीन महिनियात पधरा दिवस राहाणे नेहमी जाले नाही उगेच दोन हिसके देतात आमचे स्वाधीन काही नाही तेथे गेलिया उपरी कोण्ही पुसतहि नाही परतु आज्ञेप्रमाणे वर्तावे लागते मातुश्री आबई वाराणसीस जाणार आहेत तेव्हा महिना पधरा दिवस तुमची त्याची भेटी जालीच पाहिजे कदाचित सातारि-

---

४ मेहेंदळे.

यासच मातुश्रीनी जावेसे जाले तरी हर कैसा आवकाश करून तेथेंच येईन नाही-तरी स्वामीच इकडे येतील बरे जैसे बनेल तैसे करू कृपा करून सांभाल करावा उचित आसे लोभ आसो दीजे हे विनंती.

---

(ले.२००) श्री

*राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री धोंडोपंत आपा स्वामीचे सेवेसी

पो सखाराम भगवंत कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहावयासि आज्ञा केली पाहिजे विशेष स्वामीनी राजश्री बाबास पत्र पाठविले तें व आम्हास दोन पत्रे पाठविली ते पावली आम्हास लिहिले कीं तीर्थरूपाचे पत्र तुमच्या विचारे जाले तर दाखवणे त्यावरून आम्ही श्रीमंत राजश्री भाऊ स्वामीस पत्रें दाखविली त्यावरुन त्यानीहि दुसरे दिवसी आज्ञा केली की दाखवणे व विचारें पाहातां दाखवावी उचीतच येसे जाणून दाखविली पत्र पाहून काही बोलिले तो नाहीत परंतु आम्हास आज्ञा केली की पत्र तुम्ही आपणा-जवळ जतन ठेवणे म्या म्हटलें की मजला जतन होत नाही सिऊबाजवल देतो भाव पाहाता आम्ही सर्वस्व पाहतां उतम गोष्टी सागतों याच्या चितास नयेत बरे आमचा काये उपाये आहे त्याउपरी काही भाषण केले नाही सातारियास पत्रे गेली आहेत त्याची उतरे आलियावरी काये काये भाषण होईल ते पाहावे आम्हीहि सातारांच्या पत्राचे उतर ये तो येथे राहून मग येईन लोभ आसो दीजे हे विनती

---

(ले.२०१) श्री

[1]आसीर्वाद उपरी सखारामपंतास पाठऊन देणे म्हणून लिहिले दोहोपत्री होते त्यास येथे आम्हास अमलसा बरा सिमगा खेलणे आहे त्यास हे चतेर माणूस यासाठी ठेऊन घेतले आहेत सिमगा जालियावर येतील रा छ ११ रबिलोवल हे आसीर्वाद

---

(ले.२०२) श्री

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री अपाजीपंत स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी का। सासवड येथील सरकारचे पत्र होणे ते मा।र आनाम देशमुख मोकदम व देशपाडे येसे होत आसते आतां श्रीमंत् राजश्री नानानी दिकत घेतली कीं मोकदम यासी मा।र म्हणावयाची चाल खोटी देशमूख देशपाडे यासी म्हणावे मोकदम यासी आज्ञापत्र म्हणावे याप्रा। म्हणतात जिल्हेची पत्रे मुतालकी-

---

१ पत्र भाऊसाहेबांचें.

च्या सिक्याची होतात खासा सिका ज्याजवरी प्रधा।[1] उपराटा सिक्यात आहे ते पत्र आणऊन दाखवा किंवा सचिवाचे पत्रे दाखवा यैसे म्हणतात यैसीयासी असल सिक्याची पत्रे आम्हापासी आहेत तूर्त हातास न येत यैसीयासी तुम्ही राजश्री बापूपासून सनदाचा रुमाल लहरी छिटाचा सागड आहे तो पाहोन त्यात येकादा कागद आसल सिक्याचा सापडला तरी किंव्हा सचीवाचा सापडला तरी पाठवणे अथवा मुलाणे का मजकूरचे याजपासी मुलाणकी बाबत सनदा आहेत त्या आणऊन त्यात सचिवाची किंवा प्रधानपंताचे नावाची सिक्यात उपराटा न आहे ती सनद जरूर शोध करुन लवकर पाठवणे सेट्यापासी कागद आहेत त्यात आसल्यास शोध करणे माधवराव याच्या आदलात आसल्यास पुसोन शोध करून जरूर पाठवणे त्या पत्राची निकड आहे शोध करणे आणि पाठवणे हे विनंती

---

(ले.२०३) श्री

राजश्रीया विराजित राजश्री गणेशपंत स्वामीचे सेवेसी

पो केसो दादाजी नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिा वर्तमान कलले कुरणाचा मजकूर लिहिला तोहि कलला तुम्ही सरकारचे पत्र चहू रकान्याचे पाठविले तेहि पावले तुम्ही चहू रकान्याच्या पत्राची पधत पाडिली आहे परतु हे गोष्ट उतम नव्हे पहिल्यापासून येथे पत्रे येतात परंतु चहू रकान्याचे कधी पत्र आले नवते तुम्ही आता पधत पाडिली हे गोष्ट उतम आहे तुम्हास कलावे या करिता लिा आहे बहुत काये लिहिणे हे विज्ञापना

---

(ले.२०४) श्री

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पो सखाराम भगवत कृतानेक साा नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान ताा छ ३ सावान पावेतो येस्थास्थित असे विशेष राजश्री बलवतराव सातारियाहून सासवडास आले त्याणी स्वामीचे व आमची स्वच्छ नाही म्हणून कितेक भाव सागितले त्यास स्वामी पहिल्यापासून बोल्तात व हल्लीहि मारनिले जवल बोलिलें तें यथार्थच आहे कसे म्हणोन तरी आम्ही हा कालपावेतो जेव्हा स्वामीसी भाषण केले आहे तेव्हा स्वामीस समाधान न वाटावे यैसेच केले आहे लोकानी यैसे केले आहे की स्वामी येखादी गोष्टी चुकले तरी त्यांनी अर्जवाचीच गोष्टी सागावी हे रितीने वर्त (अपूर्ण)

---

१ सबद पत्र मोडींत आहे तरी प्रधान एवढाच शब्द बालबोधींत लिहिला आहे व त्याच्यातील शेवटला ' न ' उरफाटा काढिलेला आहे.

(ले.२०५)श.१६७९ आषाढ शु.५]श्री कृष्णोजयेति [इ.१७५७जून२१

श्रीमंत माहाराज राजमान्य राजश्री पंडित प्रधान बाळाजीराऊ धर्मधुरंधर स्वामी गोसावी याचे सेवेसी

शुभचिंतक स्नेहांकित राजा केशवराऊ व राव बदरीनाथराऊ सां नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता छ ३ सवाल मुकाम झांसी जाणून स्वकुशल लेखज्ञाना केली पाहिजे विशेष पूर्वी वरचेवरी वर्तमान या प्रांतीचे सहित विस्तारपूर्वक विनतीपत्रे सेवेसी पाठविली आहेत त्यावरून सर्वार्थ विदित जालाच असे येथून पत्रे वरचेवरी व मनसुबे लिहावयाचें श्रीमंत दादासाहेब व मल्हारराऊ सुभेदार यास वरचावरी लिहीत आहेत व त्याची उतरे हमेशा आम्हास पावताती व आमचे पत्रावरून करायाचें तें करिताती प्रस्तुत जयपुरचे कामाचे गुतियामुळे तेथेच काही दिवस दादासाहेब व मल्हारराऊ खासे स्वारीनिसी आहेत व सखाराम पंडित व गंगाधर पंडित व विठल सिवदेव व अंताजी माणकेश्वरा बा मोठी फौज देऊन अंतरवेदीकडे रा केले ते सर्व आगरियापासी यमुना उतरोन पार जाले आतां बहुतेक दिलीकडे रुख जायाचा दिसतो अंतरवेदीत ठाणी येथापूर्व आपली कायम जाली वजीर व अहमदखान बंगश इत करून आहेत सुजाउद्दौला अवधचा सुबा गंगापार आहे वजिराचा त्याचा जाबसाल मात्र आहे परंतु चितातून शुधी नाही सुजाउद्दौलास इच्छा की विजारती आपले बापास होती ते मिळावी व वजीर तो वजीर आहेत त्यास आपली विजारत न जावी व नजीबखान जो अबदाली करून दिलीत पातशाहानी अबदाली साहेबयेख्तियार करून गेला तो चाहातो की वजीर आपणच व्हावे मूळ अबदाली जातेसमयी वजिरास वजीर करून गेला व नजीबखानास मीरबक्षी करून गेला त्याचे केले कोण मोडू पाहातो पातशाहा व वजीर नावास आहेत अबदालीची हिमायेत राखताती अबदालीची फौज सिरहधपावेतो बसलीच आहे त्याने आपली हध सीरइंध मोकरा केली येथपी दिलीत नजीबखान पातशापाशी आहे हे अबदालीचीच फौज आहे या हिसाबे पाहता दिलीत अबदालीचाच अमल जाणावा वजिराबाार पातशाहजादे आहेत तो फरुखाबाद ताळुके अहमदखान बंगष याचे आहे आबदालीची फौज जंगबाजखान नामे सरदार वजिराबरोबर आहे मुलक अंतरवेदीचा तोच मारितो वजिरास मना करवत नाही मोठे शल्य नजीबखान आहे वजिरासी पातशाहासीहि चितशुधी नाही पहिले अबदालीने पातशाहास पातशाही जसी मुकरा केली तसी वजिरास वजीरी मोकरा करून गेला असे कोणास कोण्ही तगीर करू सकत नाहीं कीं अबदाली आला तरी या गोष्टीचा जाब कोण देईल पहिले मनातून चितशुधि नाहीं आता पहावे सखाराम पंडित वगैरे गेले आहेत हे कोणाकडे जाताती व काये पारपत्य करिताति राजा नागरमल दिवाण जाटा-

(ले.२०८)श. १६८० आश्विन] श्री [इ.स. १७६० आक्टो.–नोव्हेंबर

पुरवणी चिरंजीव राजश्री बजू व बापू यासी आसीर्वाद उपरी तीर्थस्वरुप राजश्री बाबाच्या घरचे वर्तमान लिा ते कलले आम्ही या प्रांती आलो म्हणून श्रमी होतात म्हणून लिा थैसीयासी बाबासिवाये आम्हास कोण आहे त्याच्याहि शरीरी सावकाश नाही टोक्यास जाणार म्हणून वर्तमान कलले त्यावरून चित उद्विग्न जाहाले आहे कितेक पेच आसिले तरी सर्वस्वे बाबा वडील आम्ही लेकरे + + + मायाच आमच्या ठायी येईल याप्रमाणे दुसरे (यास) येईल येैसे नाही श्रीमार्तंडभैरवें आरोग्य करावे म्हणजे आम्हास दुसरी जोड आहे येैसे नाही बाबाचे आरोग्यतेचे वर्तमान वरच्यावरी लिहिणे चिरंजीव राजश्री आबांच्या धाकटे बायकोस बरे वाटत नाही म्हणून लिा तिचेहि आरोग्यतेचे वर्तमान लिहिणे सौ राजूचे वर्तमान लिहिले ते कलले बहुत खेद जाहला ईश्वरी कर्तुत्वास उपाये काये हे * आसीर्वाद

---

(ले.२०९)श. १६८२ पौष व ९] श्री [इ.स.१७६१ जाने०

सके १६८२
विक्रमनाम सवच्छरे

नाना पुरंदरे यानी आपले
मातुश्रीस पत्र लिा असे

तीर्थरूप मातुश्री आवई वडिलाचे सेवेसी—

आपत्य नानाने चरणावरी मस्तक ठेऊन सिर सा। नमस्कार विनंती येथील वर्तमान ता। पौश वद्य ९ मुा। भिंड चमेल दक्षणातीर येथे ग्वालेरी पधरा कोसपर्येत वडिलाचे आसीर्वादे करून सुखरूप आसो विशेष पाणिपती होतो तेथे सविस्तर जासुदाबरोबर लेहून पाठविले ते कासीद पावले आसतील त्यास पौश शु॥ ८ आष्टमीस श्रीमंतानी गिलच्याचे फौजेसी जाऊन युध्ये मोठे मातबर केले त्यास श्रीमंताचे फौजेने सिक्स्त खादली तोफखाना बुनगे सर्व हाती घोडे बाजार गिलच्याने लुटिला वीस पचवीस हजार माणूस गिलच्याने धरून नेले फौजा चहूकडे पलाल्या आम्ही व मल्हारबा होलकर येकीकडे निघालो भाऊसाहेब येकीकडे गेले चौधे चहूकडे गेले श्रीमंत राजश्री विस्वासराव गोली लागोन ठार पडिले गिलच्याने मुडदा नेला वरकड मोठे मोठे लोक राहिले [1]बाजी हरी त्याचा पुत्र दादा व बालाजीपंत त्याचा जावाई हे राहिले आताजी माणकेस्वर राहिले आमची वस्तभाव घोडी उटे सर्व गेली सखोबा बाल्या कृष्णा माहादेव दोघे आच्यार्ये कोनेरी ब्राह्मण व आबाजी दादाजी व जिवाजीपंत वाघोलकर सर्व राहिले मारले गेले किंवा पळ येत आहे

---

* पत्र नाना पुरंदऱ्याचें. १ सुभेदार सुनेकर.

त्यात आहेत हे कलत नाही पाहावे खिजमतगार भोई खासबारदार सर्व राहिले कुणचिणी राहिल्या याप्रो सर्व लस्करने जाहाले बाकी राहिली नाही कोणापासी येक ताव्या राहिला नाही तीन च्यार उपोशणे सर्वास जाली दाडगीयानी लस्करचे लोक फार लुटिले गगोबा बलवंतरायाचे लेक आपा राहिले होते परतु पलोन आले जिवानसी सुखरूप आहेत भैरालभाउ संटोबा आन्या आबा व गगाजीबावा व चिमाजीबावा आले सुखे आहेत वरकड रामचंद्र जगथाप आपा व जानराव दुर्गोजीचा रामजी हे सर्व राहिले खोरकर बालाहि राहिले मोठा आनर्थ जाहाला आपले आसीर्वादे व मार्तंडाचे आसीर्वादे जिवानसी येथपर्यंत आलो पुढे आपले पाये द्रिष्टीस पडतील तो सुदीन आहे सटवा राहिला होता तो आला वरकड कोण्ही येक नाही आता मल्हारबा व आम्ही येके जागा आहो सरकारची फौज दाहा हजार आम्हाबरोबर आहे सौ पार्वतीबाई राहिली होती परतु येक खिजमतगार व पिराजी राउत याणी पाटीस बाधून पलउन आम्हापासी आणिली मोटी विपत्य जाली प्रस्तुत येथे आहेत बहिणाबाई व तिची सून नाना फडणीस ऐसी तिथे राहिली काये गत जाली आसेल ते आसो वरकड कितेकाच्या बायेका धरून नेल्या व मारल्या याप्रो गत जाली तुम्ही तिकडे खबरदार रात्रंदिवस राहाणे तिकडे मोगलाने दंगा केला तरी सावध राहाणे पुरधरचे घर झाडून सारऊन ठेवणे काही गला पाठवावा रात्रंदिवस खबरदार राहणे वर्तमान वरचेवर लेहून पाठवावे भाऊ-साहेबाचा थाग जयेनगराकडे लागला आहे कासीद खबरीस पाठविला आहेत ईस्वरकृपेने येतील जनकोजी सिंदे याचा थाग ठीक नाही लस्कर फार बुडाले बाकी राहिली नाही आम्ही ग्वालेरीजवल फौजसुधा राहिलो श्रीमत राजश्री नानासाहेब फौजसुधा इकडे येतील मग आज्ञा मागोन वडिलाचे दर्शनास येऊ जिवेकरून खुशाल आहो वरकड गेले ईस्वर देता समर्थ आहे माणिक घोडा व सर्व गेली जरदी मोहनीमात्र मजखाले राहिली आहे वरकड दोनच्यार तटे राहिली आहेत सर्व घोड्या घोडे गेले खडु जाधव राहिला [1]हरी सिवराम गोविद सिवराम याचे भाऊ राहिले बाजी भिवराव[2] याचे नातू नारायेणराव राहिला आपाजी जाधव व समशेरबाहादर दाडग्यानी लुटले पायेउतारा येत आहेत येतील तेव्हा खरे कलले पा हे विज्ञापना आता आपल्या मुलकात आलो चिता नाही सरकारचे सारी हाती गेले आमचा नागसुदर गेला कलले पा हे विज्ञापना

---

(ले.२१०)श. १६८२ फाल्गुन शुा १] श्री [इ. स. १७६१ मार्च ७

*तीर्थरूप राजश्री आपा स्वामी वडिलाचे सेवेसी आपत्ये नानाने चरणावर मस्तक ठेऊन सिर साष्टांग नमस्कार विनंति येथील वर्तमान ताा फाल्गुन शुधे

१ खाजगीवाले. २ रेटेरेकर.

प्रतिपदा मुा ग्वालेर येथे वडिलाचे आशीर्वादे सुखरूप आसे विशेष स्वामीनी आर्शीर्वाद पत्र पाठविले ते पावोन फार सतोष पावलो स्वामीचे पाये द्रष्टी पडले-समान चितास जाहाले दर्शन होईल तो ××× आहे मातुश्री आबईकडे कासीद पाठविले सुखरूप आहे म्हणौन त्यास उचितच वडिलास आहे इकडील वर्तमान दर्शनाती कळेल बाजी हरी व दादा याचा थाक नाही माणसे जागा जागा पाठविली आहेत सुपेकर बापा येथे आम्हापाशी आहे सोनजी भापकर येशवत राऊ पवार गगाधर नाईक ओंकार बापू बाजीरायाचे पुत्र याचे ठीक नाही हारी शिवराम दिलीत आहे आसी खबर आली याजवरून इनाम देऊन माणसे शोधास पाठविली आहेत नाना फडणीसाची मातुश्री बहिणाबाईचा शोध नाही आपा सरनाईक गोली लागली आहे जखमी आहे आम्हापासी आहे महिनाभरा बरा होईल कलावे लोभ असो दिल्हा पाहिजे हे विज्ञापना बलवतरायाचा लेक आपा सुखरूप आहे हे विनति

---

(ले.२११) श. १७१९ वैशाख] श्री [इ. स. १७९७ एप्रील–मे

[1]श्रीमंत मातुश्री [2]बबीसाहेबास काल मगलवारी सार्हीकाली विराहून आपून आणली घटका आर्धा [घ]टका होते उपरातिक सर्वास टाकून गेली ईस्वरे फार वाईट केले ती पत्री लिहीता पुरवत नाही दोनी वाड्यास वडील होती रसा-वयासि जागा होती ईश्वर फार विशकलीत केले दहन पिपळात [3]श्रीमताच्या व्रींदावनापासी जाले मत्रअग्र येथायुक्तत होऊन दोन प्रहर रात्रीं माघारे आलो तदनतर भाजने जाली साराश आतकाळ सोईचा जाला नाही दानधर्म मातुश्रीच्या हाते काही एका पयेसाचा जाला नाही प्राचीतदेखील जाले नाही असो होणार गोष्टीस उपाये नाही येजमान स्वामीचेहि पत्र आपणास दोन प्रहरानतर ये[ई]ल कळावे पत्र वाचून फाडावे येक पयेसा आथवा येक डागिना कोणास दिल्हे नाही हे विज्ञापना.

---

१ हस्ताक्षरावरून पाहता, हें पत्र त्र्यंबकराव महिपत ऊर्फ नाना पुरंदरे यांचे कारकून माहादाजी माणकेश्वर वाघ यांचें आहे.

२ नीळकंठ महादेव ऊर्फ आबा पुरंदरे यांची स्त्री उमाबाई इचें हें टोपणनाव. इचा मृत्यू शके १७१९ वैशाख

३ बाळाजी विश्वनाथ पेशवे.

(ले.२१२)

[ पहिला चंद मिळाला नाहीं ]

२

गणेशपंतानी दिल्यावरील देवस्थानांस पूज्यासाहित्य जोसी याजपासी दिले ते व दक्षणा खर्च पडली होती त्यावरून समजाविला त्याची याद गोखटे यानी लेहून आणली होती तो दाखला

शके १६९६ जयनाम संवछरात खर्च पडला तो
१ चैत्र शुा १ रविवारी पाडवा
१ चैत्र शुा ९ सोमवार राम ९
१ वैशाख आधिक शुा ७ सोमवार पुत्र उछाह दिवसी माहादक्षणा व साखर
१ वैशाख आधिक वद्य ३ शुक्रवार बारशाचे दिवसीं
१ वैशाख शुा ३ शुक्रवार आक्षीय त्रितिया
१ आषाढ शुा ३ मंगलवार कर्कसंक्रांत
१ श्रावण शुा ५ शुक्रवार
१ श्रावण शुा ७ रविवार श्रावणमास देकारसमधी
१ श्रावण वद्य ७ रविवार गोकुलआष्टमी
१ भाद्रपद शुा १३ वर्षश्राध रविवारी
१ भाा वद्य १४ मगलवार पक्ष
१ आश्विन शुा १० शुक्रवार दसरा
१ कार्तिक शुा १ शुक्रवार दिवाली
१ कार्तिक शुा ११ सोमवार
१ कार्तिक शुा १४ गुरुवार वैकुठ १४
१ मार्गसिर्ष शुा १ रविवार दिपवाली
१ पौष शुा १० बुधवार मकरसंक्रात
१ माघ वद्य १४ मगलवार माहासिवरात्र
१ फाल्गुन शुा १५ गुरुवार हुताशनी
१ फाल्गुन वद्य ५ बुधवार रंगपचमी

शके १६९७ मन्मथनाम संवछरात खर्च पडला तो
१ चैत्र शुा १ शनवार पाडवा
१ चैत्र शुा ९ रविवार राम ९
१ वैशाख शुा ३ मगलवार आक्षयत्रितिया
१ वैशाख शुा ७ रविवार वाढदिवस
१ आषाढ शुा ११ रविवार
१ आषाढ वद्य १ गुरुवार कर्कसंकरात
१ श्रावण शुा ५ मगलवार
१ श्रावण शुा ७ गुरुवार देकार
१ श्रावण वाा ८ शुक्रवार जन्म
१ भाा शुा ४ बुधवार गणेश ४
१ भाा शुा १४ शुक्रवार श्राध
१ भाा वद्य १४ शनवार पक्ष
१ आश्विन शुा १० बुधवार
१ काा शुा १ बुधवार दिपवाली
१ काा शुा ११ शुक्रवार
१ कार्तिक शुा १४ रविवार वैकुठ १४
१ मार्गसिर्ष शुा १ शुक्रवार दिपवाली
१ पौष वद्य ५ गुरुवार मकरसंकरात
१ माघ वाा १४ शनवार माहासिवरात्र
१ फाल्गुन शुा १४ सोमवार हुताशनी
१ फाल्गुन वाा ५ रविवार रगपंचमी

याप्रो दोन सालात तेरीखवार पूज्यासाहित्य व दक्षणा मुदचाखकोठी पौ व मुदचाखातील धिध्धा (सिधा ?) नैवेद्य जोसी पुरंदरे याजपासी दिल्हे आहेत त्यातून जोसी यानी काय घेऊन गुरवास व भगतास काय पावले याचा तपसिल लिा नाही याप्रोच पुढेहि दरसाल पावत गेले आहे यैसा दाखला वाकानिसाकडील

गोखटे यानी आणून तात्या सुभेदार यास समजाविला तेसमई [1]श्रीनारायणाची मूर्ति किल्यावर श्रीकेदारेश्वराचे देवळातील तिचे उत्पन्न आम्ही गुरवानी घ्यावयाचे हाली घेतो येसा तटा घातला त्यावरून याचा शास्त्रार्थ सरकारचे शास्त्रीपंडित प्रसंगी आहेत ते सागतील त्याप्रों उभनानी वर्तावे येसे ठरऊन वोसपन्न राजमान्य रा सदासिव दीक्षित कर्वे व बलवतराव कर्वे उपाधे व बाळ जोसी मालगुडकर व बाल जोसी किरकीर वगैरे राजमान्य याचे कानावर घातले त्यानी सांगितले की थेऊर व मोरगाव वगैरे येथे गणपती आहेत तेथे गुरव घेतो आन्य ठिकाणी पर्वती कसब्याचे गणपती + ब्राह्मणहि घेतात आश्वथ मुज्या याचे सर्वत्र ठिकाणी ब्रा[ह्म]ण घेतात येसे ठरते तेसमई श्रीनारायणाची मूर्ति छिन्नभिन्न जाहलेली ती पूजा नैवेद्यास उक्त नाही दुसरी स्थापावी नतर सरकारची नेमणूक पावेल दर्म्यान जोशास पावणार नाही म्हणून दिकन शास्त्रमने निघाली व कोडाजी ना। व संताजी ना। चिव्हे व बालोजी ना। भिसाल व चाहुजी ना। ढगारे वगैरे वतनदार लोकानी तुम्हा जोशास ताकीद केली की किल्यावर श्रीकेदारेश्वराचे देवलात श्रीनारायणाची मूर्त आहे ती आमचे घेऱ्यातील नारायणबावीपासील मोडके [2]देवलात होती ती हालीमाजी मुले किल्यावर नेली हाली घेऱ्याचा तटा खटला

१ हल्लीं मुंबईस प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियममध्यें जी पुरंदरची श्रीनारायणाची मूर्ति आहे तीच ही होय.

२ ही 'नारायण बाव' पुरंदरचे पायथ्याशीं मौजे पूर गावचें हद्दींत अद्याप आहे, परंतु तिजजवळील श्रीनारायणाचें देवालय मात्र नाहींसें झालें. त्या देवालयाचे दगड इतस्ततः सापडतात, त्यावरून हे हेमाडपंती घाटाचें होतें असें दिसतें. हें देवालय श्रीविष्णुदेवतेचें असून, मौजे पूर गावच्या गावठाणातील जें श्रीनारायणेश्वर नावाचें हेमाडपती घाटाचें भव्य शिवालय आहे, त्याहून हें वेगळें होय. या नारायणबावीचा नारायण अगदीं पुरंदरच्या पायथ्याशीं असून श्रीनारायणेश्वर पुरंदरच्या उत्तरेस सुमारें पाऊण मैलावर आहे. जयसिंगाच्या पुरंदरच्या वेढ्यांत ज्या नारायणाच्या देवालयाचा उल्लेख येतो, तो नारायण म्हणजे नारायणबावीचाच नारायण समजला पाहिजे. शिवाजीमहाराजाच्या वेळेस 'श्रीविष्णुमूर्ति श्रीनारायणाचें देऊळ' सुस्थितींत असून, पुढील यवनी उत्पातात बहुधा त्याचा नाश झाला असावा. आणि तेथील छिन्नभिन्न झालेली मूर्ति पेशवाईत पुरंदरीं श्रीकेदारेश्वराजवळ ठेविली गेली; व या लेखानंतरच्या कोणत्या तरी काळांत तिचें केदाराजवळील सातखाची टाक्यात भंगलेली म्हणून विसर्जन झालें. बहुधा इ. स. १८९७ सालच्या दुष्काळात पुरंदरचीं सर्व टाकीं कोरडीं पडल्यामुळें तेथला गाळ इंजिनियर खात्याकडून काढला गेला; तेव्हा ही नारायणाची मूर्ति सातखाची टाक्यात सापडली व तीच हल्लीं मुबईत, 'प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियम' मध्यें ठेवली आहे; म्हणजे नारायणाचें देवालय जरी खलास झालें तरी त्यांतील मूर्ति अद्याप कायम आहे असें समाधान मानून घ्यावें म्हणजे झालें. विद्यमान श्रीनारायणेश्वर शिवालयाचा उल्लेख पेशवाईतील कागदपत्रांत 'वनातील नारायण' किंवा

मौजे पूरकराचा आमचा पडला आहे पुरदरे जोसी हे पूरकराचे जोसी कुलकर्णी यानी किल्याचे घेन्यातील नारायणाची मूर्ती असे पुरदरे जोशानी कबूल केल्यास जोशांनी सरकारचे शास्त्रार्थाप्रो पुरंदरे यानी नारायणाचे उत्पन्न घ्यावे [1]गुरवानी घ्यावयाचे नाही गुरवकीचे वतन आम्हा कोल्याचे गुरवाकडे ठेवीस ठेऊन काम चालवितो याप्रो दोन दिकती निघाल्या याज्तव हा खटला घालून वाटावाट केल्याने उभयताचे नुकसान होते तेव्हा आपआपसात समजावे हे चांगले ऐसा तुमचा विचार जाहाला [1]हाली आम्ही नारायणाची नेमणूक कोठीपो दरमाहा घेतो हो तुमची आमची नव्हे त्या देवाची नित्याची पूजा व झाडलोट करतो म्हणून तुम्ही आम्हा गुरवावर कृपा करून चालविले आहे जे दिवसी नारायणाचे नेमणुकीप्रो तुमचे तुम्ही घ्याल ते दिवसी आम्ही देऊ तटा सांगणार नाही सर-नाईक वगैरे वतनदार लोकाचा कोल्याचा आम्हा गुरवा[व]र वाकडा डोळा आहे त्याचे निवारण तुम्ही जोसी कुलकर्णी बहुत कालचे तुमचे पुस्तपन्ह्याने आम्ही तरले जाऊ या उपरी आश्वथ व मुजे व नारायणभावीचा नारायण याचे उत्पन्ना-विसी आमचा आर्थाआर्थी समध नाही गणपती तुमचे वहिवाटीस असतील त्याचे उत्पन्न तुम्ही घ्यावे आमचे वहिवाटीस आहेत त्याचे उत्पन्न आम्ही घेऊ याप्रो आम्हा खिरसागर गुरवाचे स्वसंतोषाने ठरले ते लेहून दिल्हे असे यास विद्यमान खिरसागर गुरव

| | |
|---|---|
| १ धोंडजी बीन साखरोजी | २ बाबू व म्हाकू सखे बधू |
| १ गोपाला बीन जयराम | २ नारो व आनाजी सखे बधू |
| १ म्हाकोजी काळो बुा | २ द्वारकाई व रेवाई |

येकूण नऊ आसामीनी आपले स्वसंतोषे हे समजूत पत्र तुम्हास लेहून दिल्हे सही

साक्ष वतनदार किले मार निगा धुपारती .

१ होनाजी सुतार पेठकर
१ रत्नोजी परीट पागारकर घर पेठस
१ आबाजी रखमाजी सोनार पोतदार घर माचीस
१ आबाजी लोहार घर माचीस
१ तुळजी न्हावी भिवडीकर
१ सुलताननाक दागनाक बेगला महार घर पुरदर किला
१ रायक[?] नाक बेगला घर माचीस

---

'नारायण' असा आढळतो. अर्थात् पेशवाईंत ज्या ज्या वेळीं पुरंदरच्या नारायणाच्या देवस्थानचा उल्लेख आढळेल, त्या त्या वेळीं तो श्रीनारायणेश्वराचाच समजला पाहिजे.

(ले.२१३) श. १७२४ मार्ग. ] श्री [ इ. स. १८०२ नोर्हे.

भविशार्थ यासी नेमणूक श्रीविठल आज्ञाप्रा केली ते खरी व्हावी हे आसत्य होऊ नये येगाची तानचा नाशाची घालमेल कार्तिकमासी वा नवमीस घडावी दुसरे मार्गसीपमासी वा ५ पचमीपासून सोला दिवसात आकस्मात निजले ठिकाणी शेखेकडून मृत्य व्हावा हे सत्यवाचा मार्गसीप वा ६ पासून येका वरसात ईश्वर सत्य करून श्रीमताची दिवाणगिरी होऊन वस्त्र सिरपेच व्हावी वगैरे सरजाम सुधा व्हावी द्विती लग्न आणखी घडावी पुत्राची उत्प[त्ति] दिसावी पहिल्या लौकिका पेक्षा अधिकोतर घडावा आधी आश्वीन वा ५ पचमीस श्रीमताची थावया प्रकरणी बोलणी व आश्वासन याचा योग घडावा त्याची कृपा दिसावी कोकणस्ताचा क्षेय नाश व्हावा देशस्ताचे प्राबल व्हावे फिरग्याचे राज्य घडाव आण श्रीमताचे आज्ञात फिरगी राहून राज्य निवर्गानी करावी यैस त्याची कारकीर्दी नव्याचे वऊस परापरा चाकरीमधी उपाध होऊ नय हे सत्य श्रीविठल करील येसे दासानी वदनुक केली असे हे वर्म सत्य घडलीयास आशाडी कार्तिकीची वारी ज्यात्या होत जावी यात आतर होऊ नये

---

(ले.२१४) श्री

वशावल विठल सिवदेव व बालाजी रगनाथ मूलपुरुप त्रिबक सिवदेव यासी पुत्र २ वडील खडावा रासावा धाकटा यासी पुत्र २

| | |
|---|---|
| वडील मल्हारीपत यासी रायाजी याचा दादाजी यासी पुत्र सिवाजी यासी पुत्र३ | दुसरा बलाळ याचा नारायण याचा रगावा याचा बालाजी याचा मल्हारी यास |
| १ आबाजी सिवदेव | १ कोडाजी |
| १ त्रिबक सिवदेव | १——— |
| १ विठल सिवदेव | १——— |
| + + + + | १——— |
| १ सिवदेव | + + + + + |
| १ त्रिबक | १ सिवदेव |
| १ रासोपत | १ त्रिंबक |
| १ मल्हारपत | १ रासावा |
| १ रायाजी | १ बलाळ |
| १ दादाजी | १ नारायेण |
| १ सिवाजी | १ रगावा |
| १ आबाजी त्रिबक व विठल सिवदेव | १ बालाजी |
| — | १ मल्हारी |
| ८ | — |
| | ८ |

समाप्त

# व्यक्ति-स्थळ-सूचि



( सूचीकार—म. म. बोकील )

# INSTRUCTIONS TO BORROWERS

1. Books are strictly non-transferable.
2. Books are ordinarily issued for a fortnight only, and may be recalled at any time at the discretion of the Librarian.
3. A borrower, who disfigures or in any way damages a book, may be called upon to pay such penalty, not exceeding the value of the book, as the Librarian may fix.
4. A fine of one anna per day is imposed for the retention of a book beyond the specified time of return or recall.

*Librarian.*